# विज्ञान आणि चमत्कार

लेखक

प्राचार्य अद्ध्यानंद गळतगे





# विज्ञान आणि चमत्कार

## अर्थात् आत्मविज्ञान

**एष तु वा अतिवदति यः सत्येनातिवदति ।**
**यदा वै विजानाति अथ सत्यं वदति ।**

छांदोग्य उप. ७.१६, १७

**अर्थ :-** हा (ग्रंथ) अतिवादी आहे. म्हणजे तो व्यवहारापलीकडील गोष्टी सांगतो. पण तो व्यवहारापलीकडील गोष्टी सत्य असल्यामुळे सांगतो. आणि सत्य केवळ विज्ञान जाणणाराच सांगू शकतो.


प्राचार्य अद्वयानंद राघोबा गळतगे
भोज (बेळगाव)



वेदांतविवेक प्रकाशन

* विज्ञान आणि चमत्कार

* लेखक - प्राचार्य अद्वयानंद राघोबा गळतगे
पो. भोज, जि. बेळगाव, पिन ५९१ २६३

* प्रकाशक - वेदांतविवेक प्रकाशन,
पो. भोज, जि. बेळगाव, पिन ५९१ २६३

* प्रकाशन - शुक्रवार दि. ४ ऑगस्ट २००६
श्रावण शुध्द १० शके १९२८



* आवृत्ती पहिली

* मुद्रक - सुभाष प्रेस, अ. लाट.
ता. शिरोळ, जि. कोल्हापूर. पिन ४१६ १३०
☎: २५४०१०

* किंमत - रु. ४००/-

---

## मुखपृष्ठ

८ डिसेंबर २००५ रोजी तिरुवनंतपुरम् येथे 'स्ट्रीट मॅजिक फेस्टिवल' मध्ये नेदरलंडच्या वूटर बिर्डेडिक या जादूगाराने केलेला प्रयोग

ॐ

तथाकथित 'चमत्कार' हे शास्त्रीय अज्ञानातून जन्मतात
हे शास्त्रीय कसोट्यावर सिध्द करुन आंधळा जडवाद
(अनात्मवाद) मोडीत काढणाऱ्या सर्व आध्यात्मिक
(अतींद्रिय) शास्त्रज्ञांना हा ग्रंथ सादर समर्पण

All science is a function of the soul in which all knowledge is rooted. The soul is the greatest of all cosmic miracles, it is the **conditio sine qua non** of the world as an object.

**- C. J. Jung**

(quoted in **What Is Life** with **Mind and Matter** - E. Schrodinger, p. 119)

**अर्थ :** सर्व विज्ञान हे ज्यातून सर्व ज्ञान उगम पावते त्या आत्म्याचेच प्रकट रुप आहे. आत्मा नसता तर हे वस्तुनिष्ठ (दृश्य) जग अस्तित्वातच आले नसते. (आत्म्यातूनच हे दृश्य जग निर्माण झाले आहे.) म्हणून आत्मा हा सर्वात मोठा वैश्विक चमत्कार ठरतो.

**मथितार्थ :** 'चमत्कारांचे विज्ञान' म्हणजे आत्म्याचेच विज्ञान (आत्मज्ञान) आहे.

सी. जे. युंग


## ऋणनिर्देश

प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट केलेल्या अतींद्रिय घटनांच्या तपासणीत ज्या (त्या घटनांशी संबंधित) कुटुंबियांनी लेखकास सहकार्य केले आहे त्या सर्वांचा लेखक ऋणी आहे. त्यांच्या सहकार्याशिवाय ग्रंथरचनेचे उद्दिष्ट मुळीच सफल झाले नसते. ज्या ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथांचा उपयोग लेखकाने सढळ हाताने केला आहे त्यांचाही लेखक ऋणी आहे. लेखकास सर्व तऱ्हेचे सहकार्य व सहाय्य करण्यास नेहमीच तत्पर असलेले लेखकाचे परम स्नेही डॉ. सी. बी. देसाई व श्री. बी. बी. ऐदमाळे यांचा खास नामोल्लेख ऋणनिर्देशनात केला नाही तर तो कृतघ्नपणा ठरेल. शेवटी ग्रंथासाठी अत्यंत समर्पक असा पुरस्कार वेळेवर लिहून दिल्याबद्दल परमाब्धीकार प. पू. परमात्मराज उपाख्य राजीव महाराज यांचा लेखक अतिशय ऋणी आहे.

**प्राचार्य अद्वयानंद राघोबा गळतगे**


## * पुरवणी शुध्दिपत्रक *

| पृष्ट क्र. | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| १६७ | वरून ५ वी ओळ | उत्तरेला | दक्षिणेला |
| ३६७ | वरून ८ वी ओळ | ते गेले. | ते गेले.[१५५] |
| ४१८ | वरून ६ वी ओळ | म्हणजे ... | |
| | | .... समजावे | (हे वाक्य गाळावे) |
| ५२४ | (तळटीप) वरून २ री ओळ | वाडीवानासारखे | गाडीवानासारखे |
| ५४० | (तळटीप) खालून २ री ओळ | ५०४ | ५०३ व २१६ |
| ५५२ | खालून ३ री ओळ | १४० | २४० |
| ६४४ | खालून १० वी ओळ | विश्वासंबंधीचे | विश्वासासंबंधीचे |
| ६६० | वरून ३ री ओळ | glace | glance |

# प्रस्तुत ग्रंथाच्या वाचकांना महत्वाची सूचना

कोणत्याही नैसर्गिक घटनाप्रकारांना (natural phenomena)-मग ते घटनाप्रकार कितीही अप्रिय असोत किंवा कितीही विलक्षण (बुद्धीला न पटणारे) असोत-विज्ञान निर्भयपणे सामोरे जाते व त्याविषयीचे सर्व पुरावे नि:पक्षपातीपणाने तपासते, असे मानणाऱ्या शुद्ध विज्ञानवादी (विज्ञानावर शुद्ध प्रेम करणाऱ्या) लोकांसाठी हा ग्रंथ लिहिला आहे. त्यामुळे जे लोक स्वत:ला विज्ञानवादी म्हणवून घेतात पण विज्ञानाला अशा (बुद्धीला न पटणाऱ्या) घटनांचा विचार करण्याची आवश्यकता नाही असे मानून त्या घटनांच्या **खरेखोटेपणाविषयीच्या पुराव्यांची तपासणी** करण्याकडे दुर्लक्ष (किंवा डोळेझाक) करतात ते लोक वैज्ञानिकदृष्ट्या आंधळे (scientifically blind) ठरतात; आणि जे लोक ही (पुरावे तपासण्याची) आवश्यकता उघडपणे मान्य करतात पण प्रत्यक्षात ती तपासणी न करताच ते घटनाप्रकार खोटे म्हणतात किंवा त्याविषयी संशयवादी भूमिका जाहीरपणे स्वीकारतात, ते लोक वैज्ञानिकदृष्ट्या अप्रामाणिक (scientifically dishonest) ठरतात; आणि जे लोक अशा घटनाप्रकारांच्या (खरेखोटेपणाविषयीच्या) पुराव्यांची तपासणी करतात, पण ती विज्ञानलाजेस्तव केवळ उपचार म्हणून वरकरणी असते व आतून ते घटनाप्रकार खोटे ठरविण्यासाठी त्यांच्या तपासणीत (त्या घटनांची खोटी उपपत्ती देऊन) लबाडी करतात (मग त्याची कारणे काहीही असोत) ते लोक वैज्ञानिकदृष्ट्या दुटप्पी (scientific double-dealers) ठरतात. अशा या तीनही प्रकारच्या लोकांना-म्हणजे 'वैज्ञानिक आंधळे', 'वैज्ञानिक अप्रामाणिक' आणि 'वैज्ञानिक दुटप्पी' यांना-प्रस्तुत ग्रंथावर कोणत्याही प्रकारचा अभिप्राय जाहीरपणे व्यक्त करण्याचा **शास्त्रीय अधिकार नाही** याची वाचकांनी कृपया नोंद घ्यावी. जे वाचक वरील तिन्ही प्रकारात बसत नाहीत त्यांनी संपूर्ण ग्रंथ वाचल्याशिवाय आपला अभिप्राय व्यक्त करु नये अशी विनंती आहे.*

---

* वरील तीनही प्रकारच्या लोकांची वर्तणूक विज्ञानविरोधी व म्हणून ते एक प्रकारचे 'वैज्ञानिक पाप' असले तरी पहिल्या दोन प्रकारचे 'वैज्ञानिक पाप' विज्ञानरुपी काशीत जाऊन (म्हणजे वैज्ञानिक पुरावे तपासून) धुतले जाऊ शकते, पण शेवटचे 'वैज्ञानिक पाप'-म्हणजे 'वैज्ञानिक दुटप्पीपणा'-हे विज्ञानरुपी काशीतच जाऊन केलेले पाप असल्यामुळे ते कशानेही धुतले जाऊ शकत नाही. विज्ञान फसवणुकीवर कधीच चालू शकत नाही, हे त्याचे कारण आहे. वास्तविक 'वैज्ञानिक दुटप्पीपणा' हा शब्दप्रयोगच वदतोव्याघाती (self-contradictory) आहे. कारण विज्ञान आणि फसवणूक या परस्परविरोधी संकल्पना असून त्या एकत्र कधीच नांदू शकत नाहीत.

# पुरस्कार

प्रा. अद्वयानंद गळतगे यांच्या 'विज्ञान आणि चमत्कार' या ग्रंथात साधारणत: चमत्कारांमध्ये गणल्या जाणाऱ्या विविध घटनांचे संकलन असून त्या घटनांची वैज्ञानिक दृष्टिकोणातून समीक्षा केली आहे. लोकव्यवहारात चमत्कारसंज्ञेखाली वावरणाऱ्या विविध घटनांचे संकलन करण्यासाठी त्यांनी बरेच कष्ट घेतलेले आहेत, हे वाचकांना ग्रंथ वाचताना सहज ध्यानात येईल. काही घटना जिथे घडल्या तिथे प्रत्यक्ष जाऊन त्यांनी त्या घटनांविषयी शहानिशा करून घेण्याचा प्रयत्न केला आहे. काही घटना पौर्वात्य वा पाश्चिमात्य लेखकांच्या ग्रंथातील असून काही घटनांचे वर्णन वर्तमानपत्राच्या आधारे केलेले आहे. अशा विविध घटनांविषयी विवेचन करीत असताना त्यांनी भौतविज्ञानवेत्त्यांच्या मतांसोबतच धार्मिक वाङ्मयातील वचने उद्‌धृत केली आहेत. त्यांनी केलेली चमत्कारसमीक्षा वाचताना त्यांची अध्यात्मविद्येविषयीची निष्ठा दिसून येते. अशाप्रकारे चमत्कारांविषयी विश्लेषण करण्याचा प्रयास कौतुकास्पद आहे.

चमत्कारांविषयी अनेकांच्या मनांमध्ये अनेकविध कल्पना असतात. चमत्कारांच्या रूपांमध्येहि वैविध्य आढळून येते. चमत्कारांच्या मुद्यावरुन काही लोकांमध्ये वाद चालू असतात. त्यामुळे चमत्कार म्हणजे निश्चित काय, हे समजून घेणे आवश्यक आहे. वैयाकरणांना, भौतविज्ञानवाद्यांना, परामानसशास्त्रवेत्त्यांना व मूळ अध्यात्मवाद्यांना पटू शकेल, अशी चमत्काराची व्याख्या पुढीलप्रमाणे करता येईल.

विशेषबलवतीच्छाजन्याज्ञापालनरुपं मानसिकमन्नं चमच्चमत् पुष्टीभूतो विशिष्ट घटनाप्रकारो यो मन:केन्द्रं मनोचयं वा विस्मयरुपफलं चामयति स चमत्कार:॥ अर्थात् - 'विशेष बलवती इच्छा' जन्य आज्ञापालनरूप अशा मानसिक अन्नाचे सेवन करीत करीत पुष्ट झालेला विशिष्टघटनाप्रकार जो मन:केन्द्राला किंवा मन:समूहाला विस्मयरूपफळ सेवन करावयास लावतो; त्याला चमत्कार असे म्हणतात.

चमत्कारांच्या मुळाशी असलेली विशेष बलवती इच्छा ही वैश्विकमनाची, निसर्गाची किंवा नियतीची आहे, असे तुम्ही समजू शकता. काही ठिकाणी ही विशेष बलवती इच्छा विविधवर्गस्थ दैवते, विविधस्वर्गस्थदूत, महाभूतनिविष्टात्मे इत्यादिकांपैकी एकाची वा अनेकांची असू शकते. प्रसंगपरत्त्वे ही विशेष बलवती

इच्छा अवतारी महापुरुषांची वा अन्य महात्म्यांची असू शकते; सम्बन्धितविषयानुविष्ट व केन्द्रीभूतमनोयुक्त अशा योगभ्रष्टाची किंवा सामान्य माणसाची देखील असू शकते; क्वचित्प्रसंगी योगातिभ्रष्ट अशा मानवेतर प्राण्याची देखील असू शकते. एकूण तात्पर्य असे की, सृष्टीमध्ये घडणाऱ्या चमत्कारिक घटनांच्या मुळाशी व्यष्टिगत वा समष्टिगत विशेष बलवती इच्छा असते. या मुद्याची प्रस्तुत ग्रंथातील विविध उदाहरणांवरून कल्पना येईल.

चमत्काराचा विस्मयाशी सम्बन्ध असतो. विस्मय हा एक स्थायिभाव आहे. विस्मयोत्पत्तीच्या कारणामुळे ज्या घटनांना चमत्कार म्हणून संबोधले जाते, त्या सर्व घटना उपर्युक्त चमत्कारव्याप्तेत समाविष्ट होतात व त्यांचा अन्तर्भाव पुढील चमत्कारचतुष्टयात होतो.

१) **निसर्गचमत्कार** – खगोलकांची नियमबद्धता, मानवादिकांची शरीरयंत्रणा, बीजाचे वृक्षात रूपान्तर इत्यादि घटनांना निसर्गप्रेमी लोक 'निसर्गाचे चमत्कार' म्हणतात.

२) **प्रकलात्मक चमत्कार** – उत्तुंगप्रतिभाविलासातून जन्मलेल्या व सामान्य बुद्धींना विस्मयात पाडणाऱ्या जागतिक आश्चर्यरूप कलाकृती ह्या कलाप्रेमींना चमत्कारच वाटत असतात.

३) **भौतविज्ञानोपलब्धिरूप चमत्कार** – भौतविज्ञाननियमांची जाणीव करून घेऊन त्या नियमांच्या आधारे ज्या आश्चर्यकारक उपलब्धी मानवाला प्राप्त होतात; त्यांना साधारणत: विज्ञानाचे चमत्कार म्हणून संबोधले जाते. (उदा. दूरवाणी, दूरदर्शन, संगणक इत्यादि)

४) **अतीन्द्रियघटनारूप चमत्कार** – ज्या घटना भौतिक नियमांचे उल्लंघन करतात, त्यांना 'अतीन्द्रियघटनारूप चमत्कार' असे म्हणतात. पूर्वोक्त प्रथम तीन चमत्कार प्रकाराविषयी वाद नसतो; परन्तु हा तुरीय म्हणजे चौथा चमत्कारप्रकार अतीन्द्रियविश्वसम्बन्धित असल्याने जडवादी व अतीन्द्रियवाद्यांमध्ये वादाचा विषय ठरला आहे. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथात लेखकाने या चतुर्थ चमत्कारप्रकाराविषयी विशेषत्त्वाने ऊहापोह केलेला आहे.

जडवादी हे प्रचलित विज्ञानाला माहिती असलेल्या नियमांच्या आधारे प्रत्येक घटनेसंबंधी दृश्यस्तरावरच कार्यकारणभाव शोधण्याचा प्रयत्न करीत असतात. परन्तु कार्यकारणभाव हा दृश्य किंवा अदृश्य स्तरावर असू शकतो. त्यामुळे प्रत्येक घटनेसम्बन्धी कार्यकारणभावाची दृश्यस्तरावरच अपेक्षा बाळगणे अयोग्य असते. मूळ निर्गुणस्थितीमध्ये तर कोठलाहि कार्यकारणभाव नसतो. पुढे मायेच्या योगे

मायावी कार्यकारणभाव आढळतो. अविद्येमुळे (मायेमुळे) जगत् भासते, असे जेंव्हा म्हटले जाते; तेंव्हा अविद्या हे कारण व जगत् हे कार्य, असा त्याचा अर्थ होतो. परन्तु हा कार्यकारणभावदेखील जगद्रूप भ्रम सम्बन्धित आहे, असे दर्शविण्याकरिता अविद्येला कारणाध्यास व जगताला कार्याध्यास म्हटले जाते.

आता थोडेसे आधुनिक विज्ञानाच्या दृष्टिकोणातून बघू या. जगदुत्पत्तिविषयी महास्फोटसिद्धान्त (Big Bang Theory) प्रसिद्ध आहे. या सिद्धान्तानुसार "जगदुत्पत्ती क्षणापासून प्लँकयुग, कार्कयुग, हॅड्रानयुग व लेप्टॉनयुग अशी एकूण चार युगे एका सेकन्दात निघून गेलीत. त्यानंतरचे पाचवे युग (फोटॉनयुग) हे ७ लक्ष वर्षाचे मानले जाते. एका सेकन्दात चार युगे निघून जाण्याविषयी वैज्ञानिकांनी केलेले वर्णन हे वेदान्तातील जगताच्या मायिक उत्पत्तीसारखेच वाटत नाही काय ?

महास्फोट सिद्धान्तात वर्णिलेले व $१०^{-४३}$ सेकन्दापासून $१०^{-३५}$ सेकन्दापर्यन्त असलेले प्लँकयुग आजच्या भौतविज्ञानाचे नियम पाळीत नव्हते. एवढेच काय, तर आजहि भौतविश्वातील ब्लॅकहोल्स हे प्रचलित भौतविज्ञाननियमावलीचे पालन करीत नाहीत. असे असताना अतीन्द्रियघटनांनी भौतविज्ञानातील नियम पाळलेच पाहिजेत, असा दुराग्रह धरण्यात काय अर्थ आहे? आज भौतिकविश्वातील सगळी रहस्ये माहिती नसताना देखील जडवाद्यांची जी अत्यन्त दुराग्रही जडश्रद्धा ती अंधश्रद्धा नव्हे काय ?

जडश्रद्धाळू जडवाद्यांनी आपली अत्यन्त टोकाची जडश्रद्धा दूर करावी, या उद्देशाने श्री. गळतगे यांनी भौतविज्ञानातील बहुचर्चित अशा क्वाँटम सिद्धान्ताच्या आधारे कार्यकारणभावादि काही मुद्यांचा विचार केला आहे. आधुनिक भौतविज्ञानाच्या ग्रंथांमध्ये प्लँकच्या क्वाँटम सिद्धान्तावर जो मुख्य आक्षेप घेतला जातो, त्यासम्बन्धी थोडेसे लिहिणे महत्त्वाचे वाटते. "प्लँकच्या क्वाँटमसिद्धान्तावर आधारलेला बोहरचा अणुसिद्धान्त हा न्यूट्रल हेलियम व सिंगली आयोनाईज्ड लिथियम सम्बन्धात अपयशी ठरला आहे," अशाप्रकारे क्वाँटम सिद्धान्ताची मर्यादा दर्शविली जाते. परन्तु येथे हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे की - बोहरने क्लासिकल मेकॅनिक्सच्या संगतीने प्लँकचा क्वाँटमसिद्धान्त उपयोगात आणला होता. त्यामुळे काही बाबतीत अपयश येणे स्वाभाविक आहे. या अडचणीतून मार्ग काढण्यासाठी पुढे क्वाँटम मेकॅनिक्सचा उदय झाला. प्लँकच्या जुन्या क्वाँटम सिद्धान्ताला नवे रुप प्राप्त झाले. आता क्वाँटम मेकॅनिक्स मध्येहि काही अडचणी आहेत, हे भौतविज्ञान अभ्यासकांना मान्यच आहे. परन्तु याचा अन्वयार्थ केवळ एवढाच आहे की प्रचलित

भौतविज्ञानाला भौतिक रहस्ये देखील पूर्णपणे अजून उलगडता आलेली नाहीत. आज उपलब्ध असलेले क्वॉंटम सिद्धान्तासारखे सिद्धान्त अध्यात्मशास्त्राचे आपल्या परीने समर्थन करीत आहेत, हे श्री गळतगे यांनी पुष्कळ ऊहापोहपूर्वक दर्शविले आहे. आजच्या भौतविज्ञानाकडून एवढे समर्थन अध्यात्मविद्येला प्राप्त होत असेल तर तेहि नसे थोडके. जेव्हा भौतविज्ञान अत्यधिक प्रगत होईल तेंव्हा भारतीय अध्यात्मविद्येला ते डोक्यावर घेऊन नाचेल, यात संशय नाही.

'जगत् हे एक नाटक आहे' अशा दृष्टिकोणातून इच्छास्वातंत्र्याविषयी श्री. गळतगे यांनी आपले विचार मांडले आहेत. इच्छास्वातंत्र्य व इच्छापूर्ती या दोन मुद्यांचा वाचकांनी विचार केल्यास वाद टळेल. मनाच्या चंचलत्त्वामुळे जीवांमध्ये हजारो इच्छा निर्माण होत असल्या तरी त्यातील कोणत्या इच्छांची पूर्ती होते हा कर्मशास्त्रीय विमर्शाचा भाग आहे. जगन्नाट्यदृष्ट्या हा भाग कर्मसमुच्चयफलानुकूल नाट्यदिग्दर्शन करीत राहण्याचा भाग आहे, असे तुम्ही समजू शकता.

या जगात घडत असलेले यूफो, विशेष मरणानुभव इत्यादि चमत्कार हे नैतिक उन्नतीला हातभाग लावू शकतात, हेहि लेखकाने वर्णिले आहे. भानामत्यादिकांमधील अतीतामसप्रकारांचे वर्णन तत्प्रयोगप्रेरणार्थ नाही, तर ते केवळ जडवादनिरसन साहाय्यार्थ आहे, हे समजून घ्यावे. नवसप्रथादिकांमधील वचनभंगातून उद्भवणाऱ्या चमत्कारांचे वर्णन करण्यामागे लेखकाचा हेतू 'वचनभंग अयोग्य आहे' हे सांगावयाचा असून कोठल्याहि अनिष्ट वा अनावश्यक प्रथांचे समर्थन करण्याचा हेतू नाही. एकंदरीत विविध चमत्कारांचे वर्णन हे मुख्यतः चार्वाकमतनिरसनाचा प्रयत्न म्हणून आहे, हे लक्षात घ्यावे.

चमत्कारांच्या दृष्टिकोनातून जगदनुभवाचा विचार करावयाचा असल्यास निम्नलिखित जगदनुभवचतुष्क समजून घेणे गरजेचे आहे.

१) **अखिलचमत्कारान्वित जगदनुभव** - सम्पूर्ण जगताच्या रहस्यमयतेकडे बघणाऱ्यांना सम्पूर्ण जगत् हे चमत्काररूप वाटते. अशारीतीने अखिल चमत्कारान्वित जगदनुभव येतो.

२) **सीमितचमत्कारान्वित जगदनुभव** - लोकव्यवहारपातळीवर सर्व घटनाप्रकारांपैकी काही घटना प्रकारांनाच चमत्कार म्हणून संबोधले जाते. अशारीतीने सीमितचमत्कारान्वित जगदनुभव येत असतो.

३) **शून्यचमत्कारान्वित जगदनुभव** - भौत विश्वातील घटना ह्या भौतनियमानुसार तर अतीन्द्रिय विश्वातील घटना ह्या अतीन्द्रियविश्वनियमानुसार घडतात. या

दृष्टिकोणातून विचार केल्यास जगातील सर्व घटना नियमबद्धच आहेत. नियमोल्लंघन करणाऱ्या घटनांनाच चमत्कार असे नांव दिल्यास कोणत्याहि घटना चमत्कार ठरत नाहीत. ही दृष्टी बाळगल्यास शून्य चमत्कारान्वित जगदनुभव येतो.

**४) अनिर्वचनीयस्थित्यन्वित जगदनुभव** - याविषयी समजाविण्याकरिता चमत्कारेतर घटनाप्रकारांसाठी समुत्कार या संज्ञेचा प्रयोग करीत आहे.

विशिष्टकारणेन सह संपर्कं प्रणिदधती या विस्मयोत्पत्तिस्तस्या राहित्यस्याभिग्राहको यः सामान्यवर्तनयुक्तो घटनाप्रकारः स समुत्कारः ॥ अर्थात् विशिष्ट कारणाशी सम्पर्क धारण केलेली जी विस्मयोत्पत्ती तिच्या रहिततेचा अभिग्राहक असलेला जो सामान्यवर्तनयुक्त घटनाप्रकार तो समुत्कार होय. समुत्कार व चमत्कार या दोन्हीहून विलक्षण असे हे जगत् आहे, असे जेंव्हा वाटते तेंव्हा तो जगदनुभव अनिर्वचनीयस्थित्यन्वित जगदनुभव असतो.

हे जगदनुभवचतुष्क लक्षात घेऊन वाचकाने विचार केल्यास श्री. गळतगे यांनी केलेल्या विविध प्रकरणांमधील चमत्कारसमीक्षेत विरोधाभास आढळणार नाही. आपल्या ग्रंथात श्री. गळतगे एकीकडे चमत्कारांची वर्णने करतात तर दुसरीकडे चमत्कारच नाही म्हणतात, हे कसे काय ? असा प्रश्न वाचकांना पडू शकतो. त्याच्या उत्तराकरीता जगदनुभवचतुष्काचा विचार करावा.

जगदुत्पत्तिविषयीचा विचार करताना अजातवाद व विवर्तवादासोबतच दृष्टिसृष्टिवादहि आहे. या वादाचा लेखकाने प्रामुख्याने चमत्कारसमीक्षेकरिता वापर केलेला आहे. या वादपरत्वे मनानुसार सृजन आहे. सृजनाचा मनावर होणारा परिणाम दर्शविण्याकरिता सृष्टिदृष्टिवाद आहे. मन आणि सृजन यातील परस्परसम्बन्ध दर्शविणारी रेखा ही शून्याकाशात काढलेली रहस्यरेखा होय. या रहस्यरेखेतील रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न रहस्यवादी मण्डळी करीत असतात.

रहस्यशोधक किंवा त्यांच्या समर्थकांपैकी ज्या ज्या पौर्वात्य वा पाश्चिमात्य लेखकांनी ज्या काही चमत्कारिक घटना आपापल्या ग्रंथात नमूद केल्या आहेत; तसेच अन्यहि माध्यमांद्वारे ज्या काही तशा घटना प्रकट झालेल्या आहेत; त्यांची समीक्षा प्रा. गळतगे यांनी योग्यश्रद्धायुक्त अन्तःकरणाने केली आहे. त्यांच्या उर्वरितजीवनाकरिता सदिच्छा व्यक्त करून ही पुरस्करणाभिमुख ईक्षणरुपिणी अभीक्षा पुरी करतो.

**परमात्मराज (ऊर्फ राजीव महाराज)**
श्रीदत्त देवस्थान, आडी, ता. चिक्कोडी, जि. बेळगांव.

# लेखकाचे दोन शब्द

*जियेते अळुमाळु । रूपगुणांचा चाळुवाळु ।*
*ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥*

– **ज्ञानेश्वर**

( अर्थ : जिला रूपाची व गुणांची थोडी हालचाल करता येते ती स्त्री (प्रकृती) वाटेल तो खेळ आकाराला आणते. म्हणजे न घडणाऱ्या गोष्टी घडवते)

एकदा एका प्रवाशाने एका राजाला सारख्याच दिसणाऱ्या व सारख्याच आकाराच्या तीन बालकांच्या मूर्ती भेट म्हणून दिल्या. राजाला त्या मूर्तींचा अर्थ कळेना. म्हणून त्याने आपल्या राज्यातील शहाण्या लोकांची एक सभा बोलावली व त्यांच्यापुढे त्या मूर्ती ठेवून 'या तीन बालकांचे रहस्य कोण उलगडून दाखवेल काय?' असा त्यांना प्रश्न केला. पण कुणालाही त्या मूर्तींचे रहस्य उलगडता येईना. शेवटी एक वृद्ध गृहस्थ पुढे आला. त्याने राजाकडून एक लवचिक तार मागून घेतील व ती पहिल्या बालकाच्या कानात घातली. ती त्या बालकाच्या दुसऱ्या कानातून बाहेर आली. नंतर दुसऱ्या बालकाच्या कानात घातली, ती त्याच्या तोंडातून बाहेर आली. शेवटी तिसऱ्या बालकाच्या कानात घातली, ती बाहेर आलीच नाही. तो वृद्ध गृहस्थ राजाला म्हणाला, "महाराज, या जगात तीन तऱ्हेचे लोक आहेत असा ही बालके संदेश देतात. एक, एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून देणारे, दुसरे, ऐकलेले सर्वांना सांगत सुटणारे आणि तिसरे, ऐकलेले सर्व मनातच ठेवून घेणारे." राजाने त्या वृद्ध गृहस्थाच्या शहाणपणाचे कौतुक करून त्याला मोठे बक्षीस दिले.

या तीन बालकांच्या मूर्तीप्रमाणेच शास्त्रज्ञांचेही तीन वर्ग पडतात. एक, ऐकलेले किंवा पाहिलेले 'चमत्कार' रूढ विज्ञानाच्या नियमात बसत नसल्यामुळे 'खोटे' म्हणून सोडून देणारे; दुसरे, ऐकलेले किंवा पाहिलेले 'चमत्कार' खरे म्हणून स्वीकारले तर आपली शास्त्रज्ञ म्हणून असलेली इभ्रत जाईल या भीतीने ते मनातच ठेवून घेणारे; आणि तिसरे, ऐकलेले किंवा पाहिलेले 'चमत्कार' दुसऱ्यांना सांगणारे

व त्यांच्या खरपणाचा शहानिशा करून घेण्यासाठी शास्त्रीय संशोधनाचा जाहीर आग्रह धरणारे. हा ग्रंथ या शेवटच्या शास्त्रज्ञांच्या वर्गाचे प्रतिनिधित्व करतो.

म. गांधींच्याकडे तीन माकडांच्या मूर्ती होत्या हे प्रसिद्धच आहे. एका माकडाने दोन्ही हातांनी आपले कान झाकून घेतले आहेत, दुसऱ्याने आपले दोन्ही डोळे झाकून घेतले आहेत, तर तिसऱ्याने आपले तोंड झाकून घेतले आहे. वाईट ऐकू नये, वाईट पाहू नये, वाईट बोलू नये असा संदेश ती माकडे देतात. 'वाईट'च्या जागी 'चमत्कार' गृहीत धरले तर 'चमत्कार' ऐकायचे नाहीत, 'चमत्कार' पाहायचे नाहीत, व 'चमत्कार' सांगायचे नाहीत हे ब्रीद पाळणाऱ्या हल्लीच्या बहुसंख्य रूढीवादी शास्त्रज्ञांचे ही माकडे प्रतिनिधित्व करतात असे म्हणता येईल. हा ग्रंथ अशा शास्त्रज्ञांचा जाहीर निषेध करणाऱ्यांचे प्रतिनिधित्व करतो.

या ग्रंथाची भूमिका शुद्ध विज्ञानवादी आहे. (शुद्ध विज्ञानात 'दैवी' शक्तीला (Divine Power) किंवा परमेश्वराला (Personal God) अजिबात स्थान नाही. सर्व घटना प्राकृतिक आहेत असे शुद्ध विज्ञान मानते व त्यांची नैसर्गिक (Natural) उपपत्ती शोधते. पण नैसर्गिक उपपत्ती हे दुधारी शस्त्र आहे. ते जसे अंधश्रद्धेवर प्रहार करते तसे जडवादी तत्त्वज्ञानावरही प्रहार करते! आणि हीच जडवादी लोकांची सर्वात मोठी अडचण आहे. कारण सर्वच नैसर्गिक घटना जडवादी तत्त्वज्ञानात बसत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. म्हणून ते या शुद्ध विज्ञानशास्त्राच्या दुसऱ्या 'धारे'कडे नेहमीच व पद्धतशीरपणे दुर्लक्ष करीत असलेले दिसून येतात. ती 'धार' जणू अस्तित्वातच नाही असे ते समजतात; नव्हे, ते त्यांचे मूलभूत गृहीतकृत्य असून त्या गृहीतकृत्यावरच त्यांचे कथाकथित 'विज्ञान' उभे आहे. या विज्ञानाला आत्मवंचक विज्ञान - अर्थात डोळे झाकून दूध पिणाऱ्या मांजराच्या जातीचे व म्हणून 'खोटे विज्ञान' - म्हणता येईल. या आत्मवंचक व खोट्या विज्ञानाला उघडे पाडणे, त्याचे खरे स्वरूप वाचकांपुढे ठेवणे हा या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे.

आदिकालातील मानव ज्या नैसर्गिक घटनांमागील कार्यकारणभाव त्याला कळत नव्हता अशा घटनांची 'चमत्कार' म्हणून पूजा करीत होता. (प्लेग, कॉलरा इत्यादी साथीच्या रोगांच्या मरीआईसारख्या देवता अशा 'चमत्कारां'चे पूजास्थानीय अवशेष म्हणून आजही समाजात आहेत.) अजूनही अशा अनेक नैसर्गिक घटना आहेत की ज्यांचा (शास्त्रीय) कार्यकारणभाव मानवाला माहीत झालेला नाही. प्रश्न असा आहे की, अशा घटनांची आदिकालिक मानवाप्रमाणे 'चमत्कार' म्हणून पूजा करायची का? की त्यांच्या पाठीमागचा कार्यकारणभाव शास्त्रीय निकषाखाली तपासून समजून घेण्याचा प्रयत्न करायचा? की अशा घटना घडतच नाहीत, घडणे शक्य नाही असे म्हणून (शत्रूला पाहून) वाळूत डोके खुपसणाऱ्या शहामृगाची भूमिका स्वीकारायची? दुर्दैवाने काही शास्त्रज्ञ अशी भूमिका स्वीकारताना दिसून येतात. ही

भूमिका आत्मवंचक, अवैज्ञानिक व म्हणून पूर्णपणे त्याज्य होय, हे या ग्रंथात वाचकांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न केला आहे.

## या ग्रंथाच्या मथळ्याविषयी थोडेसे

प्रस्तुत ग्रंथाला दिलेल्या मथळ्यातील 'चमत्कार' या शब्दाविषयी थोडे लिहिले पाहिजे. भौतिकवादी विज्ञानाने (Materialist Science) स्वत:ला घालून घेतलेल्या मर्यादेत घडणाऱ्या घटनाच सत्य होत, या मर्यादेबाहेर घडणाऱ्या घटना असत्य होत या अर्थाने - अशा घटनांना उद्देशून - 'चमत्कार' हा शब्द नेहमी वापरला जातो. या दृष्टीने (म्हणजे भौतिकवादी विज्ञानाच्या दृष्टीने) 'चमत्कार' असत्य (किंवा अशक्य) ठरतात. दुसऱ्या शब्दात या भौतिकवादी शास्त्राच्या दृष्टीने 'चमत्कार' घडत नाहीत. त्या शास्त्राच्या मर्यादेत ते कदाचित घडत नसतील. पण त्या शास्त्राच्या मर्यादेबाहेर ते घडतात की नाही हे त्या शास्त्राच्या मर्यादेत राहून कसे कळणार किंवा ठरवणार? त्यासाठी ती मर्यादा ओलांडून बाहेर आले पाहिजे. कारण त्या शास्त्राच्या मर्यादेबाहेर कार्य करणारी इतर अनेक शास्त्रे आहेत. अशा शास्त्रांचेही नियमबद्ध असे एक स्वतंत्र शास्त्रीय जग असून या शास्त्रीय जगात कसलेही 'चमत्कार' घडत नाहीत. उलट ज्यांना हे भौतिकवादी शास्त्रज्ञ 'चमत्कार' म्हणतात, ते या शास्त्रीय जगाच्या नियमानुसार घडणाऱ्या वास्तविक नैसर्गिक घटनाच असतात. भौतिकवादी शास्त्रज्ञ आपल्या भौतिकशास्त्राच्या बाहेर असे नियमबद्ध शास्त्रीय जगच अस्तित्वात नाही असे काही म्हणू शकणार नाहीत. त्यांनी असे म्हणणे म्हणजे एखाद्या विहिरीतील बेडकांनी विहिरीच्या बाहेर दुसरे पाण्याचे जगच अस्तित्वात नाही असे म्हणण्यासारखे आहे. हा ग्रंथ वाचकांना या संकुचित दृष्टीच्या बेडकांच्या विहिरीतून बाहेर काढून विशाल अशा अतींद्रिय सागराचे दर्शन घडवितो. ते जग वाचकांनी पाहावे, कुतूहल व करमणूक म्हणून नव्हे, तर गंभीरपणे व शास्त्रीय अभ्यासूवृत्तीने, असे लेखक त्यांना आवाहन करतो. या नव्या अतींद्रिय विषयाच्या अभ्यासातून वाचकांना जगाकडे पाहण्याची एक नवी वैज्ञानिक दृष्टी प्राप्त होईल अशी लेखकाला आशा वाटते. तशी दृष्टी त्यांना प्राप्त व्हावी म्हणूनच हा ग्रंथ लिहिला आहे. तशी ती प्राप्त झाली तर लेखक हा ग्रंथ लिहिल्याचे सार्थक झाले असे समजेल.

■■■

# ग्रंथ वाचण्यापूर्वी

**विज्ञान म्हणजे काय ?**

विज्ञान म्हणजे केवळ सत्यासाठी सत्याचा शोध [शुध्द ज्ञानाची उपासना] होय.

- **वेब्स्टर** (quoted in **Isis Unveiled** - Vol. I. - M. Blavatsky, p. 88)

**विज्ञान कोण निर्माण करतात ?**

ज्यांना सत्याकडे जाण्याची व ते समजून घेण्याची जबरदस्त ओढ लागली आहे, असे लोकच केवळ विज्ञान निर्माण करु शकतात.

**- आईन्स्टाइन (Ideas and Opinions, p. 46)**

**सत्याकडे जाण्याची इच्छा कोणाला असते ?**

प्रत्यक्ष सत्याकडे जाण्याची इच्छा फारच थोड्या लोकात असते आणि त्याचे स्वरुप समजून घेण्याची कुवत तर त्याहूनही कमी लोकात असते. 'मी सत्याचा शोध घेतो' असे जेव्हां लोक म्हणतात, तेव्हा खरे तर त्यांना म्हणायचे असते की 'मी माझ्या पूर्वग्रहांना आधार शोधतो.'

माणसाच्या मनाचा (पूर्वग्रहांना वश होण्याचा) हा कमकुवतपणा सर्वसामान्य असून त्यापासून शास्त्रज्ञही सुटू शकत नाहीत.

**- सार्जेंट कॉक्स** (quoted in **Isis Unveiled** Vol. I. p. 615)

**'वैज्ञानिक सत्य' कशाला म्हणतात ?**

एखादी गोष्ट आपल्याला माहीत नाही म्हणून ती खोटी म्हणता येत नाही. आजच्या आपल्या विज्ञानात एखादी घटना बसत नाही याचा अर्थ आजचे विज्ञान बदलणार नाही [ती घटना उद्याचे विज्ञान आपल्यात सामावून घेणार नाही] असा होत नाही. 'काहीही निश्चित नसणे' हेच विज्ञानात नेहमी निश्चित असते. आता हेच पाहा की [आईन्स्टाइनने विज्ञानात प्रस्थापित केलेली व शंभर वर्षे 'सत्य' म्हणून भौतविज्ञानात रुढ झालेली] प्रकाशाचा वेग कधीही बदलत नाही ही कल्पना हल्ली खोटी ठरली आहे.

**- कीथ टट्ट (True Life Encounters, p.206)**

**'चमत्कार' कशाला म्हणावे ?**

एखादा विशिष्ट दृष्टिकोन स्वीकारुन आपण त्यालाच चिकटून बसल्यामुळे (चमत्कार खरे की खोटे याविषयीचे) सर्व वाद निर्माण होतात. आणि त्यामुळेच

'चमत्कार' ही निर्माण होतात. वास्तविक निसर्गात चमत्कार नावाची गोष्टच नसते. सर्व घटना नैसर्गिकच असतात. (नाहीतर त्या घडल्याच नसत्या.) ज्या घटना आपणास समजत नाहीत त्यांना आपण 'चमत्कार' हे नांव देतो. म्हणजे नैसर्गिक घटना समजून घेण्याच्या आपल्या असमर्थतेतून 'चमत्कार' निर्माण होतात. जितकी आपली असमर्थता अधिक तितके 'चमत्कार' ही अधिक.

- **अद्वयानंद गळतगे (विज्ञान आणि बुध्दिवाद,** पृ. १७)

**अप्रिय सत्याचे कथन व श्रवण**

अप्रिय पण पथ्यकारक (सत्य) सांगणारे व ते ऐकणारे हे दोघेही दुर्मीळ आहेत.

- **वाल्मिकी रामायण** (अरण्यकांड, ३७.२)

*पृ. २५१ वर योगानंदांचे शरीर मृत्यूनंतर २० दिवस ताजे राहिले असल्याचे म्हटले आहे. कोकटनूर (ता. अथणी, जि. बेळगाव) येथील यल्लम्मा (रेणुका) देवस्थानाचे पूजारी कै. मीनप्पा बाळाप्पा यांचे शव ११ महिने ताजे असल्याची बातमी ' विजय कर्नाटक' या कानडी दैनिकाच्या २६ जुलै २००३ च्या अंकात प्रसिध्द झालेली वाचून लेखक प्रत्यक्ष तेथे जाऊन ती खरी असल्याची स्वत:ची खात्री केली आहे. या पूजाऱ्यांच्या घराण्याची ही परंपराच असून ज्येष्ठ पुत्राचेच फक्त शव असे ताजे राहते. (३६ वर्षापूर्वी वारलेल्या त्या घराण्यातील व्यक्तीचे शव असेच ११ महिने ताजे राहिले असल्याचे सांगण्यात आले.) पूजारी मेल्यानंतर देवस्थानाजवळील तळघरात त्याचे शव बसलेल्या अवस्थेत ठेवण्यात येते व दरवाजा बंद करण्यात येतो. ११ महिन्यानंतर तो उघडण्यात येतो व त्या शवाची विल्हेवाट लावण्यात येते. हा त्या देवीचा महिमा मानण्यात येतो.*

*पृ. २६५ वर 'तेलाशिवाय २१ वर्षे जळणारे तीन कंदील' या पोट मथळ्याखाली वर्णिलेल्या कंदीलांना ग्रंथप्रकाशनाच्या वर्षी २५ वर्षे होतात.*

*संदर्भ टीप क्र. (२३२) मध्ये पुढील मजकूर जास्तीचा वाचावा :*

***स्वरुपत :*** *गणपतीची मूर्ती कृत्रिम मानसिक (artificial elemental) असली तरी **तत्त्वत:** ती निसर्ग देवता आहे, हे लक्षात ठेवावे.*

## ※ अनुक्रमणिका ※

# भाग १ - विलक्षण वास्तवे


| अ.नं. | प्रकरण | पान. नं. |
|---|---|---|
| १ | कागवाडची भानामती | १ |
| २ | रेठरे बुद्रुकची भानामती | २९ |
| ३ | एका कुटुंबाला सतत दहा वर्षे छळणारी विलक्षण भानामती | ४५ |
| ४ | भेंडवाडची सर्वासमक्ष घडणारी भानामती | ५४ |
| ५ | कवठेगुलंदची भानामती | ५९ |
| ६ | एका संपूर्ण गावाला पीडणारी भानामती | ६४ |
| ७ | वि.स. पागे यांना चोखोबांचा साक्षात्कार | ६९ |
| ८ | एक आधुनिक अग्निदिव्य | ७९ |
| ९ | महाभारतातील आकाशवाणीचे शास्त्रीय सत्यत्व | ९१ |
| १० | आपुले मरण पाहिले म्या डोळा : नचिकेत उपाख्यानाचे वैज्ञानिक संशोधन | १०२ |
| ११ | शून्यातून वस्तुनिर्मिती - अर्थात् सूर्यविज्ञान | १४६ |
| १२ | पैशांना जेव्हां पाय फुटतात | १५३ |
| १३ | श्रध्दा जेव्हां मूर्त रूप धारण करते | १६६ |
| १४ | पैसे देणारी भानामती | १९१ |
| १५ | एका गावातील तीन चमत्कारयुक्त अनुभव | १९६ |


# भाग २ - विलक्षण वास्तवांचे विज्ञान


| | | |
|---|---|---|
| १६ | विज्ञान आणि चमत्कार | २०७ |
| | ❑ विज्ञान आणि 'चमत्कार' यांच्यात खरोखर विरोध आहे काय ? | २०९ |
| | ❑ तथाकथित चमत्कारांचे वैज्ञानिक संशोधन | २१८ |
| | ❑ भौतिक जगात दडलेली व संकट काळी प्रकट होणारी अतींद्रिय शक्ती | २२१ |
| | ❑ संदेश देण्यासाठी प्रकट होणारी अतींद्रिय शक्ती | २२४ |
| | ❑ शरीरद्वारा प्रकट होणारी अतींद्रिय शक्ती | २३० |
| | ❑ भौतिक जग व चमत्कारांचे जग यामध्ये सीमारेषा आहे काय ? | २३८ |
| | ❑ चमत्कार आणि ईश्वर | २४५ |
| | ❑ 'डोळसपणा' व 'आंधळेपणा' यांची शास्त्रीय व्याख्या | २४७ |
| | ❑ काही अशक्य कोटीतील अतींद्रिय घटना | २५० |
| | ❑ अन्नपाण्याशिवाय जगणारी माणिक्यम्मा | २५३ |
| | ❑ मनुष्य हा देह नाही, आत्मा आहे हे सिध्द करणारी गिरिबाला | २५६ |

❑ मनुष्य देह नाही, आत्मा आहे हे सिध्द करणारे आणखी 'चमत्कार' २५८
❑ श्रध्दारूपी अन्नावर जगलेली थेरेसा न्यूमन २६२
❑ तेलाशिवाय २१ वर्षे जळणारे तीन कंदील २६५
* तेलाविना जळणाऱ्या दीपांची इतर उदाहरणे / २७१
* शून्यातून वस्तुनिर्मितीचे इतर प्रकार / २७२
❑ शस्त्र चालू न शकलेली बळीची बकरी २७४
❑ शस्त्र न चालण्याच्या 'चमत्कारां'ची साथ २७६
❑ अतींद्रिय शक्तीची विविध रूपे २७९
* गायीचे वासरू संस्कृत श्लोक म्हणते /२७९, * मूक प्राण्याशी बोलणारा किंबाल / २८२, * ॐ काराचा जप करणारी मिसी कुत्री / २८५, * आपण होऊन संस्कृत श्लोक लिहिणारा लाकडाचा तुकडा / २८९, * सद्गुरूच्या व विविध देवतांच्या रूपाने प्रकटणारी अतींद्रिय-शक्ती / २९४, * अंगाचा दाह करणारी अतींद्रिय शक्ती /२९९, * अग्नीच्या रूपाने प्रकटणारी अतींद्रिय शक्ती / ३००, * शिष्याला मारलेल्या छडीचे वळ गुरूच्या पाठीवर / ३०१, * विचार व भावना यातून मूर्त रूपाने प्रकटणारी अतींद्रिय शक्ती / ३०४, * गरम नैवेद्याने देवाच्या जिभेवर फोड / ३०९, * निर्जीव वस्तूतून सजीव रक्त निर्माण करणारी अतींद्रिय शक्ती/ ३१०, * न शिकलेल्या इंग्रजी भाषेतून अस्खलित भाषण / ३१२,
* पूर्वजन्माचे स्मरण करून देणारी अतींद्रिय शक्ती / ३१५
❑ अतींद्रिय दृष्टी, संमोहन आणि पुनर्जन्म संशोधन ३१९
* अतींद्रियदृष्टीने पुढील जन्माचे अचूक भाकीत / ३२४
❑ आकाशलेखन (Akashic Record) ३२७
❑ थिऑसाफी, भगवद्गीता आणि योगसिध्दी ३२९
❑ ब्रह्मविद्या, भानामती आणि विज्ञान ३३३
* ब्रह्मवादी ब्लॅव्हेट्स्की मृतात्मविद्येच्या प्रसारक का बनल्या ? / ३३६
❑ मॅडम ब्लॅव्हेट्स्की यांचे काही चमत्कार ३३८
❑ संकल्पशक्तीचा एक 'चमत्कार' ३४६
❑ मॅडम ब्लॅव्हेट्स्की यांची भानामती ३४८
❑ मॅडम ब्लॅव्हेट्स्की यांचा कृत्रिम मृतात्मा (भूत) ३५१
❑ ब्लॅव्हेट्स्की यांची 'यक्षिणी विद्या' ३५२
❑ मानसलेखन व आकाशलेखन विषयक 'चमत्कार' ३५४
❑ भानामतीची मीमांसा ३५८
❑ नरसोबावाडीतील दत्तमंदिराच्या पुजाऱ्याच्या घरी भानामती ३६४
❑ विविध रूपानी भेटणाऱ्या निसर्गदेवता ३६९
❑ अस्तित्वात नसलेल्या ओढ्यात अंघोळ ३७५
❑ 'आज्ञाधारक भानामती' अर्थात् जादू ३८०
❑ ईश्वर-गारुड्याची विश्वनिर्मितीची जादू ३८१
❑ भानामती, जादू व विश्वनिर्मिती यातील साम्य ३८४
❑ ऑलकॉट यांचे संपूर्ण हृदयपरिवर्तन करणारा एक 'चमत्कार' ३८८
❑ आकाशगमनाची सिध्दी ३८९
❑ स्थूल देहानेही आकाशगमन होते ? ३९२
❑ 'चमत्कारां'चा (वेदांती) निषेध ३९२
❑ एकाच वेळी 'चमत्कार' हे खरे आणि खोटे, हे कसे ? ३९७
❑ अदृश्य पातळीवरुन मदत ३९९

❑ वस्तू 'अदृश्य' कशी करता येते ? ४०१
❑ अस्तित्वात नसलेली वस्तू दृश्य कशी करता येते ? ४०६
❑ दृश्यरूप धारण करणारी 'कृत्रिम भानामती' ४१०
❑ जिवंत माणसांच्या वासना 'पिशाच' बनतात ४१८
❑ कर्मणो गहना गति : । ४२१
❑ 'गणपतीचा चमत्कार' ४२५
❑ गणपतीचा असाही एक अनुभव ४२८
❑ प्राणीहत्या निषिध्द असलेल्या देवता ४२९
❑ पाश्चात्यांची आधुनिक पुराणकथा : यूफो ४३१
❑ 'यूफो' कथा म्हणजे नव्या बाटलीतील जुनीच दारु ४३६
❑ पुराणे ही माणसाची भावनिक गरज ४४०
❑ 'यूफो' व भानामती यामधील काही साम्ये ४४५
❑ 'यूफो,' मरणानुभव आणि मानवाचे आध्यात्मिक पुनरुत्थान ४४६
❑ देवदूत : आणखी एक पाश्चात्यांचे पुराण ४५०
❑ नवस न फेडल्याचे परिणाम ४५५
❑ कर्मदेवता, लोकपाल आणि विश्वव्यवस्था ४५८
❑ कर्म, कर्मफल आणि विधिलिखित ४५९
❑ विधिलिखित आणि मानवाचे इच्छास्वातंत्र्य ४६३
❑ ईश्वरेच्छेविरुध्द एक संभाव्य आक्षेप ४७२
❑ 'अर्थपूर्ण घटना' (Synchronicity) ४७४
* फ्रॉइडला हादरून सोडणारी भानामती / ४८०, * ८०० वर्षांनंतर घडलेली अर्थपूर्ण घटना / ४८३, * काही अर्थपूर्ण अंक / ४८४, * ज्योतिष व कर्म : विश्वव्यवस्थेचा भाग / ४८७
❑ खरी ठरलेली भविष्यसूचक स्वप्ने व भाकिते ५०४
❑ नाडीभविष्य: 'आकाशलेखना'चा निर्णायक पुरावा ५१२
❑ मानवाचे 'इच्छा स्वातंत्र्य' हे ईश्वराचेच 'इच्छा स्वातंत्र्य' ५१९
❑ कार्यकारणभाव आणि 'अर्थपूर्ण' घटना : भौतशास्त्रीय चिकित्सा ५२५
* स्थूल-सूक्ष्म हा भेद अशास्त्रीय / ५३१
❑ जडचेतनामधील क्वॉंटम अभेदत्व ५३५
* सूक्ष्म-स्थूलभेद कसा निर्माण होतो ?/ ५३७
❑ क्वॉंटम सिध्दांत आणि विश्वाचे अखंडत्व ५४२
❑ विश्वाचे नियम कोणाकडून वा कसे निर्माण होतात ? ५५२
❑ क्वॉंटम सिध्दांत आणि नियतीवाद ५६१
❑ क्वॉंटम सिध्दांत आणि परामानसशास्त्र ५६४
❑ विज्ञान आणि अध्यात्म ५७७
❑ समारोप ५८३
❑ संदर्भ व टीपा ५८५
❑ परिशिष्ट - १
चमत्कार विषयावर एका बुध्दिवाद्याशी ग्रंथकर्त्याचा झालेला पत्रव्यवहार ६२५
❑ परिशिष्ट - २ नाडी भविष्यासंबंधी एका अंधश्रध्दानिर्मूलनवाद्याशी ग्रंथकर्त्याचा झालेला पत्रव्यवहार ६५२
❑ परिशिष्ट - ३ ब्रह्मविद्या खोटी ठरवू पाहणारे जेव्हां स्वत:च खोटे ठरतात ६५७
❑ परिशिष्ट - ४ दृष्टिक्षेपात ब्रह्मविज्ञान ६६०

# प्रकरण पहिले

# कागवाडची भानामती *

*जो जेथ जैसे पाहो वैसे ।*
*तया तेथ तैसेचि असे ।।*
*- ज्ञानेश्वर*

---

## प्रत्यक्षात तेथे काय घडले?

दैनिक 'तरुण भारत'च्या २४ नोव्हेंबर, १९८४ च्या अंकामध्ये कागवाड (जि. बेळगाव) येथे विष्ठा पडण्याचा प्रकार घडत असल्याची बातमी वाचल्यानंतर आम्ही त्याची शहानिशा करण्यासाठी स्वतः जाण्याचे ठरविले. वृत्तपत्रातून भानामतीच्या बातम्या अलीकडे बऱ्याच वेळा प्रसिद्ध झालेल्या आहेत. काही लोक कुतूहल म्हणून त्या वाचतात, इतरांना सांगतात व नंतर विसरतात; तर स्वतःला बुद्धिवादी म्हणवून घेणारे इतर काही लोक हा सर्व अंधश्रद्धेचा भाग आहे, यात शुद्ध बनवेगिरी असते असे समजून तिकडे दुर्लक्ष करतात. प्रत्यक्ष ज्यांच्या घरी हे प्रकार घडतात ते लोक मात्र मंत्रतंत्र, ताईत, लिंबू, देवऋषी यांच्या पाठीमागे लागून हा त्रास नाहीसा करण्याचा प्रयत्न करीत असल्याचे आढळून येते. खरा प्रकार काय हे जाणून घेण्याचा प्रयत्न मात्र फार थोडे लोक करतात असे आढळून येते.

आम्ही कागवाडला गेलो, तेव्हा या घटनांची शहानिशा करण्यासाठी कोणीही

---

* हा शोधलेख बेळगाव दै. 'तरुण भारत'च्या २५, २६ व ३० डिसेंबर, १९८४ व १० व १७ जाने. १९८५ या अंकांतून क्रमवार प्रसिद्ध झाला.

आले नव्हते असे आम्हाला आढळून आले. मात्र वृत्तपत्रातून बातमी प्रसिद्ध होताच ज्यांच्या घरी हे भानामतीचे प्रकार घडत होते त्यांना अनेक लोकांकडून 'आम्ही हा प्रकार (मंत्र तंत्र इत्यादी) दैवी उपाय करून बंद करू' अशा आशयाची पत्रे आली होती. अशा आशयाची चार-पाच पत्रे संबंधित लोकांनी आम्हाला दाखविली. ती पाहिल्यानंतर आम्हाला असे वाटले, की ज्याप्रमाणे एखादा रोग झाल्यानंतर त्यावर उपचार करणारे तज्ज्ञ (स्पेशालिस्ट) डॉक्टर असतात त्याप्रमाणे या भानामतीच्या प्रकारावर उपचार करणारे तज्ज्ञही समाजात असून त्यांचाही व्यवसाय समाजात डॉक्टरांप्रमाणे सुरळीतपणे चालू असावा. या आमच्या कल्पनेला जेथे भानामती घडली त्या घरात गेल्यानंतर दुजोरा मिळाला. कारण त्या घरात बऱ्याच ठिकाणी लिंबे, नारळ टांगलेले दिसून आले. काही ठिकाणी ते पुरले असल्याचेही घरच्या लोकांनी सांगितले. समाजाला डॉक्टर व इतर तंत्रज्ञांप्रमाणेच या मांत्रिकांची व देवऋषींचीही खरोखरच गरज आहे काय, सामाजिक स्वास्थ्य टिकविण्यात या लोकांचाही खरोखरच हातभार लागत असतो काय, असा प्रश्न साहजिकच आमच्यापुढे निर्माण झाला. ज्यांना सामाजिक प्रश्नांविषयी तीव्र जाणीव व आस्था आहे अशा लोकांनी भानामतीसारखे प्रकार का घडतात याचा वस्तुनिष्ठ व वैज्ञानिक दृष्टीने शोध घेण्याची आवश्यकता आहे, असे आम्हाला याच कारणासाठी वाटते. आमचा स्वत:चा प्रयत्न याच भावनेने प्रेरित होऊन केलेला आहे. सामाजिक प्रश्नांविषयी आस्था असणाऱ्यांनी व स्वत:ला बुद्धिवादी म्हणवून घेणाऱ्यांनी असे प्रकार अंधश्रद्धेच्या नावाखाली झटकून टाकणे म्हणजे स्वत:वरची सामाजिक जबाबदारी टाळणे होय असे आम्हाला वाटते. अर्थात, हा शोध घेताना नेहमीच यश येईल असे नाही. पण अशा अनेक प्रयत्नांतून काहीतरी निश्चित हाती लागेल व त्याचा सत्यशोधनाला व अशा प्रकारचे प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने निश्चित उपयोग होईल असा आमचा विश्वास आहे.

## आमचा दृष्टिकोण

आम्ही प्रथमच स्पष्ट करू इच्छितो की आमचा हा शोधप्रयत्न कोणत्याही पूर्वग्रहातून प्रेरित झालेला नाही. आम्हाला भानामती हा प्रकार काय आहे हे माहीत नाही व हा प्रकार खरा की खोटा याविषयीही आमचे स्वत:चे काही मत नाही. हे सर्व प्रत्यक्ष शोध करून वैज्ञानिक कसोट्यांवर ठरावयाचे आहे असे आमचे प्रामाणिक मत आहे. म्हणूनच आम्ही कोणत्याही निष्कर्षाला येण्याची घाई केलेली नाही. आम्हाला प्रत्यक्षात काय घडले आहे ते शोधून काढावयाचे आहे आणि जनतेला सांगावयाचे आहे. आम्हाला जे आढळून आले ते खोटे असून सत्य वेगळे आहे असे कोणाला पुराव्यानिशी दाखवून द्यावयाचे असेल, तर ते आम्ही ऐकण्यास व स्वीकारण्यास

तयार आहोत. वैज्ञानिक सत्य हे खुल्या व मुक्त वातावरणातच प्रस्थापित होऊ शकते अशी आमची धारणा आहे.

## आमची तपासाची पद्धत

आम्ही या भानामतीचा प्रकार प्रत्यक्ष पाहणाऱ्या वीस लोकांच्या मुलाखती घेतल्या असून त्यांनी केलेल्या निवेदनावर, ती निवेदने शपथेवर खरी असल्याबद्दल शेवटी त्यांच्या स्वाक्षऱ्या (अशिक्षित लोकांच्या अंगठ्याचे ठसे) घेतले आहेत. या मुलाखती शक्यतो एकेकट्यांच्या घेण्याची दक्षता घेतली आहे. त्यामुळे कल्पना किती व सत्य किती हे ठरविणे आम्हास सुलभ झाले आहे. काही लोकांच्या मुलाखती सामूहिकपणे घेतल्या असून साक्ष देताना एकमेकांनी परस्परांची विधाने तेथल्या तेथे दुरुस्त करून सांगितल्यामुळे अचूक माहिती मिळविण्याच्या दृष्टीने आम्हाला त्याचा उपयोग झाला आहे. घटना, क्रम, तारखा व वेळ ठरविण्याच्या दृष्टीने हे अधिक उपयुक्त ठरले आहे. प्रत्यक्षात घडलेल्या घटनांच्या बाबतीत कोठेही दुमत किंवा परस्परविरुद्ध विधाने आढळून आलेली नाहीत, हे येथे नमूद केले पाहिजे. ज्या मुलीच्या सान्निध्यात भानामतीचे प्रकार होत होते त्या मुलीची मुलाखत कागवाडमध्ये न घेता बसरगी (जि. कोल्हापूर) या मुलीच्या गावी घेतली असल्याने कागवाडच्या लोकांच्या विधानांशी मुलीची विधाने ताडून पाहण्यास व त्यात कोणत्या फालतू गोष्टी आहेत व कोणत्या गोष्टी लपवून ठेवल्या आहेत हे ठरविण्यास त्यामुळे सोपे झाले आहे. अशा गोष्टींचा उल्लेख योग्य त्या ठिकाणी केलेला आहे.

## या भानामतीची वैशिष्ट्ये

या भानामतीचे वैशिष्ट्य म्हणजे मानवी विष्ठा नको त्या ठिकाणी पडणे, लागणे, दिसणे इत्यादी असून हा सर्व प्रकार दहा वर्षांच्या एका मुलीभोवती घडत होता असे आढळून आले आहे. ती मुलगी परगावी गेली तरी तेथेही हा प्रकार चालू होता. तो अमावास्येला सुरू होऊन पौर्णिमेला बंद झाला असल्याचे आढळून आले आहे. पण तो एकदम बंद न होता हळूहळू कमी होत बंद झाला आणि सुरुवातीलाही या प्रकाराने हळूहळू जोर धरला असून दीड महिन्याच्या मध्यास त्याने उच्चांक गाठला असल्याचे दिसून आले आहे. या घटनांचा काळाच्या दृष्टीने आलेख काढला तर ज्याला विज्ञानामध्ये (अनेक वैज्ञानिक घटनांच्या बाबतीत आढळून येत असल्यामुळे) Bell-Shaped (घंटेच्या आकाराचा) आलेख म्हणतात, तसा आलेख मिळतो.

## घटनांचा क्रम

ज्या घरातील मुलीभोवती विष्ठा पडण्याचा प्रकार घडत होता, त्या घरात

मात्र प्रथम विष्ठा न पडता शेजारच्या पण त्यांच्याच नात्यातील लोकांच्या घरी प्रथम विष्ठा पडली. बुधवार दि. २४ ऑक्टोबर, १९८४ या दिवशी (त्या दिवशी अमावास्या होती) श्री. तमाणा पिरूजैन उर्फ घोसरवाडे (घ. नं. ५५०) यांच्या लाकडी दरवाज्याला उंबरठ्यापासून तीन फूट उंचावर मध्यभागी कोणी तरी शेणी थापल्याप्रमाणे विष्ठा थापली होती आणि तिच्यावर थापणाऱ्याची बोटेही उमटली होती. ही घटना त्या दिवशी संध्याकाळी सहा वाजता सौ. कमल पिरूजैन ही शेतातून परतल्यानंतर शांता या मुलीने दाखवल्यानंतर तिला समजली. शांता ही दहा वर्षे वयाची मुलगी मूळची बसरगी ता. गडहिंग्लज जि. कोल्हापूर (महाराष्ट्र) येथील असून तिची थोरली बहीण बाळंत झाल्यानंतर तिचे मूल सांभाळण्यासाठी तिच्या आई-वडिलांनी तिला कागवाड, ता. अथणी, जि. बेळगाव (कर्नाटक) या सौ. बेबी जयपाल मालगावे (शांताची बहीण) हिच्या सासुरवाडीस आणून ठेवले होते. पण घटनेनंतर तेरा दिवसांनी म्हणजे बुधवार दि. ७ नोव्हेंबर १९८४ या पौर्णिमेच्या दिवशी शांता हिने एक हिरवे पातळ नेसलेली बाई संध्याकाळी सात वाजण्याच्या सुमारास श्री. तवनाप्पा धनपाल कुडचे यांच्या घराच्या चौकटीला विष्ठा लावून जात असलेली पाहिली. तिच्या हातात एक ताट असून त्यावर शुभ्र फडके झाकले होते. ती बाई आपल्याकडे रागाने पाहात होती असे शांता म्हणते. लगेच तिने त्या घरातील सौ. रुपा कुडचे या बाईला जाऊन ही गोष्ट सांगितली. एवढ्यात ती बाई पळाली. ही विष्ठा उजवीकडील भिंतीला थापली होती. (रुपा कुडचे हिचे घर शांताच्या घरासमोर आहे.)

दुसऱ्या दिवशी सौ. बेबी जयपाल मालगावे (शांताची थोरली बहीण) हिच्या घराच्या उत्तरेला असलेल्या कट्ट्यासारख्या भिंतीला विष्ठा लावलेली शांता हिला दिसली. यानंतर दोन दिवसांनी पुन्हा कुडचे यांच्या घराच्या डावीकडील भिंतीला विष्ठा थापली होती. त्यानंतर पुन्हा दुसरे दिवशी मालगावे यांच्या घरी उजवीकडील भिंतीला विष्ठा थापलेली शांता हिलाच दिसली. ही विष्ठा थापताना थोडी खाली पडली होती. त्या विष्ठेत लोकांना तीळ, मोहरी, बडीशेप, एक काळी मिरी आणि आणखी कसले तरी चिंचेच्या बीसारखे बी अशा वस्तू दिसल्या.

यानंतर दुसरे दिवशी सौ. बेबी जयपाल मालगावे यांच्या घराच्या दक्षिणेला असलेल्या जनावरांच्या गोठ्यात दरवाज्याच्या कोपऱ्यात विष्ठा पडलेली दिसली. त्या विष्ठेत एक तीन-चार इंच लांबीची काडी टोचली होती व काळा दोराही त्या ठिकाणी पडलेला होता. (हा दोरा व विष्ठा यांचा काही परस्परसंबंध नसावा असे जयपाल म्हणतो.) गोठ्यात सलग दोन दिवस लागोपाठ त्याच ठिकाणी विष्ठा पडलेली दिसली. जेव्हा जेव्हा विष्ठा दिसली, त्या त्या वेळी प्रथम शांतानेच ती पाहिल्याचे सर्वजण (शांतासुद्धा) सांगतात हे यासंबंधी लक्षात ठेवले पाहिजे.

### अन्नामध्ये विष्ठा

मालगावे यांच्या गोठ्यात ज्या दिवशी दुसऱ्या वेळी विष्ठा पडलेली दिसली, त्याच दिवशी दुपारी साडेबाराच्या सुमारास मालगावे यांच्या घरी अन्नात विष्ठा पडल्याचे आढळून आले. हे प्रथम शांतानेच बेबीला (आपल्या बहिणीला) सांगितले. यावेळी जेवणे झाली होती. शांताने भाकरीवर विष्ठा पडल्याचे प्रथम भाकरी उघडून दाखवले. नंतर भाताच्या भांड्यावरचे झाकण काढून "यात पडलीय का पाहू," असे म्हणत शांताने "हे पाहा यातही पडलीय!" असे म्हणून त्यात पडलेली विष्ठा बेबीला दाखविली. नंतर दोडक्याची भाजी असलेले भांडे तिने झाकण काढून "पाहूया यात आहे का?" असे म्हणून पाहिले व त्यातही विष्ठा पडल्याचे तिने बेबीला दाखवले. यानंतर "पाहूया दुधात आहे का?" असे म्हणून ती दुधावरचे झाकण काढणार इतक्यात बेबी म्हणाली, "थांब तू पाहू नकोस. मीच पाहते." असे म्हणत बेबीने दुधाचे झाकण स्वतःच काढून पाहिले, तर त्यात विष्ठा नव्हती.

येथे असा प्रश्न उपस्थित होतो, की अन्नात विष्ठा पडल्याचे शांताला कसे कळले? ज्या ज्या भांड्याचे झाकण तिने काढले त्या त्या भांड्यात हटकून विष्ठा आढळून आली असल्याने, तिनेच त्या त्या भांड्यात अगोदर विष्ठा टाकली होती का? असे जर असेल तर दुधाच्या भांड्यातही विष्ठा आढळून यावयास पाहिजे होती. कारण दुधावरील झाकण काढण्यासाठीसुद्धा ती पुढे झाली होती. पण त्यात विष्ठा नव्हती. याविषयी बेबीचे मानसशास्त्रही अभ्यासण्याजोगे आहे. बेबीने शांताला दुधाचे झाकण काढण्यास का मनाई केली? ज्या ज्या भांड्यात शांता पाहते, त्या त्या भांड्यात विष्ठा दिसते असे तिला आढळून आले; म्हणजे एखादे भांडे तिने पाहिले नाही तर त्यात विष्ठा दिसणार नाही असे बेबीला वाटले आणि हा तिचा तर्क बरोबर ठरला! की हा योगायोग होता? ते काही असो, त्यानंतर इतर कोणत्याही अन्नपदार्थात विष्ठा दिसली नाही एवढे खरे.

येथून पुढे विष्ठा अन्नातच नव्हे तर शांताच्या जेवणाच्या ताटात व डोक्यावर पडण्यास सुरुवात झाली. या प्रकरणी पुढील अमावास्येपर्यंत चांगलाच जोर धरला.

## विष्ठा कशी पडते यासंबंधीचे प्रयोग

ज्या दिवशी स्वयंपाकात विष्ठा पडलेली दिसली त्याच दिवशी स्वतः शांता या मुलीच्या डोक्यावर मध्यभागी विष्ठा पडली आणि तिनेच ती प्रथम इतरांनाही दाखवली. येथून पुढे शांताच्या डोक्यावरच सारखी विष्ठा पडू लागली. हा प्रकार हळूहळू वाढू लागला. एके दिवशी अंथरुणातून उठताक्षणीच मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडली. डोक्यावर विष्ठा पडण्याचा प्रकार सतत घडू लागल्यामुळे काही

लोकांनी मुद्दाम याबाबतीत प्रयोग करण्याचे ठरविले व तिच्या डोक्याला फडके बांधून तिला घराच्या आत बसविले. हा प्रयोग करताना शेखर शिवगौंडा पाटील (वय २४) हा एल. एल. बी. च्या पहिल्या वर्षात असणारा तरुण तिच्या जवळ दोन फूट अंतरावर उभा होता. इतरही अनेक व्यक्ती जवळ उभ्या होत्या. यावेळी मुलगी दोन्ही हाताचे अंगठे आपल्या डोक्याच्या दोन्ही बाजूला लावून व दोन्ही पंजे पसरून बोटे हालवू लागली. हे पाहून शेखर लोकांकडे पाहात "ही अशी का करते?" असे म्हणत आहे तोच मुलगी एकदम ओरडली. त्यामुळे त्याचे तिच्याकडे लक्ष गेले. तेव्हा तिच्या डोक्यावर विष्ठा पडलेली दिसली. अशा रीतीने विष्ठा प्रत्यक्ष पडताना दिसली नाही, पडल्यानंतरच दिसली, असे यावेळी हजर असलेल्या इतर लोकांनीही सांगितले आहे.

यानंतर मुलीच्या डोक्याला पुन्हा कापड बांधून बसविले. यावेळी विष्ठा पडली नाही, मात्र शांता "मला 'तू इथे का आलीस? तुझ्या गावी जा' असे म्हणते आणि मला दिसते." असे म्हणून रडू लागली. "तुला कोण काय म्हणते? कोण दिसते?" असे तिला विचारले तर ती नुसतीच "दिसते" असे म्हणत असे. तसेच 'चिव् चिव्' असा आवाज ऐकायला येतो असेही ती म्हणत असे. (या सर्व गोष्टी मुलीच्या स्वतंत्र जबानीतूनही उघड झाल्या आहेत.) मुलीच्या डोक्यावर दिवसातून अनेकदा विष्ठा पडल्यामुळे व तिचे डोके प्रत्येक वेळी धुण्याचा सपाटा चालू ठेवल्यामुळे मुलीची अवस्था अत्यंत वाईट झाली होती, ती थंडीने सारखी कापत होती असे सर्वांच्या जबानीतून स्पष्ट झाले आहे.

## बसरगीला प्रयाण

अशा प्रकारे शांताच्या डोक्यावर विष्ठा पडण्याचे प्रकार वाढल्यामुळे तिला बसरगी (ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर) या तिच्या गावी पाठविण्याचे ठरले व तिला घेऊन जयपाल (वय २५) हा तिच्या बहिणीचा नवरा आणि सुभाष चौगुले (वय २६) हा शेजारी राहणारा त्याचाच नातेवाईक हे दोघे बसरगीला गेले. बसरगीला ते चार वाजता पोचले. एका तासाने म्हणजे पाच वाजण्याच्या सुमारास शांता घराबाहेर उभी असताना तिच्या डोक्यावर विष्ठा पडली. हेही प्रथम तिनेच सांगितल्यानंतर इतरांना कळले.

दुसरे दिवशी सकाळी आठ वाजता पुन्हा तिच्या डोक्यावर विष्ठा पडली. त्यानंतर त्याच गावच्या यल्लम्मा अंगात संचारणाऱ्या माणसाला बोलावून आणण्यात आले. मुलगी विहिरीकडे जाताना तिच्या डोक्यावर विष्ठा पडते हे निदर्शनास आले असल्यामुळे तो देवऋषी तिच्याबरोबर विहिरीकडे गेला. (बसरगीत मुलीचे घर गावच्या पश्चिमेला एक किलोमीटर अंतरावर मळ्यात आहे.) पण विष्ठा पडली

नाही. नंतर तिला एकटीलाच पाठविले. तेव्हा मात्र विष्ठा पडली. दोन वाजेपर्यंत येथे चारपाच वेळा मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडली. तो देवऋषी म्हणाला, "हा भानामतीचा प्रकार असून कागवाड गावीच कोणी तरी तो केला आहे. तेव्हा मुलीला कागवाडलाच नेले पाहिजे." त्याच दिवशी परत त्या मुलीला घेऊन जयपाल, सुभाष, मुलीचा बाप (सावंता शिखरे, वय ६०) हे स्वत: देवऋषीसह कागवाडला आले.

कागवाडला आल्यानंतर थोड्याच वेळात रात्री नऊ वाजता मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडली. हेही तिनेच सांगितले. दुसरे दिवशी बारा वाजता मुलगी जेवत असताना दोन घास खाल्यानंतर ताटातील भातात विष्ठा पडली. नंतर ती हात धुऊन बाजूला बसली असता तिच्या ओठांना विष्ठा लागली. हेही तिनेच दाखविले. यावेळी सावंता शिखरे, जयपाल, बेबी, देवऋषी, कमल पिरुजैन (शेजारची नातेवाईक बाई) इतके लोक मुलीजवळ बसले होते.

यानंतर पंधरावीस मिनिटांनी मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडू लागली, म्हणून मुलीच्या डोक्याला फडके बांधले; तरी डोक्यावरील फडक्यावरही विष्ठा पडू लागली. म्हणून पॉलिथीन डोक्याला बांधले, त्यावर मात्र पडली नाही. पण हनुवटीला विष्ठा लागली. हनुवटी धुतल्यानंतर गालाला लागली. गाल धुतल्यानंतर दुसरीकडच्या गालाला लागली. नंतर डाव्या डोळ्यावर विष्ठा पडली. म्हणून पॉलिथीन सोडले आणि पुन्हा फडके बांधले, तर पुन्हा फडक्यावर विष्ठा पडली. त्या दिवशी देवऋषी व जयपाल शेताकडे गेले असता घरी शांताच्या अंगात संचार झाला. म्हणजे ती बडबडू लागली व भंडार उधळू लागली. यावेळी काय झाले आपणाला माहीत नाही, असे शांता म्हणते. अशा अवस्थेत गावात दुसऱ्या गल्लीत राहणाऱ्या आणापा बाळेशा कटारे (वय ७०) यांच्या घराच्या कट्ट्यावर ती जाऊन बसली. नंतर देवऋषी येऊन त्याने तिला परत घरी आणले. संध्याकाळी आणापा कटारे मालगावे यांच्या घरी येऊन "आमच्या घरी मुलगी का येऊन बसली? आम्ही चेटूक केले असा आपला आरोप आहे काय?" असे विचारू लागला; तेव्हा "आमचा आपल्यावर कसलाच आरोप नाही व संशयही नाही," असे सांगून हे प्रकरण मिटविण्यात आले.

यानंतर मुलीला यल्लम्माच्या देवळात नेण्यात आले. देवळातही मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडली. नंतर बसरगीचा देवऋषी बसरगीस परत गेला.

## अन्नात विष्ठा कशी पडते यासंबंधीचा प्रयोग

मंगळवार दि. २० नोव्हेंबर रोजी कागवाडचे माजी सरपंच श्री. सिदगौडा गुरुसिद्धगौडा पाटील (वय ३५) बी. ए., श्री. मनोहर दामोदर सरनोबत (वय ५१), शिक्षण पूर्वीची मॅट्रिक, श्री शिवगौंडा मलगौंडा पाटील, प्रतिष्ठित नागरिक, चावडीतील

कारकून ए. जी. पाटील, तलाठी कांबळे इत्यादी अनेक लोक अन्नात विष्ठा पडत असल्याचे ऐकून मालगावे यांचे घरी ते पाहण्यास मुद्दाम आले. घरी तयार केलेले उप्पीट श्री. शिवगोंडा पाटील यांनी स्टील प्लेटमध्ये घालून मुलीला खाण्यास दिले. त्यातून मुलीने दोन घास खाल्ले व चेहरा वेडावाकडा केला, काही अंगविक्षेपही केला. तेव्हा तिला घरात थोडे आत बसविण्यात आले. यावेळी घरचे व इतर लोक तिच्या भोवती होते, ती पुन्हा उप्पीट खाणार इतक्यात, "ही पाहा प्लेटमध्ये विष्ठा आहे" असे लोक म्हणाले. उप्पीटमध्ये लेंडकासारखी विष्ठा सर्वांनी पाहिली, पण प्रत्यक्ष पडताना ती कोणीच पाहिली नव्हती. दुसरे दिवशी, म्हणजे बुधवार दि. २१ नोव्हेंबर रोजी कोणीतरी शांती करण्यास सांगितल्यामुळे जयपाल याने घरी बस्तीतून देव आणून पूजा करून नैवेद्याची चार ताटे तयार केली. या चारी ताटातील सोजी, भात, दूध, तूप इत्यादी पदार्थांत विष्ठा पडली.

दुसरे दिवशी म्हणजे गुरुवार, २२ नोव्हेंबर रोजी (या दिवशी अमावास्या होती) जयपाल मालगावे व सुभाष चौगुले हे दोघेही बसरगीस देवऋषीकडे जाऊन आले. यानंतरही मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडतच होती. पण त्याचे प्रमाण हळूहळू कमी होत होते. इतर मांत्रिकाचे उपचारही चालू होते. दि. २ डिसेंबर रोजी एका मांत्रिकाच्या सांगण्यावरून जयपालच्या कुटुंबाने घर सोडले व सुभाष चौगुले यांचे घरी ते स्वयंपाक करू लागले. पण तेथेही मुलीच्या डोक्यावर एकदा विष्ठा पडली. परत ६ डिसेंबरला ते घरी आले. त्या दिवशी दुपारी १२॥ वाजता घराला कडी घातलेली असताना शांता हिने शेजारची शाणक्का कुडचे (वय ३५, शिक्षण ६ वी) या बाईला बोलावून आणले व तिला "दाराची कडी काढ, विष्ठा पडली आहे का पाहू या," असे म्हणाली. (कडी उंच असल्याने शांताचा हात तेथे पोचत नव्हता.) शाणक्का हिने कडी काढली आणि शांता, शाणाक्का व सुरेश खोत (वय २०, एस्. एस्. एल्. सी.) हे तिघेजण आत गेले. विष्ठा दिसली नाही. म्हणून सर्वजण बाहेर आले. पुन्हा शांता आत गेली व आतूनच येथे विष्ठा पडली आहे असे म्हणाली. तेव्हा शाणाक्का आणि सुरेश यांनी आत जाऊन पाहिल्यानंतर पूर्वी जेथे विष्ठा नव्हती त्या ठिकाणी आता विष्ठा दिसली. ही विष्ठा एक माणूस एकदा करतो इतकी होती व त्यामध्ये एक उदबत्ती टोचली होती. शिवाय एक सुई व बिब्बाही होता.

## शेवटची घटना

मांत्रिकाच्या सांगण्यावरून पुन्हा सात तारखेस आपले घर सोडून तमाणा पिरुजैन (कमल पिरुजैन हिचा नवरा) यांचे घरी जयपालचे कुटुंब स्वयंपाकासाठी व राहण्यास आले. त्याच दिवशी सकाळी मुलीला परत बसरगीला घेऊन जयपाल

एकटाच गेला. त्या दिवशी बसरगीत मुलीच्या डोक्यावर एकदा विष्ठा पडली. त्यानंतर तेथे तिच्या डोक्यावर कधीच विष्ठा पडली नाही. कागवाडमध्येही त्यानंतर विष्ठा कधी पडली नाही. त्या दिवसापासून मुलगी बसरगीस असून हा प्रकार अजिबात बंद झाला आहे. याविषयी स्वत: मुलीचे म्हणणे काय आहे याची व इतर काही घटनांची चर्चा आता करावयाची आहे.

# हा बनाव आहे काय?

आम्ही शांता या मुलीची मुलाखत बसरगी (जि. कोल्हापूर) येथे घेतली तेव्हा तिच्या तोंडून कागवाड (जि. बेळगाव) येथील लोकांकडून न मिळालेली माहिती मिळाली. ती माहिती प्रत्यक्ष भानामतीशी संबंधित नाही असं वाटल्यामुळे कदाचित संबंधित लोकांनी सांगितली नसावी; पण हे प्रकरण संपूर्ण समजण्याच्या दृष्टीने ती माहिती असणे आवश्यक आहे असे वाटल्यावरून आम्ही ती येथे देत आहो. तत्पूर्वी शांताने भानामतीसंबंधी आम्ही विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देताना, भानामतीशी संबंधित पण फक्त तिलाच आलेले जे अनुभव तिने सांगितले आहेत, ते प्रथम सांगणे आवश्यक आहे.

## शांताला दिसणाऱ्या बाहुल्या

शांताला आम्ही भानामतीसंबंधी निरनिराळे प्रश्न विचारत असताना तिने आपण होऊन आम्हाला अशी माहिती पुरविली, की तिला विष्ठा पडण्याचे प्रकार घडत असताना नेहमी चार लहान मुलांच्या आकाराच्या बाहुल्या दिसत होत्या. त्या पुरुष की स्त्रिया हे ती सांगू शकत नाही, मात्र त्या हालचाल करीत असाव्यात असे तिच्या सांगण्यावरून वाटते. त्या लाकडी असाव्यात असाही तर्क करता येतो. याविषयी ती निश्चित असे काहीच सांगत नाही. या चार बाहुल्यांपैकी तीन बाहुल्या शांत स्वभावाच्या असून एक बाहुली 'वांड' आहे (हा तिचाच शब्द आहे.) असे ती म्हणते. या 'वांड' बाहुलीच्या हातात कुऱ्हाड असून "तू इथे का आलीस? तुझ्या गावी जा. त्या मुलाला दे, नाहीतर तू कोठेही गेलीस तरी तुला सोडत नाही" असे ती कागवाडमध्ये असताना तिला म्हणत असे, असे ती सांगते. पण गंमत अशी, की बसरगी येथेसुद्धा या बाहुल्या तिला दिसत होत्या. एकदा बसरगीत ती शेतात असताना त्या वांड बाहुलीने तिच्या आडवे होऊन तिला घरी जाऊ दिले नाही असे ती म्हणते. यावेळी तिच्याबरोबर तिच्याच वयाचा एक मुलगाही होता व ती त्याला "एक बाहुली माझ्या आडवे झाली आहे. ती मला पुढे जाऊ देत नाही," असे म्हणू लागली. तेव्हा त्या मुलाने "कोठे आहे बाहुली? मला तर दिसत नाही" असे म्हणताच, "ही काय मला दिसते आहे" असे ती म्हणू लागली. ही गोष्ट खरी

असल्याबद्दलची खात्री त्या मुलाला यासंबंधी प्रश्न विचारून आम्ही करून घेतली. आपणाला बाहुल्या दिसतात असे तिने बसरगीच्या तिच्याच मळयाजवळ राहणाऱ्या शंकर भीमराव थोरात (वय ३८) या शेतकरी असलेल्या तिच्या ओळखीच्या माणसाला सांगितल्याचे स्वत: थोरात यांचेकडून आम्हाला कळले.

एकदा तर (आणि ही माहिती नवीन आहे) त्या बाहुलीने काडी ओढून शांताच्या हातात दिली व बाळूचा शर्ट पेटविण्यास सांगू लागली. (बाळू हा मूळचा कारदगा, ता. चिक्कोडी, जि. बेळगाव येथील राहणारा असून तो जयपाल मालगावे याचा भाचा आहे. हल्ली तो आपल्या मामाकडे कागवाडला असतो.) ''पेटव नाही तर तुला तोडतो'' असे ती बाहुली म्हणू लागल्याचे शांता सांगते. भिऊन आपण बाळूचा शर्ट पेटविल्याचेही ती सांगते, मात्र लगेच आपणच तो विझविल्याचेही सांगते. विझवताना आपला हात पोळला, हातांना फोड आले, ते नंतर सुईने फोडले, मलम लावलं इत्यादी माहितीही यासंबंधी खोदून प्रश्न विचारता तिने पुरवली. ही माहिती नवीन असल्यामुळे आम्ही परत कागवाडला जाऊन यासंबंधी संबंधित लोकांना प्रश्न विचारल्यानंतर खालील माहिती मिळाली.

## शर्ट जाळण्यामागे हात कोणाचा?

बुधवार दि. ५ डिसेंबर रोजी (७ डिसेंबरला मुलीला शेवटचे बसरगीला नेले) जयपाल मालगावे याचा भाचा बाळू (उर्फ आपासाहेब आणापा व्हनवाडे) यांचा टेरीकॉटचा शर्ट पाठीमागे शांताने पेटविला. तो पेटविताना तिला कोणी पाहिलेले नाही. ही घटना त्या दिवशी दुपारी दीडच्या सुमारास घडली. शर्ट पाठीमागे ५ इंच रूंद व ४ इंच लांब असा जळलेला असून तो जळल्याचे शांतानेच प्रथम श्री. सुकुमार भाऊ चौगुले (वय २६) बी. ए. या शेजारच्या व्यक्तीस घरी नेऊन मुद्दाम दाखवले; मात्र ''कोणी जाळले, कसे जाळले मला काही माहीत नाही'' असे ती म्हणाली. नंतर शेजारची सौ. कमल पिरूजैन (ही तिचीच नातेवाईक) तेथे येऊन ''कोणी जाळले खरे सांग'' असे विचारू लागली. शांता आपणास माहिती नसल्याचे पुन:पुन्हा सांगू लागली. तेव्हा कमलने तिला भरपूर मार दिला. या मारामुळे ती अर्धा तास रडत होती. पण जाळल्याचे तिने कबूल केले नाही. त्या दिवशी रात्री जयपालने तिला प्रेमाने जवळ बसवून यासंबंधी विचारले, तेव्हा तिने शर्ट आपणच जाळल्याचे सांगितले; पण देवाला उदबत्ती लावल्यानंतर उदबत्तीने शर्ट जळला असे ती म्हणाली. तसेच विझवताना तिच्या हाताला फोड आले वगैरे गोष्टी खोट्या असल्याचे सांगितले.

आता प्रश्न असा आहे, की शांता स्वत:च शर्ट जाळून खोटे का बोलली? दुसरा प्रश्न असा की शांताने शर्ट का जाळला? भीतीने ती खोटे बोलली असे

समजले तरी दुसरा प्रश्न शिल्लक राहतो. आम्हाला बाहुलीने स्वत: काडी ओढून पेटविण्यास ती आपल्या हातात दिली असे तिने सांगितले, तर जयपालला उदबत्तीने शर्ट पेटला असे सांगितले; यापैकी खरे कोणते? उदबत्तीने शर्ट पेटणे शक्य नसल्याने तिने जयपालला खोटे सांगितले हे उघड आहे. पण तिला बाहुल्या दिसत होत्या हे तिचे म्हणणे क्षणभर खरे मानले तरी बाहुलीने काडी ओढून आपल्या हातात दिली हे तिचे म्हणणे कितपत स्वीकारार्ह आहे? कदाचित तिला आपणाला काय सांगावयाचे आहे ते नीट उमजले नसेल वा सांगता आले नसेल. शर्ट पेटविण्यामागे बाहुलीची प्रेरणा होती एवढाच अर्थ तिच्या बाजूने फार तर आपण काढून त्याचे समर्थन करू शकू. पण ही बाहुलीची गोष्ट तिने जयपालपासून लपवून ठेवून उदबत्तीने जळले हे खोटेच समर्थन का केले? बाहुलीच्या गोष्टीवर त्याचा विश्वास बसणार नाही असे तिला वाटले असणे शक्य आहे. ही बाहुल्यांची गोष्ट ती कागवाडमध्ये कुणालाही न सांगता बसरगीत सांगते आणि तेही भानमतीचा प्रकार थांबल्यानंतर यालाही अर्थ आहे. कागवाडमध्ये ती अत्यंत गोंधळलेल्या मानसिक अवस्थेत होती आणि भानमतीचा प्रभाव ओसरल्यानंतर तिचा मानसिक तोल पूर्वस्थितीवर आला, असे एक त्याचे समर्थन करता येणे शक्य आहे.

कदाचित बाहुल्यांची तिची गोष्ट खोटी असून आम्हाला तिने बनविले असेल. पण ही बाहुल्यांची गोष्ट फक्त आम्हालाच सांगितलेली नसून इतरांनाही तसे काही कारण नसताना सांगितलेली असल्याने आम्हाला बनवण्याची शक्यता फारच कमी आहे. विशेष म्हणजे आपल्या सवंगड्याबरोबर खेळताना ती बाहुलीने माझी वाट अडवली असे थांबून सांगते व बराच वेळ तेथे ती जागची न हालता राहते ही गोष्ट बाहुल्यांचे प्रकरण निव्वळ काल्पनिक म्हणून झटकून टाकणे सोपे नाही, हे स्पष्ट करण्यास पुरेशी आहे. शेजारच्या शंकर भीमराव थोरात या ओळखीच्या माणसास काही विशेष कारण नसताना आपणाला बाहुल्या दिसतात असे तिने सांगितले आहे. हेही लक्षणीय आहे.

शर्ट जाळण्यापाठीमागची मानसिक अवस्था व कारणमीमांसा कोणतीही असली तरी भानामतीच्या संदर्भात ही घटना घडली असल्याने तिचे महत्त्व नाकारता येत नाही. म्हणून ती घटना येथे थोड्या विस्ताराने दिली आहे.

## ही भानामती आहे की बनाव आहे?

शांताने शर्ट पेटविला असल्याने विष्ठाही तीच टाकत नसेल कशावरून, असा साहजिकच येथे प्रश्न उपस्थित होतो. म्हणजे हा विष्ठा पडण्याचा प्रकार भानामतीचा नसून त्या मुलीचा अगर दुसऱ्या कोणाचा तरी बनाव नसेल कशावरून? यासंबंधी आम्हाला स्वत:चा तर्क लढविणे व कोणताही निष्कर्ष काढणे अस्थानी व

घाईचे वाटते. शिवाय या क्षेत्रातील आमचे ज्ञानही तुटपुंजे असल्यामुळे यासाठी लागणारी पात्रताही आमच्याजवळ नाही. तथापि, काही गोष्टींची चर्चा केली तर ती येथे अस्थानी होणार नाही असे वाटते.

घराच्या भिंतीला किंवा दाराला शेणीप्रमाणे विष्ठा थापणे, घरात विष्ठा टाकणे, अन्नात, जेवणाच्या ताटात विष्ठा टाकणे, डोक्यावर विष्ठा ठेवणे, गालाला, हनुवटीला, ओठांना विष्ठा लावणे इत्यादी किळसवाणे प्रकार करून कोणाला काय साधावयाचे आहे हे समजणे आमच्या तरी बुद्धीच्या पलीकडचे आहे. काही मनोरुग्ण व्यक्तींना यात एक प्रकारचा आनंद अगर समाधान मिळते असे समजले, तरी हे प्रकार अमावास्येला का सुरू केले व पौर्णिमेला का बंद केले, दीड महिनाच का केले, सुरुवातीला हळूहळू हे प्रकार वाढवून मध्यास त्यांचा जोर करून पुन्हा हळूहळू ते कमी का केले हे समजणे कठीण आहे. हे सर्व योगायोगाने झाले (किंवा हे प्रकार करणाऱ्या व्यक्तीचे वेळापत्रक असेच जमले) असे गृहीत धरले तरी हे करणारी व्यक्ती कोण असावी असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. कारण ही विष्ठा काही आपोआप पडत नव्हती, ती कोणीतरी टाकत होते हे निश्चित; मग ती कोण टाकत होते? बसरगी गावातही मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडत होती ही गोष्ट लक्षात घेता ही व्यक्ती कागवाडहून बसरगीला मुलीच्या पाठोपाठ आली होती काय? पण कागवाडहून बसरगीला जयपाल व सुभाष यांच्याखेरीज कोणीच गेले नाहीत. पण बसरगीमध्ये हे दोघे जवळ नसताना मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडली आहे त्याचे काय? त्यावेळी तिच्याजवळ कोणीच नव्हते. ती एकटीच विहिरीकडे जात असता तिच्या डोक्यावर विष्ठा पडली. यावरून मुलगी स्वत: आपल्या डोक्यावर विष्ठा टाकून घेत असली पाहिजे असे म्हणावे लागते. आणि ज्या ज्या वेळी कोठे विष्ठा दिसली त्या त्या वेळी प्रथम मुलीनेच ते पाहिले व इतरांना दाखविले. एकदाही दुसऱ्या कोणी व्यक्तीने विष्ठा पडलेली प्रथम पाहिलेली नाही. यावरून वरील तर्काला पुष्टीच मिळते. अशा रीतीने हा सर्व शांता या मुलीचाच बनाव आहे असे मानण्यावाचून गत्यंतर दिसत नाही.

असे मानण्यावाचून गत्यंतर नाही असे दिसत असले तरी असे मानण्यामधील अडचणीही फार आहेत हेही विसरून चालत नाही. पहिली अडचण अशी की नऊदहा वर्षांची पोर आपल्याच ताटात, आपल्याच डोक्यावर, आपल्याच गालाला, ओठांना विष्ठा लावून काय साधू पाहात होती? बरे ती मनोरुग्ण आहे असे क्षणभर समजून चालले, तरी दुसरी अडचण अशी की इतकी विष्ठा ती कोठून आणीत होती आणि कोठे ठेवत होती? आम्ही मालगावे यांच्या घराभोवती विष्ठा कोठे दिसते का हे मुद्दाम पाहिले, पण लहान मुलांचीही विष्ठा आम्हाला कोठे आढळली नाही. याचा अर्थ तिला विष्ठा आणण्यासाठी दूर जावे लागत असले पाहिजे. पण हे शक्य

नव्हते, कारण काही वेळा तिच्या डोक्यावर पंधरावीस मिनिटांनी विष्ठा पडत होती व या अवधीत ती घरीच होती.

शिवाय तिच्या डोक्यावर आणि ताटात विष्ठा कशी पडते इत्यादी पाहाण्यासाठी मुद्दाम अनेक वेळा प्रयोग करून पाहण्यात आले, त्यावेळी बरेच लोक तिच्याजवळ मुद्दाम चौकस दृष्टीने उभे होते. इतक्या लोकांच्या नजरा चुकवून तिला विष्ठा टाकणे मुळीच शक्य नव्हते. आणि हे शक्य होते असे मानले तर मग जे कौशल्य एखाद्या कसलेल्या जादूगाराजवळही आढळणे दुरापास्त ते कौशल्य या नऊदहा वर्षे वयाच्या मुलीमध्ये आरोपित करावे लागते. या प्रयोगांच्या वेळी हजर असणाऱ्यांपैकी कोणाही व्यक्तीस ही शक्यता मान्य नाही, असे स्पष्ट विधान या प्रयोगांच्या वेळी जातीने हजर असलेले कागवाडचे माजी सरपंच श्री. सिद्धगौडा पाटील यांनी केले आहे.

### विज्ञानाला आव्हान

अशा रीतीने स्वत: त्या मुलीशिवाय अन्य व्यक्तीने विष्ठा टाकणे अशक्य असल्याचे एकीकडे दिसत असतानाच, तिनेच विष्ठा टाकण्यासंबंधीची कल्पना मान्य करण्यातही प्रचंड अडचणी उपस्थित होत असल्याचे दुसरीकडे दिसून येते.

अशा प्रकारे हा बनाव नसावा असे मानले तर मग विष्ठा कशी येऊन पडत होती, या प्रश्नाचे उत्तर दिले पाहिजे. भानामती खोटी असून ही घटना नैसर्गिक आहे असे म्हणणाऱ्यांना हा प्रश्न म्हणजे एक आव्हान आहे. आणि भानामती नावाचा एक प्रकार असून त्यामध्ये असे घडते असे मानले तर ते कसे घडते, (का घडते?) हाही एक प्रश्न आहे. दोन्ही दृष्टीने हे विज्ञानाला एक आव्हानच आहे. स्वत:ला बुद्धिवादी म्हणवून घेणाऱ्यांना व शास्त्रज्ञांना सामाजिक स्वास्थ्याविषयी काही आस्था किंवा चाड असेल तर भानामतीच्या नावाखाली चालणाऱ्या अशा किळसवाण्या व धोकादायक प्रकाराकडे अंधश्रद्धेच्या नावाखाली डोळेझाक करून चालणार नाही, असे आम्हाला वाटते.

**टीप :** मालगावे व शिखरे यांच्या कुटुंबात हल्ली व मागच्या एक पिढीमध्ये कोणीही मनोरुग्ण नसल्याचे किंवा वेड, आपस्मार, फेफरे इत्यादी विकारही नसल्याचे चौकशीअंती आढळले आहे.

## मानसशास्त्रीय कारणमीमांसा

आम्ही शेवटी टीप दिली आहे की शिखरे व मालगावे यांच्या कुटुंबांत हल्ली व मागच्या एका पिढीमध्ये कोणीही मनोरुग्ण नाहीत. हे वेड, आपस्मार इत्यादी स्पष्ट रोगांविषयी खरे असले तरी काही उघड दिसून न येणाऱ्या रोगाबद्दल

असे म्हणता येत नाही. स्किझोफ्रेनिया नावाच्या मानसिक रोगामध्ये व्यक्तिमत्त्व दुभंगत असून एकाच व्यक्तीमध्ये दोन वेगवेगळी व्यक्तिमत्त्वे वेगवेगळ्या रीतीने कार्य करीत असल्याचे दिसून येते; आणि हे पुष्कळदा उघड रीतीने कळून येणे शक्य नसल्याने अशा मनोरोगाची व्यक्ती वरून सामान्य (Normal) व्यक्ती म्हणून वावरत असली तरी ती गुप्तपणे भानामतीसारखे प्रकार करणे शक्य आहे. भानामतीची सत्यता नाकारणारे व स्वत:ला बुद्धिवादी म्हणवून घेणारे लोक भानामतीची उपपत्ती या स्किझोफ्रेनियाच्या साह्यानेच लावतात. काही अपवादात्मक परिस्थितीत ही उपपत्ती लागू होत असेलही. पण असे प्रकार बुद्धिवादी लोकांनाच आढळतात हे आश्चर्य नव्हे काय?

ते काही असो, वैज्ञानिक दृष्टिकोणातून प्रत्येक गोष्टीचा अभ्यास करणाऱ्यांना या शक्यतेचाही विचार करावा लागणार असून कागवाडच्या भानामतीची अशी उपपत्ती लावता येते का, हे पाहणे आमचे वैज्ञानिक कर्तव्य आहे. वास्तविक भानामतीची सत्यता अन्य कसोटीवर सिद्ध होत असेल तर या कारणमीमांसेचा विचारच करण्याची आवश्यकता निर्माण होत नाही. पण कोणाला आमच्या शोधकार्यात उणिवा आहेत असे वाटत असेल तर त्यांच्यासाठी हा प्रयत्न करणे भाग आहे.

## शांता हे दुभंगलेले व्यक्तिमत्त्व?

शांता या मुलीचे व्यक्तिमत्त्व दुभंगण्यास काही सबळ कारण आहे काय? तसे वाटण्यासारख्या गोष्टी शोधण्याचा आम्ही प्रयत्न केला तेव्हा आम्हाला खालील गोष्टी आढळून आल्या.

शांता ही मुलगी पाच भावंडांत सर्वात लहान असून (तिला दोन मोठे भाऊ व दोन मोठ्या बहिणी आहेत.) ती आईची सर्वात लाडकी आहे. (या वयातही ती आईला बिलगून बसते.) लहानपणी तिने आईला फार त्रास दिला असूनही ती तिची लाडकी आहे हे विशेष होय. ती काही दिवसच शाळेला गेली, पण इतर मुलींच्या पाट्या फोडून आली; आणि म्हणून तिची शाळा बंद करण्यात आली.

आता भानामतीसंबंधी तिच्याबद्दल पुढील तर्क करता येण्यासारखा आहे. ती आईची विशेष लाडकी असल्यामुळे तिला आईने आपल्याला बेबी या आपल्या मोठ्या बहिणीचे मूल सांभाळण्यासाठी कागवाडला पाठवून द्यावे हे आवडले नसावे. पण हे उघड सांगता येत नसल्यामुळे तिने विष्ठा टाकण्याचा किळसवाणा आडमार्ग मुद्दाम चोखाळला असावा. पण हे आपणच टाकतो याचा कोणालाही संशय येऊ नये म्हणून तिने स्वत:च्याच डोक्यावर विष्ठा टाकण्याची शक्कल काढली असावी. भानामतीच्या भीतीने आपणाला आपल्या गावी परत नेण्यात येईल, असा तिचा यामध्ये होरा असावा आणि तो बरोबरही ठरला. पण आपल्या गावी गेल्यानंतर हे

प्रकार एकदम बंद झाले तर आपणच कागवाडमध्ये विष्ठा टाकत होतो असा घरच्या लोकांना संशय येईल म्हणून तिने आपल्या गावीही काही वेळा स्वत:च्या डोक्यावर विष्ठा टाकून घेतली असावी. पण हे तिच्या अंगलट आल्यामुळे (कारण त्यामुळे तिला परत कागवाडला नेण्यात आले.) तिने तेथे गेल्यानंतर आपल्या डोक्यावर व आपल्या ताटात विष्ठा टाकण्याचा प्रकार मुद्दाम जोरात सुरू केला असावा.

वरील कारणमीमांसा बरोबर असेल तर तिला दिसणाऱ्या बाहुल्या म्हणजे तिच्या सुप्त इच्छा ठरतात. त्या तिला "मुलाला सोड व आपल्या गावी जा, नाहीतर तुला सोडत नाही." वगैरे म्हणत होत्या; याची उपपत्ती अशा रीतीने लावता येते. तसेच, कपडे पेटविण्याची शक्कलही याच सुप्त इच्छेच्या प्रेरणेने तिने काढली असावी व बाळूचा शर्ट पेटविला असावा. पण ही शक्कल तिच्या अंगलट आल्यामुळे तिने पुन्हा असा प्रकार केला नसावा. बाहुलीने काडी ओढून हातात दिली असे आम्हाला सांगण्यामध्ये आपण निर्दोष असल्याचे तिला दाखवून द्यावयाचे असावे. या निर्दोषीपणाला बळकटी यावी म्हणून आपणच शर्ट विझवल्याचे, तो विझवताना हातांना फोड आल्याचे, ते सुईने फोडल्याचे इत्यादी त्या गोष्टीला पूरक अशा तपशीलाच्या गोष्टी आम्हाला हे पटावे म्हणून तिने मुद्दाम सांगितल्या असाव्यात. (या खोट्या होत्या हे नंतर आढळून आले आहे.) या कारणमीमांसेच्या समर्थनार्थ पुढील गोष्टी सांगता येण्यासारख्या आहेत. शांताने विष्ठा दाखविल्याशिवाय ती पडल्याची कोणालाही दिसली नाही. तसेच बाहुल्यांचे वर्णन ती नीट करू शकत नाही. तिसरे म्हणजे पौर्णिमेला तिला तिच्या गावी आणल्यानंतर फक्त एकदाच विष्ठा पडली. त्यानंतर ती पडण्याची बंद झाली. बसरगीचा देवऋषी कागवाडला आल्यानंतर अंगात संचारल्याप्रमाणे भंडारा उधळण्याचा प्रकार तिने केला आहे. तो भानामतीचे सोंग वठविण्यासाठी केलेल्या प्रयत्नाचा एक भाग असावा. यल्लम्मालाही ही भानामती दाद देत नाही हे दाखविण्यासाठी तिने यल्लम्माच्या देवळात स्वत:च्या डोक्यावर विष्ठा टाकली असावी. बस्तीतील देवांनाही ती दाद देत नाही हे दाखविण्यासाठी त्यासाठी केलेल्या नैवेद्याच्या ताटात विष्ठा टाकली असावी. हा सर्व प्रकार भानामतीचा वाटावा म्हणून अमावस्येला तो सुरू केला असावा व पौर्णिमेला बंद केला असावा. विष्ठेत मोहरी, बिब्बा, सुई, काळा दोरा इत्यादी वस्तू टाकण्यामध्येही तिचा हाच हेतू असावा.

## शंभर भाकऱ्यांचे कोडे

आणखी एका गोष्टीचा तपशील वरील युक्तिवादाच्या समर्थनार्थ सांगता येईल. आम्ही कागवाडमध्ये तिला मूल सांभाळण्याखेरीज इतर कोणती कामे करावी लागत होती असे विचारले असता तिने भाकऱ्या कराव्या लागत असल्याचे सांगितले.

(मात्र हे काम तिने अपवादात्मक परिस्थितीत केल्याचे तिच्या बहिणीने सांगितले) किती भाकऱ्या कराव्या लागत होत्या असे आम्ही विचारता तिने 'शंभर' असे उत्तर दिले! इतक्या भाकरी कोण खात होते असे विचारले असता "घरातील लोक" असे उत्तर तिने दिले. आपणाला जास्त काम करावे लागत असल्याबद्दलचा हा सुप्त निषेध समजायचा की शंभर म्हणजे किती हे तिला समजत नव्हते म्हणावे? शंभर म्हणजे किती हे तिला समजावून सांगितल्यानंतरही ती त्याच आकड्याला चिकटून राहिली.

कागवाडच्या घटनांची ही मानसशास्त्रीय कारणमीमांसा स्वीकारण्यामध्ये बऱ्याच अडचणी आहेत हे उघड आहे. केवळ स्वमताग्रही मनुष्यच तीच बरोबर आहे असे म्हणू शकेल. कोणाही निष्पक्ष व सुबुद्ध विचारवंताला पुढील अडचणींचा विचार करावा लागेल.

## या मानसशास्त्रीय मीमांसेतील अडचणी

आपल्या बहिणीचे मूल सांभाळणे हे दहा वर्षाच्या मुलीला इतके नावडते काम वाटले का, की जे टाळण्यासाठी ती स्वत:च्या ताटात व स्वत:च्या डोक्यावर विष्ठा टाकून घेईल? बरे, आईने आपणाला कागवाडला पाठविल्याच्या निषेधार्थ तिने हा मार्ग अवलंबला असे समजले तरी त्याची शिक्षा आईला मिळावयास पाहिजे. पण तेथे तर तिलाच शिक्षा मिळत होती. आईचा सूड स्वत:लाच शिक्षा देऊन ती उगवत होती असे कोणी म्हणेल तर घरातील अन्नात विष्ठा पडत होती. दुसऱ्याच्या दाराला विष्ठा लागत होती याचे काय? सूड उगवायचा होता तर अंगात संचारण्याचे सोंग (ते सोंग होते असे समजले तर) करण्याचे काय कारण होते? त्यासाठी भंडारा उधळण्याचे व (एका पायाने लंगडी घालत) दुसऱ्यांच्या दारात जाऊन बसण्याचे काय कारण होते? पण मन ही वस्तू इतकी अगम्य आणि गूढ आहे की तिचा थांगपत्ता स्वत: त्या व्यक्तीलाच लागत नाही. म्हणून हे सर्व तर्कातीत आहे असे समजून क्षणभर मान्य करू. पण पुढील अडचणींच्या बाबतीत असे म्हणता येणार नाही.

मुलगी स्वत:च विष्ठा टाकत असेल तर ती एकदाही कधी ते कृत्य करताना सापडली कशी नाही? विष्ठा पडल्यानंतरच प्रत्येक वेळा ती दिसली, व तेही मुलीने दाखवल्यानंतर हे खरे असले तरी प्रत्यक्ष यासंबंधीचा प्रयोग करतेवेळी मुलीला स्वत:च्या डोक्यावर अथवा समोरच्या ताटात सर्वांच्या नजरा चुकवून विष्ठा टाकणे कितपत शक्य आहे? कारण या प्रयोगांच्या वेळी विष्ठा कशी पडते हे चौकस नजरेने मुद्दाम पाहण्यासाठी लोक जवळपास उभे होते. घरच्या लोकांनी तर यासंबंधी अनेक वेळा प्रयोग करून खात्री करून घेतली आहे. कारण त्यांच्या अन्नाचा,

जेवणाचा हा प्रश्न होता. त्यामुळे त्यांना कित्येकदा उपवासही घडत असल्याने व त्यांना पुन्हा स्वयंपाक करावा लागत असल्याने बाहेरच्या लोकांप्रमाणे त्यांच्या केवळ हा कुतुहलाचा प्रश्न नव्हता.

बरे, एकवेळ ती सर्वांच्या नजरा चुकवून ही विष्ठा टाकत होती असे समजले, तरी ही विष्ठा ती कोठे ठेवत होती? विष्ठा ही अशी वस्तू नाही की जी गुप्त जागी दहा वर्षाच्या मुलीला लपवून ठेवता येईल व सर्वांच्या नजरा चुकवून स्वत:च्या डोक्यावर अगर ताटात टाकता येईल. प्रत्येक वेळी - प्रयोगाच्या वेळीसुद्धा - पडलेली विष्ठा ही कोरडी नसून ओलसर असल्याचे आम्हाला सांगण्यात आले आहे. अगोदर विष्ठेचा संग्रह करून ठेवला असता तर ती कोरडी अगर वाळलेली आढळली असती. बरे, ओल्या विष्ठेचाच तिने संग्रह केला होता असे समजले तरी मुलीच्या अंगावरील एकमेव फ्रॉकमध्ये ती झाकून ठेवण्याची मुळीच शक्यता नाही हे तिला पाहणाऱ्या कोणाही चौकस नजरेच्या माणसाला कळून येईल.

पण हे सर्व शक्य आहे असे समजले तरी ही विष्ठा ती कोठून आणत होती? जवळपास लहान मुलांचीही विष्ठा आम्हाला आढळून आली नाही व संडासाची सोयही जवळपास कोठे दिसली नाही. लोक गावाबाहेर प्रातर्विधी करीत असतात. स्वत:चीच विष्ठा ती या कामासाठी वापरत होती असे म्हणावे तर तिसऱ्याच घासाला अन्नात विष्ठा पडत असल्यामुळे तिला वरचेवर उपवासच घडत होता. आणि याचा परिणाम म्हणून ती या अवधीत फारच रोडावली होती. खोकलाही लागला होता (आम्हाला यासाठी तिच्यावर औषधोपचारही करावा लागला) शिवाय दहा वर्षाच्या मुलीची एका दिवसाची विष्ठा व तिच्या डोक्यावर व ताटात पडणारी विष्ठा यांचा मेळही बसत नाही.

## दुसऱ्यांच्या दाराला व भिंतीला विष्ठा का?

मानसशास्त्रीय उपपत्ती ज्या घटनांची देता येत नाही अशी घटना म्हणजे दुसऱ्यांच्या दाराला व भिंतीला विष्ठा लावण्यात आलेली आहे. असे करून शांताला काय साधायचे होते हे समजणे कठीण आहे. भानामतीचे सोंग उठवायचे तर ते आपल्याच घरी विष्ठा टाकून जास्त परिणामकारकपणे वठवता आले नसते काय? शिवाय दुसऱ्यांच्या घराच्या भिंतीला एक बाई विष्ठा लावून जात असल्याचे आपण पाहिल्याचे त्या घरातील लोकांना मुद्दाम जाऊन तिने सांगण्याची या दृष्टीने तर काहीच गरज नव्हती. ती रागाने आपल्याकडे पाहात होती असे सांगण्याची तर मुळीच नव्हती.

अन्नात पडणाऱ्या विष्ठेबाबत एक फार मोठी अडचण म्हणजे ज्या ज्या भांड्यात शांता डोकावून पाहात होती, त्या त्या भांड्यात विष्ठा आढळून येत होती

असे आढळून आल्यामुळे व दुधाचे भांडे पाहण्यासाठी 'दुधात पडलीय का पाहू' असे म्हणून ती पुढे झाली असता बेबीने तिला प्रतिबंध करून स्वत:च त्यात पाहिल्यानंतर त्यात विष्ठा आढळली नाही. शांता अगोदर त्या भांड्यात विष्ठा टाकून नुसते पाहण्याचे सोंग करीत होती हे खरे असेल तर दुधातही विष्ठा आढळावयास पाहिजे होती.

सर्वात मोठी अडचण म्हणजे बसरगीतील विष्ठा पडण्याची घटना होय. कागवाडमध्ये आपणच विष्ठा टाकत होतो याचा संशय येऊ नये म्हणून बसरगीतही तिने स्वत:च्या डोक्यावर विष्ठा टाकून घेतली असावी असे मानसशास्त्रीय कारण आम्ही वर दिले आहे. पण हे कितपत बरोबर आहे? कारण शांताचा कोणाला संशय यावा? तिचे घरचे लोक किंबहुना इतरही सर्व लोक सुरुवातीपासून ही भानामतीची करामत आहे असे समजून चालले होते; व त्याच दृष्टिकोणातून घरच्या लोकांचे देवऋषीचे उपायही चालू होते. तेव्हा शांताचा कोणाला संशय येण्याचा प्रश्नच नव्हता. अशा परिस्थितीत तिने बसरगीत हा उपद्व्याप करण्याचे कारण नव्हते. बसरगीतही शांताच्या डोक्यावर विष्ठा पडली ही घटना मानसशास्त्रीय सिद्धांताच्या मुळावरच घाव घालते.

## बाहुल्यांची गोष्ट बसरगीत का सांगितली?

या बाबतीत आणखी एक अडचण म्हणजे शांताने आपणाला बाहुल्या दिसत असल्याचे, मुलाला सोडून तुझ्या गावी जा इत्यादी म्हणत असल्याचे कागवाडमध्ये न सांगता बसरगीत सांगितले आहे. मानसशास्त्रीयदृष्ट्या हे तिने कागवाडमध्ये सांगावयास पाहिजे होते. मात्र कागवाडमध्ये ती नुसतेच 'दिसते', 'चिव् चिव् असा आवाज ऐकायला येतो' असे सांगत होती. असे ती का सांगत होती याची मानसशास्त्रीय उपपत्ती सापडत नाही. मात्र कागवाडमध्ये कोठेही गेलीस तरी तुला सोडत नाही असे ती बडबडत असे. मानसशास्त्रीयदृष्ट्या कागवाड सोडून जा म्हणजे तुला सोडतो, असे तिने म्हणावयास पाहिजे होते.

शिवाय ही बाहुल्यांची गोष्ट तिने आपल्या मळ्याजवळील ओळखीच्या शेतकऱ्यास व शेजारच्या आपल्याच वयाच्या मुलाला सांगण्याचे मानसशास्त्रीयदृष्ट्या काय कारण होते? त्या बाहुल्यांनी आपली वाट अडवल्याची तिने बसरगीतील त्या मुलाला सांगण्याची काय जरूरी होती?

अमावस्येला हे प्रकार सुरू करणे व पौर्णिमेला ते बंद करणे हे भानामतीसाठी आवश्यक आहे असे क्षणभर मान्य केले तरी एवढा चाणाक्षपणा व धूर्तपणा तिच्या वयाला जुळत नाही. (अमावास्या व पौर्णिमा तिच्या लक्षात असतात असे समजले तरी.) शिवाय पौर्णिमेला ती बसरगीत होती. त्या ठिकाणी तिला डोक्यावर विष्ठा

टाकून घेण्याचे काहीच कारण नव्हते. उलट तिने तसे केले तर परत तिला कागवाडला नेण्याची भीती होती. (मागच्या वेळी असे झाल्यामुळेच तिला परत कागवाडला नेले होते) तेव्हा मानसशास्त्रीय दृष्ट्या असे करणे तिच्या हिताविरुद्ध होते. पौर्णिमेच्या दिवशी बसरगीत तिच्या डोक्यावर विष्ठा पडली या घटनेची उपपत्ती कशी लावायची?

इतक्या अडचणी असूनही आम्ही मानसशास्त्रीय मीमांसेचा खटाटोप केला, तो याविषयी कोणाच्याही मनात या बाबतीत आम्ही शास्त्रीय पर्याय शोधण्याचा प्रयत्न केला नाही असे वाटण्यास वा म्हणण्यास जागा उरू नये म्हणूनच होय. याचा अर्थ या घटनांचा शास्त्रीय दृष्टिकोणातून अभ्यासच करता येत नाही असा मात्र नाही.

## काही वैज्ञानिक प्रश्न

कागवाड येथे नोव्हेंबर १९८४ मध्ये भानामती म्हणून समजल्या जाणाऱ्या काही विलक्षण घटनासंबंधी आम्हाला आढळून आलेली वस्तुस्थिती जशीच्या तशी आम्ही आतापर्यंत निवेदन केली. या घटनांकडे पाहण्याचा आमचा दृष्टिकोण शुद्ध वैज्ञानिक असल्यामुळे या घटनांची मानसशास्त्रीय उपपत्ती लावण्याचा प्रयत्नही केला. पण त्यामध्ये अडचणी फारच असल्याचे जाणवले. जेव्हा एखादी घटना ज्ञात भौतिक नियमात बसत नसल्याचे आढळून येते, तेव्हा त्या नियमांचा अपुरेपणा व अन्य काही अज्ञात नियमांचे अस्तित्व सूचित होते. पण काहीजणांच्या लक्षात ही साधी गोष्ट येत नाही व ते आपणाला सर्व काही ज्ञात आहे अशा समजुतीने ज्ञात भौतिक नियमांनाच चिकटून बसतात. याच्या उलट वागणाऱ्यांना ते विज्ञानविरोधी समजतात. हा विज्ञानाचा अगदीच संकुचित अर्थ व दृष्टिकोण होय. हा दृष्टिकोण बरोबर असेल तर भानामती खोटी ठरते आणि भानामती खरी असेल तर विज्ञानविषयक हा दृष्टिकोण चुकीचा ठरतो. या दृष्टीने कागवाडच्या भानामतीचा विचार करणे प्राप्त आहे.

### हे काम कोणाचे?

भानामती म्हणून समजल्या जाणाऱ्या घटनांमध्ये दगड घरावर पडणे, घरातील वस्तू घराबाहेर येऊन पडणे, कपडे पेटणे, मौल्यवान वस्तू अदृश्य होणे इत्यादी प्रकार घडत असल्याचे (ते कसे घडतात हा प्रश्न तूर्त बाजूला ठेवू) आढळून येत असल्यामुळे असे प्रकार ज्यांच्या घरी घडतात त्यांना मानसिक व शारीरिक त्रास तर होतोच, पण त्यांचे आर्थिक नुकसानही फार होते. त्यामुळे हे कोणा शत्रूचेच काम असावे असा नेहमी यासंबंधी तर्क करण्यात येतो. कागवाडमध्ये आढळून आलेल्या

प्रकारात मानवी विष्ठा पडण्याशिवाय दुसरे काही आढळून आलेले नसल्यामुळे व यामध्ये या प्रकारांचे बळी ठरलेल्या व्यक्तींचे आर्थिक नुकसान विशेष झालेले नसल्यामुळे हे काम शत्रूचे म्हणणे कितपत योग्य होईल हा प्रश्न आहे. शिवाय या प्रकारांचे बळी ठरलेले एकच कुटुंब नसून तीन वेगवेगळी कुटुंबे असल्याचे सुरुवातीला तरी आढळून आले आहे. त्यामुळे शत्रुत्वाच्या भावनेने कोणी हे काम करण्याचा संभव फारच कमी दिसतो. तिसरी गोष्ट म्हणजे या घटनांचा रोख एकाच कुटुंबाकडे असल्याचे नंतर दिसून येत असले तरी त्यांचा त्रास प्रत्यक्षात एकाच व्यक्तीला - शांता या दहा वर्षांच्या मुलीलाच - फार झाला आहे. तीच या प्रकारांचे मुख्य लक्ष्य आणि बळी ठरली आहे. अशा कोवळ्या मुलीबद्दल कोणाच्या मनात का शत्रुत्वाची भावना असावी व तीही कागवाड या तिचे गांव नसलेल्या ठिकाणी, हे समजणे कठीण आहे. तात्पर्य, हे काम कोणी शत्रुत्वाच्या भावनेने केले आहे हे म्हणणे तितकेसे तर्कसंगत वाटत नाही. मग हे काम कोणाचे?

## भानामती ही अज्ञात शक्ती?

भानामती हा प्रकार गूढ असून तो विज्ञानाला ज्ञात नसलेल्या शक्तींचा खेळ आहे असे म्हणून या अडचणीतून पळवाट काढता येणार नाही. विज्ञानाला ज्ञात नसलेल्या शक्तींचे अस्तित्व एकवेळ मान्य केले तरी त्या शक्ती असे खेळ का व कसे करतात, असा प्रश्न असून त्याचे उत्तर देणे भाग आहे; आणि ते देण्यासाठी परत विज्ञानाचीच कास धरली पाहिजे. भानामती झाली तरी तीही कार्यकारणसंबंधाने बांधली गेली आहे आणि विज्ञानाचे काम कार्यकारणसंबंध शोधणे हेच असल्याने भानामतीसुद्धा विज्ञानाचा अभ्यास-विषय होतो आणि म्हणून विज्ञानाला अज्ञात अशा शक्तीचे हे काम आहे असे मानले तरी ते का करण्यात आले, कसे करण्यात आले, विशिष्ट व्यक्तीवरच तिचा प्रयोग का करण्यात आला इत्यादी प्रश्न उपस्थित होत असून, त्यांची समाधानकारक उत्तरे मिळालीच तर ते वैज्ञानिक पद्धतीनेच मिळणे शक्य आहे; अन्यथा नाही. तसेच पाहिले तर झाडावरील फळ खाली पडलेले पाहून न्यूटनला हे भानामतीचे काम आहे असे म्हणून त्याचे वैज्ञानिक उत्तर शोधण्याचा प्रयत्न टाळता आला असता. पण मग न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमांना जग मुकले असते व अंतराळ युग उजाडायला आणखी बरीच वर्षे लागली असती. कोणत्याही घटनेची उपपत्ती वैज्ञानिक पद्धतीने शोधण्याचा प्रयत्न केला तरच मानवी ज्ञानात काही भर पडण्याची आणि मानवी प्रगतीची आशा व शक्यता आहे, अन्यथा नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. म्हणून विज्ञानाला अज्ञात अशा (किंवा गूढ) शक्तीचे हे गृहीत कृत्य स्वीकारणे म्हणजे वैज्ञानिक प्रगतीचे दरवाजे बंद करणे व अंधश्रद्धा पोसणे होय.

तसे पाहिले तर ही शक्ती विज्ञानाला अज्ञात आहे असे मानण्यात अडचण काहीच नाही. आणि हल्ली तसे मानणेही भाग आहे. पण असे म्हणणाऱ्यांना असे सुचवायचे असते, की ही शक्ती विज्ञानाला ज्ञात होणेच शक्य नाही. पण असे समजण्याचे कारण नाही. असे म्हणणारेही असे समजण्यास काही कारण देत नाहीत.

## ही शक्ती बुद्धिमान पण निर्बुद्ध!

विज्ञानाला हल्ली अज्ञात असलेली ही शक्ती बुद्धिमान आहे की आंधळी आहे हा एक स्वाभाविक प्रश्न उपस्थित होतो. बुद्धिमान असेल तर असे प्रकार घडवून आणण्यात तिचा हेतू काय? व आंधळी असेल तर तिचे नियम कोणते? नको त्या ठिकाणी व वरचेवर विष्ठा टाकणारी ही शक्ती आंधळी म्हणता येत नाही. पण असे करण्यात तिचा कोणता हेतू असावा? ही अज्ञात शक्ती कोणा जिवंत व्यक्तीच्या प्रेरणेने हे काम करीत असेल, तर त्या जिवंत व्यक्तीचा यामागील हेतू कोणता? शत्रुत्वाच्या भावनेने कोणी हे काम करणे शक्य दिसत नसल्याचे आपण वर पाहिलेच असल्याने व असले किळसवाणे प्रकार करून कोणाला काय मिळणार आहे हे समजणे कठीण असल्याने हे काम जिवंत व्यक्तीचे नसावे असे वाटते; आणि असेलच तर ती व्यक्ती माथेफिरूच म्हटली पाहिजे. आणि नसेल तर म्हणजे स्वत: अज्ञात शक्तीचे हे काम असेल तर ती शक्ती निर्बुद्धच म्हटली पाहिजे!

कदाचित् दोन्हीही खरे असण्याची शक्यता आहे. म्हणजे निर्बुद्ध व्यक्तीचे निर्बुद्ध शक्तीकडून घडवून आणलेले हे प्रकार असण्याचीही शक्यता आहे. शांताने कुडचे यांच्या भिंतीला विष्ठा लावून जाणाऱ्या एका बाईला पाहिल्याचे कुडचे लोकांना त्याचवेळी सांगितले, पण ती बाई पळाली असे सांगण्यात आले आहे. आम्हाला असेही सांगण्यात आले की शांताने या गोष्टीची वाच्यता केल्यामुळेच त्या बाईने शांताच्या पाठीमागे ही भानामती लावून दिली. म्हणजे भानामतीचा मूळ रोख कुडचे व पिरुजैन यांच्या घरावर होता. पण शांताने आपल्या कृत्याने तिचा रोष आपणावर ओढवून घेतला. ही उपपत्ती खरी असेल तर हे प्रकार घडवून आणणारी व्यक्ती व हे प्रकार करणारी अज्ञात शक्ती ही दोन्हीही पूर्ण निर्बुद्ध असल्याचे पूर्णपणे सिद्ध होते !

हे प्रकार अज्ञात शक्तीचे नसून नैसर्गिक आहेत, म्हणजे कोणा जिवंत व्यक्तीचे आहेत, असे समजले तर स्वत: शांता या मुलीशिवाय दुसऱ्या कोणा व्यक्तीने हे प्रकार करणे शक्य नाही. यासंबंधीचे भक्कम आधार आम्ही वर दिले आहेत. पण शांतानेच हे प्रकार केले आहेत असे समजण्यामधील अडचणीही त्याचवेळी विशद केल्या आहेत; आणि म्हणून हे प्रकार म्हणजे विज्ञानाला एक आव्हान आहे असे आम्ही शेवटी म्हटले आहे.

### हे प्रकार नैसर्गिकच

पण विज्ञानाला हे एक आव्हान आहे असे म्हणताना आम्हाला विज्ञानाचा कमीपणा किंवा असमर्थता व या गूढ प्रकारांचे श्रेष्ठत्व वा अजेयत्व सूचित करावयाचे नाही. आम्हाला विज्ञानाला हे आव्हान आहे असे म्हणण्यात हे सूचित करावयाचे आहे की परंपरागत विज्ञानाचे पुरस्कर्ते - विशेषत: स्वत:ला बुद्धिवादी समजणारे लोक - अशा घटना वरवर विज्ञानाच्या कक्षेत बसत नसल्यामुळे त्या नाकारतात; हा त्यांचा दृष्टिकोण चुकीचा असून त्यांनी आपला हा परंपरागत दृष्टिकोण टाकावा. या विलक्षण वाटणाऱ्या घटनासुद्धा विज्ञानाच्या अभ्यासाचा विषय आहेत अशी आमची धारणा असून त्या इतर सामान्य घटनाप्रमाणेच नैसर्गिक आहेत असे आम्ही मानतो. अशा घटना नेहमीच्या व्यवहारात घडून येत नसल्यामुळे आणि वरवर त्या ज्ञात वैज्ञानिक नियमांचा भंग करीत असल्याच्या दिसून येत असल्यामुळे त्या अनैसर्गिक वाटतात, हे खरे असले तरी त्या घटना जर खऱ्या असतील तर त्यासुद्धा निसर्गाचाच एक भाग म्हणजे नैसर्गिकच आहेत असे मानणे भाग आहे. प्रश्न आहे तो त्या खऱ्या आहेत का? आणि आत्तापर्यंतचा लेख ज्यांनी वाचला आहे त्यांना हे प्रकार खरे असल्याबद्दल खात्री झाली असेल असा आम्हाला विश्वास वाटतो. अर्थात, आमच्या शोधप्रयत्नात काही उणिवा वा दोष राहिले असतील. पण हे प्रकार खोटे म्हणण्याइतपत दोष वा उणिवा राहिल्या आहेत, असे कोणी म्हणतील असे आम्हाला वाटत नाही. आणि जर कोणाला असे म्हणावयाचे असेल तर त्यांनी ते पुराव्यानिशी म्हटले पाहिजे. आम्ही ते मान्य करू असे आम्ही लेखाच्या सुरुवातीलाच स्पष्ट केले आहे.

भानामतीचे हे प्रकार खरे असतील, म्हणजे शांता या (वा अन्य कोणा जिवंत) व्यक्तीचे हे काम नसेल, म्हणजेच विज्ञानाला अज्ञात असलेल्या गूढ शक्तीचे हे काम असेल तर ते वैज्ञानिक पद्धतीने शोधून काढणे कसे शक्य आहे असा साहजिक प्रश्न उपस्थित होतो; आणि हा प्रश्न अडचणीचा असल्यामुळेच बरेच वैज्ञानिक व बुद्धिवादी भानामतीच्या (व तत्सम) घटना नाकारतात. (याच कारणासाठी हे अशा घटनांची शहानिशा करण्यास पुढे येत नाहीत. आले तरी स्वत: पूर्वग्रहदोषयुक्त असल्यामुळे त्या खोट्या आहेत हे सिद्ध करण्याचाच आटापिटा करतात.) पण एखादा प्रश्न अडचणीचा ठरतो म्हणून तो टाळणे हा पलायनवाद आहे. व घटनाच खोटी आहे असे म्हणणे ही भोंदूगिरी आहे. आमच्या मते, हा प्रश्न विज्ञानाला हाताळता येणे शक्य असून, त्यासंबंधीचे प्रयत्न सुरुवातीला ते थट्टेचा वा टवाळीचा विषय बनले तरी नेटाने चालविणे हेच खऱ्या वैज्ञानिक दृष्टीचे लक्षण आहे व तेच अंती फलदायी ठरणार आहे.

### काही महत्त्वाचे सूचक प्रश्न

या दृष्टीने वरवर गोंधळात टाकणारे पण या समस्येवर हल्ला चढविण्याच्या दृष्टीने उपयुक्त असे काही प्रश्न या प्रकारात उपस्थित होत असून त्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

भानामतीची पहिली घटना अमावस्येच्या दिवशी घडली व शेवटची घटना पौर्णिमेच्या दिवशी घडली. याला काही अर्थ आहे काय? या घटनांचा आलेख अनेक नैसर्गिक घटनांच्या बाबतीत आढळून येणाऱ्या आलेखाप्रमाणे म्हणजे घंटेच्या आकाराचा आढळून येतो. हे कशाचे द्योतक आहे?

विष्ठा पडण्याचे प्रकार जेथे घडले ती ठिकाणे शांतापासून सुमारे शंभर फुटांपेक्षा जास्त अंतरावर नाहीत. त्यांचे प्रमाणाच्या दृष्टीने शांता हेच केंद्र आहे. या स्थानव्यवस्थेला काही अर्थ आहे काय?

तमाणा पिरूजैन (घोसरवाडे) यांच्या बंद दाराला विष्ठा लागल्याचे प्रथम शांता हिने दाखवल्यानंतरच त्यांना कळले. दाराला विष्ठा लावण्याची घटना लहान मुलीचे लक्ष वेधून घेणारी खास नाही. मग त्याकडे तिचे का लक्ष गेले?

रूपा कुडचे यांच्या दाराला विष्ठा लावून जाणाऱ्या बाईला आपण पाहिल्याचे शांता सांगते, पण अंधारात (विष्ठाच लावली) हे कळणे शक्य नव्हते, अशा घटनेकडे शांता या मुलीचे (दुसऱ्या कोणाचे नाही) लक्ष जाणे थोडे विचित्र वाटते. अंधारात त्या बाईने आपणाकडे रागाने पाहिल्याचे तिला दिसावे हेही विचित्र आहे.

शाणक्का कुडचे या बाईला मुद्दाम दार उघडायला लावून विष्ठा दाखविणे, आश्चर्य म्हणजे जेथे प्रथम शाणक्काला विष्ठा दिसली नाही तेथे काही मिनिटातच ती दाखविणे हेही विलक्षण आहे.

शांताला बाहुल्या दिसाव्यात, त्यांनी तिला आपल्या गावी मुलाला टाकून जा, नाहीतर कोठेही गेलीस तरी सोडणार नाही, अशी धमकी द्यावी, तिची वाट अडवावी, बाळूचा शर्ट पेटविण्यास तिला प्रवृत्त करावे, पेटलेला शर्ट विझवताना हातांना फोड आल्याचे आम्हाला तिने खोटेच सांगावे हे सर्वच विचित्र दिसते.

## कागवाड भानामतीसंबंधी काही प्रश्न

### शांता ही माध्यम

मात्र अशा रीतीने वरवर विचित्र वाटणाऱ्या या सर्व घटनांच्यामागे एक सुसूत्रता आहे; ती म्हणजे शांताला विष्ठा पडण्याच्या घटनेशी स्वत:चे नाते जुळविणे - इच्छेविरुद्धही असेल - जणू आवडते. म्हणजे शांताचे विष्ठा पडण्याच्या घटनेशी अतूट नाते असून ती या घटना घडविण्यात मुख्य पात्र बजावल्याचे दृष्टोत्पत्तीस येते.

याचा अर्थ शांताने स्वत: विष्ठा टाकली असा मुळीच नाही. ही शक्यता पुराव्यासह आम्ही आधीच फेटाळून लावली आहे. याचा अर्थ एवढाच काढता येतो, की ज्या कोणा अज्ञात शक्तीने हे प्रकार घडवून आणले तिने या कामी शांताचा माध्यम म्हणून उपयोग केला आहे. मात्र हे प्रकार घडवून आणण्यात या शक्तीचा हेतू काय, या शक्तीने हे कसे घडवून आणले, त्या शक्तीचे स्वरूप काय, इत्यादी प्रश्न अनिर्णित राहतात.

या प्रश्नांची उत्तरे तूर्त देता येत नाहीत. म्हणून हे प्रकार करणारी शक्तीच अस्तित्वात नाही असे मात्र म्हणता येणार नाही. अशा प्रकारच्या शक्तीचे अस्तित्व नाकारणे म्हणजे या घटनांची सत्यताच नाकारणे होय आणि या घटनांची सत्यता, त्या घटनांच्या सत्यतेची शहानिशा न करता कोणालाही नाकारता येणार नाही. तसे कोणी करील तर तो वैज्ञानिक टगेगिरीचा प्रकार ठरेल.

(प्रस्तुत भानामतीच्या शोधकार्यात डॉ. सी. बी. देसाई यांचे अनमोल सहाय्य लाभले आहे.)

**टीप :** मी सांगतो तो चमत्कार करून दाखवणारास एक लाख रुपये बक्षीस देईन असे जाहीर करून प्रसिद्ध पावलेले बुद्धिवाद्यांच्या चळवळीचे अध्वर्यू आणि श्रीलंकेचे दिवंगत अब्राहम कोवूर यांनी आपल्या Gods, Demons and spirits, Begone Godmen या दोन ग्रंथांत भानामती खोटी असल्याचे सोदाहरण दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे. यात वैज्ञानिकपणा किती व टगेगिरी किती हे ज्याचे त्याने ठरवावे.

## कागवाडची भानामती : एक प्रतिक्रिया *

कागवाड येथील भानामतीसंबंधी 'तरुण भारत'मध्ये प्रदीर्घ चार लेख प्रसिद्ध झाले. लेखक व 'तरुण भारत' यांचे अभिनंदन. भानामतीमागील कारणे शास्त्रीय दृष्टीने शोधून काढण्याचा केलेला हा उपक्रम स्तुत्य आहे. वैज्ञानिक दृष्टी येण्यास अशा प्रसंगावरच्या लिखाणाची गरज आहे. निसर्गातील अनेक घडामोडी मानवी कल्पनेच्या बाहेर आहेत. त्यांचा शोध घेण्याचा मानव प्रयत्न करून राहिला आहे. पण कितीतरी घटना त्याच्या कल्पनाशक्तीच्या बाहेर आहेत. म्हणून तो चमत्कार वाटणाऱ्या गोष्टीसंबंधी जपून बोलतो. काही काही अतर्क्य गोष्टींवर त्याला विश्वास ठेवावा लागतो. मात्र या त्याच्या अपूर्णतेचा फायदा इतर मतलबी लोक बऱ्याच ठिकाणी उठवण्याचा प्रयत्न करतात. बुवाबाजी ही एक अशीच गोष्ट आहे. एखाद्या महाराजामागे वा बुवामागे आध्यात्मिकातील असेच चमत्कार लावले जातात. पण

* गोमेद यांची ही प्रतिक्रिया दै. 'तरुण भारत'च्या (बेळगाव) २५ जाने. १९८५ च्या अंकात प्रसिद्ध झाली.

यात गंमत ही आहे, की ते त्यांच्या निर्वाणानंतर त्यांच्या भक्तगणाकडून त्यांना चिकटवले जातात आणि हा चांगलाच उत्पन्नाचा धंदा करतात. जिवंतपणी असे चमत्कार एखादी व्यक्ती करीत असेल तर ते पडताळून पाहाता येतात. जेव्हा असे चमत्कार पडताळून पाहण्यात आले, त्यावेळी ते हातचलाखीच्या जादूचे असल्याचे आढळून आले आहे. कुंडलिनी जागृतीसंबंधीचा असाच एक प्रयोग मी नुकताच अनुभवण्याचा प्रयत्न केला, तेव्हा ते सारे थोतांड असल्याचे आढळून आले. कागवाडच्या भानामतीबद्दल जरी खूप लिहिण्यात आले असले तरी त्यासंबंधी विचार करण्याची पद्धत विज्ञानाला धरून नाही. या भानामतीवर विचार करण्याचा पाया ठिसूळ आहे. भानामती होऊन गेल्यानंतर दुसऱ्यांनी प्रत्यक्ष पाहिलेले म्हणून सांगण्यात आले, तरी वैज्ञानिक दृष्टीने प्रत्यक्ष पाहणाऱ्यांच्या व इतर पाहणाऱ्यांच्या दृष्टिकोणात फारच तफावत असते. एखाद्या सुशिक्षित व्यक्तीने सांगितले म्हणून त्यावर विश्वास ठेवता येत नाही. बऱ्याच वेळी तो दृष्टिभ्रम असू शकतो. उडत्या तबकड्या हा एक असाच प्रकार आहे. सुशिक्षित माणूससुद्धा याला भुलतो. बुवाबाजीत फसणारे अनेक सुशिक्षित आहेत. साऱ्याच सुशिक्षितांना वैज्ञानिक दृष्टीने विचार करण्याची पात्रता नसते.

भानामतीच्या प्रकारात तरी वस्तूनिर्मितीची शक्ती असायला हवी. अशी शक्ती असती, तर त्या घराच्या आसपास असलेलेच दगड घरावर न पडता हजारो मैल दूर असलेल्या दगडाच्या प्रकारातील दगड पडायला काय हरकत आहे? पण तसे होत नाही. दगडाऐवजी सोने पडले तर काय मजा होईल!

भानामती चालू असताना त्या ठिकाणी जेव्हा जेव्हा पोलीस गेले आहेत त्या त्या वेळी भानामती बंद पडली आहे.

कागवाडच्या भानामतीत फक्त विष्ठाच पडत होती. एकदा विष्ठेत उदबत्तीही लावण्यात आल्याचे सांगण्यात आले आहे.

वैज्ञानिक दृष्टीने विचार करताना त्या वेळी विष्ठेचे व उदबत्तीचे नमुने घ्यायला हवे होते. म्हणजे विष्ठेचे रासायनिक पृथःकरण (केमिकल ॲनॅलिसीस) करून पाहाता आले असते. त्यावरून विष्ठा कोणत्या प्राण्याची होती की माणसाची होती हे कळून, ती कोणते पदार्थ खाल्ल्यामुळे तयार झाली हे समजले असते. असे पदार्थ कोणत्या व्यक्तींनी खाल्लेत याचा शोध घेऊन या प्रश्नाची व्याप्ती त्या दोनचार व्यक्तींपुरती मर्यादित करून काही तरी उकल करता आली असती व सत्य बाहेर काढण्यास मार्ग सापडला असता.

उदबत्तीवरून बराच शोध घेता आला असता. तशाच प्रकारची उदबत्ती जवळपास कोणाच्या तरी घरी निश्चित असायलाच पाहिजे. जवळपासच्या दुकानदाराकडे अशी उदबत्ती कोणी खरेदी केली याची चौकशी करता आली असती. निश्चितपणे

चौकशीला दिशा मिळाली असती. आता शास्त्रीय दृष्टीने या भानामतीचा विचार करण्याची वेळ निघून गेली आहे.

**- गोमेद**

## ठिसूळ पायावरची प्रतिक्रिया*

कागवाडच्या भानामतीवरील आमच्या लेखमालेवरील प्रतिक्रिया २५ जानेवारीच्या 'तरुण भारत'मध्ये वाचावयास मिळाली. ही प्रतिक्रिया आमच्या वैज्ञानिक दृष्टिकोणाविषयीच संशय व्यक्त करीत असल्यामुळे तिची दखल घेणे भाग आहे.

ही प्रतिक्रिया व्यक्त करणाऱ्या लेखकाने आमची भानमतीविषयी विचार करण्याची पद्धत विज्ञानाला धरून नाही, तसेच आमच्या विचारसरणीचा पाया ठिसूळ आहे असे म्हटले आहे. त्याला कारणे दिली आहेत ती म्हणजे सुशिक्षित लोकसुद्धा दृष्टिभ्रमाने भुलतात, बुवाबाजीला फसतात, म्हणून त्यांची साक्ष प्रमाण धरता येत नाही. आणि दुसरे म्हणजे आम्ही विष्ठेचे व उदबत्तीचे नमुने घेऊन त्यांची परीक्षा केली नाही.

हे आक्षेप घेताना पत्रलेखकाला दृष्टिभ्रम व बुवाबाजी या गोष्टींचा विष्ठा पडण्याच्या घटनेशी कुठे व कसा संबंध येतो हे स्पष्ट करण्याची आवश्यकता वाटलेली नाही, हे उल्लेखनीय आहे. मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडल्याचा भ्रम तेथे हजर असलेल्या सर्व प्रेक्षकांना झाला किंवा होऊ शकतो असे लेखकाला सुचवायचे आहे काय? शांता ही बुवाबाजी करीत होती असे लेखकाला सुचवायचे आहे काय? भानामती हा बुवाबाजीचा प्रकार आहे असे लेखकाला म्हणावयाचे आहे काय? बुवाबाजी म्हणजे विष्ठा डोक्यावर टाकून घेणे काय? शांता या मुलीने जमलेल्या सर्व लोकांना हालचलाखीने फसविले काय? की त्या सर्व लोकांना विष्ठा न पडताच पडल्याचा भास झाला? ते लोक भुलले म्हणजेच काय झाले? विज्ञानाची दृष्टी असलेला मनुष्य प्रत्येक शब्द काटेकोरपणे व तोलूनमापून वापरतो. वरील शब्द त्याची व्याप्ती, अर्थ व संदर्भ स्पष्ट न करता वापरून लेखकाने स्वत:चीच विचारसरणी विज्ञानाला धरून नसल्याचे व स्वत:च्याच विचाराचा पाया ठिसूळ असल्याचे दाखवून दिले आहे.

शांता या मुलीच्या डोक्यावर विष्ठा पडल्याचे पाहणाऱ्या वीस लोकांच्या साक्षी आम्ही घेतल्या आहेत. या सर्वांना भ्रम झाला होता अगर त्यांच्यावर विश्वास

---

* हे प्रतिक्रियेला उत्तर दै. 'तरुण भारत'च्या १ फेब्रु. १९८५ च्या अंकात प्रसिद्ध झाले.

ठेवता येत नाही असे लेखकाला सुचवायचे असेल, तर मग भ्रम न होता (म्हणजे वैज्ञानिक दृष्टीने) कसे पाहावे, म्हणजे त्याच्यावर विश्वास ठेवता येईल हे सांगण्याची जबाबदारी आपोआपच लेखकावर पडते. पण हे काम लेखकाने पार पाडलेले नाही. स्वत: लेखकालाच वैज्ञानिक दृष्टीने कसे पाहायचे हे माहीत नाही असे समजावयाचे काय? की हे वैज्ञानिक 'गुपित' लेखकाला सर्वांपासून लपवून ठेवायचे आहे?

शांताने बुवाबाजी, फसवणूक, हातचलाखी इत्यादी मार्गांनी लोकांना फसविले असे लेखकाचे म्हणणे असेल तर लेखकाच्या भोळेपणाचे कौतुक करावे, की शांता या दहा वर्षांच्या मुलीच्या हातचलाखीतील चातुर्याचे करावे हे ठरविणे कठीण आहे.

विष्ठेचे नमुने आम्हाला मिळाले नाहीत ही वस्तुस्थिती आहे. पण म्हणून त्यावाचून आमचे अडले नाही. कारण त्याची जरुरी नव्हती. तेव्हा आम्ही नमुने घेतले नाहीत या लेखकाच्या आक्षेपात काही अर्थ नाही, विष्ठेवरून कोणते अन्न खाल्ले आहे, ते कोणी खाल्ले आहे हे कसे हुडकून काढणार? आणि त्याची आवश्यकता काय? विष्ठा माणसाची आहे की जनावरांची हे शोधण्यासाठी रासायनिक पृथ:करणाची काय जरुरी आहे? आणि हे शोधण्याची तरी काय जरुरी आहे? हे सर्व वाचून आमची थोडी करमणूक झाली हे आम्हाला कबूल केले पाहिजे. वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या नावाखाली मनुष्य कसा भलतीकडे वाहवत जातो याचे हे उत्तम उदाहरण आहे. मुलीच्या डोक्यावर, ताटात वगैरे विष्ठा पडत असताना ती कोणी टाकते हे शोधण्यासाठी केमिकल ॲनॅलिसीसची जरुरी नसून कॉमन सेन्सची जरुरी आहे. मुलीजवळ कोणीच नसताना तिच्या डोक्यावर विष्ठा पडते, यावरून काय बोध होतो? पण यासाठी लेखक विष्ठेचे केमिकल ॲनॅलिसीस करणार आणि विष्ठा टाकणारा चोर पकडणार ! याला म्हणतात वैज्ञानिक दृष्टी ! आणि विष्ठा टाकणारी व्यक्ती आपलीच विष्ठा टाकते हे लेखकाला कोणी सांगितले?

शेवटी भानामतीसंबंधी काही गैरसमज आहेत ते नाहीसे केले पाहिजेत. भानामती म्हणजे चमत्कार नव्हे. जेथे प्रथम काहीच नव्हते तेथे काहीतरी (मग ती विष्ठा असो वा दगड) निर्माण होते असे घडत नाही. यासंबंधी अनेक चाचण्या घेण्यात आल्या असून त्यामध्ये एकीकडील वस्तू दुसरीकडे जाऊ शकते असे आढळून आले आहे. यात विज्ञानाच्या नियमाचा (Conservation of energy) भंग होत असल्याचे वरवर दिसत असले तरी प्रत्यक्ष वस्तू नाहीशी होत नाही किंवा शून्यातून निर्माणही होत नाही. फक्त तिचे स्थलांतर होते. म्हणून दगडाऐवजी सोने पडण्याची स्वप्ने कोणी पाहू नयेत!

पोलीस आल्यावर भानामती बंद होते म्हणून भानामती खोटी असा कोणी तर्क करील तर ते बरोबर नाही. कारण पोलिसापेक्षा वैज्ञानिक हे भानामतीचे रहस्य अधिक जलद उलगडू शकतात. पण कित्येकदा वैज्ञानिकासमक्ष भानामतीचे प्रकार

घडले आहेत; आणि पोलिस येताच भानामती बंद होते हेच मुळी खरे नाही. तीन वर्षांपूर्वी रेठरे बुद्रुक येथील भानामती स्वतः फौजदार हजर असताना घडली होती. यासंबंधी अधिक माहिती - विशेषतः वैज्ञानिक दृष्टिकोणातून - हवी असेल तर W.G. Roll, A.R.G., Owen, Sitt-well इत्यादी शास्त्रज्ञांचे "Poltergeist" या विषयावरील ग्रंथ पाहावेत.

■■

## प्रकरण दुसरे

# रेठरे बुद्रुकची भानामती

*किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥*

\- ज्ञानेश्वर

---

कऱ्हाडच्या पूर्वेस प्रसिद्ध 'कृष्णा सहकारी साखर कारखाना' असलेल्या रेठरे बुद्रुक या गावी १९८२ च्या जानेवारीमध्ये भानामतीचे प्रकार सुरू झाल्याच्या बातम्या वृत्तपत्रातून वरचेवर झळकू लागल्या व त्याने महाराष्ट्रात बरेच मोठे वादळ निर्माण केले. 'सकाळ' दैनिकाने या बातम्यांना छायाचित्रासह अग्र पानावर ठळक प्रसिद्धी दिली व ही भानामती बनवेगिरीचा प्रकार असल्याचा निष्कर्ष काढणारी एक लेखमालाही प्रसिद्ध केली. बातम्या प्रसिद्ध होताच प्रस्तुत लेखकाने प्रत्यक्ष तेथे जाऊन या भानामतीचे वस्तुनिष्ठ संशोधन केले. 'सकाळ' मधील लेखांचा व प्रस्तुत लेखकाच्या संशोधनाचा निष्कर्ष सादर करण्यापूर्वी कऱ्हाडच्या श्री. ना. वा. ढवळे या 'सकाळ' च्या वार्ताहाराने दिलेली 'सकाळ' च्या १४ जाने. १९८२ च्या अंकात प्रसिद्ध झालेली बातमी वाचकांच्या माहितीसाठी प्रथम जशीच्या तशी येथे देतो.

### *रेठरे येथील गूढ घटनांचा तपास आता पोलिसांकडे*

*(ना. वा. ढवळे यांजकडून)*

*कऱ्हाड : जादूटोणा, भानामती, चेटूक अशा काही अघोरी शक्तीसंबंधी मतभेद असतील, पण अशा काही चमत्कारिक घटना रेठरे बुद्रुक येथील तीन घरांत घडत असून त्याचा छडा लावण्याचे काम आता पोलिसांनी हाती घेतले आहे. रेठरे*

बुद्रुक येथील किसन गुंडा चव्हाण, बबन नागू सावंत व किसन तुकाराम झेले या एकमेकांशेजारी असलेल्या तीन घरांत या घटना घडत आहेत. मंगळवार, शुक्रवार, अमावास्या व पौर्णिमा याच दिवशी दुपारी १० ते १२ ला या घटना घडतात.

आम्ही ज्या दिवशी भेट दिली त्यावेळी यापैकी कोणताही दिवस नव्हता. त्यावेळी सांगण्यात आली ती हकीगत अशी -

या तीनही घरांतील कपडे अचानक पेटतात. या भानामती प्रयोगास दोन महिन्यांपूर्वी सुरुवात झाली. किसन चव्हाण हा परीट असून त्याने २ महिन्यांपूर्वी घरी लाँड्री टाकली. त्याच सुमारास हे सुरू झाले. लोकांनी भट्टीसाठी टाकलेले कपडे, या तीन घरांतील व्यक्तींचे अंगावरील कपडे पेट घेऊ लागले. त्याचा मुलगा नाथा व तानुबाई गुरवची मुलगी शांता यांना मुख्यत्त्वे घेरले आहे. शांता जिथे जाईल तिथे तिचा ही शक्ती पाठलाग करते. ती उसाचे रानात भांगलणीस गेली तर उसाचा फडच पेटला. ती गावातील खरात यांचेकडे आश्रयासाठी गेली तर त्या घरातील कपडे जळाले. एवढेच नव्हे तर आपले आजोळ आटपाडी येथे दत्त नरुटे यांच्या घरी ती गेली तर ते घरच जळून भस्मसात झाले. गावातील महादेवाचे देवळात त्यांनी एका हौदात कपडे भरून ठेवले तर तेही तेथे जळाले, अशी विचित्र अवस्था आम्हा साऱ्यांचीच झाली आहे. अशी हकीगत या तिन्ही घरांतील व्यक्तींनी सांगितली. गावातील हजारो व्यक्तींनी पण त्याला दुजोरा दिला. त्यांच्या घराची पूर्ण दैन्यावस्था झाली असून शेजारी-पाजारी पण कंटाळले आहेत. त्यांनी नेसण्यासाठी आज कपडा दिला तर उद्या जळाला, असे कुठवर आम्ही तरी पुरणार, रोज मरे त्याला कोण रडे, असे त्यांनी सांगितले. ग्रामपंचायतीनेही याचा शोध घेण्याची विनंती शासनाला केली आहे. एवढेच नव्हे तर ही अद्‌भुत शक्ती या घरांपैकी एका खोलीत येऊन बसते. या खोलीचे दार आपोआप लागते, अडणा लावला जातो. आतून आवाज येतो, "भूक लागली आहे. दहीभात आणा, बिस्किटे आणा." या खोलीत अशा मागण्या केलेल्या वस्तू टाकल्या जातात. ही अद्‌भुत शक्ती तेथून जाते तेव्हा आपोआप दार उघडते. वस्तू फस्त केलेल्या आढळतात. गावचे सरपंच, सोसायटीचे चेअरमन यांना ही शक्ती हाक मारते. आतील ही शक्ती खरी का नाटक, हे अजमावण्यासाठी गावकऱ्यांनी एकदा खोलीला वेढा घातला. खोलीचे दार फोडायचा प्रयत्न केला. पण ते फुटले नाही, म्हणून या खोलीवरचा पत्रा उचकटून आत प्रवेश केला. आत काही नव्हते, फक्त एक हलकीशी वाऱ्याची झुळूक निघून गेली, असे अनेक गावकऱ्यांनी सांगितले. ही शक्ती आत असते तेव्हा "आरती म्हण" असा हुकूम होतो आणि आरती चालू केली की आत घंटा आपोआप वाजू लागते.

अशा अनेक चमत्कारिक गोष्टी सांगण्यात आल्या. दगड येऊन पडणे, हे तर सर्रास आहे. खासदार यशवंतराव मोहिते याच गावचे. त्यांनी यावर आपला

*विश्वास नाही, असे स्पष्ट सांगितले, तर घडत असलेल्या घटनांचा शोध घेण्याची आवश्यकता आहे असे सांगितले. त्यांच्याच घरात बसलेले विज्ञान मंचचे सदस्य श्री. सदूभाऊ पाटील (हे स्वत: ज्या घरात घटना घडत आहेत तेथे माझ्याबरोबर आले होते.) यांनी विज्ञाननिष्ठ दृष्टिकोणातून याचा शोध घेण्याची आवश्यकता प्रतिपादली.*

*ज्या दिवशी प्रत्यक्ष या घटना घडल्या त्या दिवशी तालुका फौजदार शांताराम थोरात व फौजदार जी. एस. मतकर यांच्याबरोबर दै. 'सकाळ'चा बातमीदार होता. घराशेजारी येताच घरातील कपडे अचानक पेटले. सर्वत्र धुराने घेरले. पोलिसांनी कपडे विझविले. पंचनामा केला. जाबजबाब घेतले. शांता - जिच्यामागे ही अद्‌भुत शक्ती आहे - तिला पोलिस ठाण्याचा आसरा दिला. तिथे मात्र तिच्यावर या शक्तीचे काही चालले नाही, असे सांगण्यात आले. शांताराम थोरात व जी. एस. मतकर यांनी आपल्या बुद्धिचातुर्याने अनेक गुन्हे उघडकीस आणले आहेत. हे गूढ ते कसे उकलतात याकडे सर्वांचे लक्ष वेधले आहे.*

वरील बातमीने महाराष्ट्रात का वादळ निर्माण केले हे आता वाचकांच्या लक्षात येईल. या भानामतीने महाराष्ट्रातील बुद्धिवाद्यांना, विशेषत: अंधश्रद्धा निर्मूलनवाद्यांना जबर आव्हान दिले असल्यामुळे एक तर त्याची दखल न घेता मूग गिळून गप्प बसणे किंवा तो बनवेगिरीचा प्रकार असल्याचे सप्रमाण सिद्ध करणे हे दोनच पर्याय यांच्यापुढे होते. पैकी दुसरा पर्याय निवडणाऱ्यांना आपला 'बनवेगिरी' चा सिद्धांत स्वत:च बनवेगिरी केल्याशिवाय मांडणेच शक्य नव्हते ! (आणि नेमके असाच प्रकार 'सकाळ' मध्ये लेखमाला लिहिणाऱ्याने केला आहे. त्याचा विचार पुढे करावयाचाच आहे.) कारण या भानामतीचे सर्वच प्रकार बुद्धिवादाच्या व रूढ विज्ञानाच्या चौकटीत न बसणारे आहेत. मुख्य म्हणजे या भानामतीने तीन घरांना घेरले असून ते केवळ एकमेकांचे शेजारी आहेत हाच काय तो त्या घरांना जोडणारा दुवा आहे. एरवी त्या कुटुंबांचा एकमेकांशी काही संबंध नाही. कोणी शत्रुत्वाने हा प्रकार मुद्दाम घडवून आणत असेल तर त्या तिन्ही कुटुंबांचा एकच शत्रू असला पाहिजे हे उघड आहे. या तिन्ही कुटुंबांनी - ज्यांचा एकमेकांशी काही संबंध नाही - एवढे मोठे कुणाचे शत्रूत्व ओढवून घेतले व ते का, हे प्रथम बुद्धिवाद्यांना सांगावे लागेल. त्या तिन्ही कुटुंबांत ज्या जळण्याच्या व इतर घटना घडल्या आहेत, त्या सर्व त्या शत्रूकडूनच किंवा त्याच्या हस्तकाकरवी घडवून आणण्यात आल्या, म्हणजे त्या सर्व मानवकृत किंवा प्राकृतिक होत्या हे त्यांना पुराव्यानिशी (मग तो पुरावा परिस्थितीजन्य का असेना) सिद्ध करावे लागेल. विशेषत: वरील बातमीतील घटना कशा घडल्या याची मानवकृत उपपत्ती त्यांनी दिली तर ही भानामती नसून बनवेगिरी आहे हे त्यांचे म्हणणे मान्य करता येईल. उदा. त्यांनी खालील घटना का, कोणी

व कशा घडवून आणल्या हे समर्पकरीत्या, म्हणजे बुद्धिवादाने दाखवून दिले पाहिजे.

(१) अंगावरील कपडे - तिन्ही घरातील लोकांचे - अंगावरच पेटले आहेत.

(२) नाथा व शांता या परस्परांशी काही संबंध नसलेल्या व्यक्तींभोवती या घटना सतत घडतात असे आढळून आले आहे.

(३) झेले या कुटुंबाच्या घरचे दार आपोआप बंद होऊन आतून आडणा पडतो व माणूस बोलावा तसा - खाण्याचे जिन्नस मागणारा - आवाज येतो. आरती म्हणताना आतून घंटी वाजवली जाते. बाहेर उभे असलेल्या व्यक्तींची नावे आतील आवाज उच्चारतो. खोलीला घेराव करून खोलीचे दार फोडून पाहिले तर आत कोणीच आढळत नाही.

या बातमीच्या खरेपणाविषयी संशय बुद्धिवाद्यांना घरी बसून बाळगता येणार नाही. घटनास्थळी प्रत्यक्ष जाऊन बातमीत दिलेल्या घटनांची त्यांना शहानिशा करावी लागेल. या घटनांची तपासणी तालुका फौजदार आणि अन्य एका फौजदारांनी केली असून त्यांच्या उपस्थितीत जळण्याची घटना घडल्याचे वरील बातमीत म्हटले आहे. (त्यांच्या सोबतच्या पोलिसांनीच पेटलेले कपडे विझवले.) तेव्हा घटनांच्या सत्यतेबद्दल कोणीही संशय व्यक्त करू शकणार नाहीत. ज्या घटना गावकऱ्यांनी व संबंधित कुटुंबियांनी सांगितल्या त्या त्यांना बनवून सांगण्याचे काय कारण आहे? जर काही कारण असेल तर ते कोणते हे बुद्धीला पटवून द्यावे लागेल. (कपडे जळल्याचे व इतर अशाच घटनांचे वस्तुनिष्ठ पुरावे उपलब्ध आहेत हे वेगळे.) हे सर्व तेथे जाऊन जातीने घटनांची तपासणी केल्याखेरीज कुणालाही करता येणार नाही. पण गंमत अशी की भानामती खोटी म्हणणाऱ्या व जनतेच्या अंधश्रद्धांवर ऊठसूट तोंडसुख घेणाऱ्या बुद्धिवाद्यांपैकी एकही हरीचा लाल तिकडे फिरकला नाही! पण 'सकाळ' च्या वार्ताहराने या भानामतीची तपशीलवार व फोटोसकट बातमी 'सकाळ' ला पाठविल्यामुळे त्या दैनिकाला गप्प बसणे शक्य नव्हते. त्या दैनिकाने कोणा अजित नरदे नामक व्यक्तीला हे सर्व खोटे आहे, ही बनवेगिरी आहे हे 'सिद्ध' करण्यासाठी रेठरे बुद्रुकला पाठवले व त्या व्यक्तीचे तीन लेख ('भुताटकीच्या पडद्याआड माणसांचेच खेळ', 'सत्यस्वरूप उघडकीस न आल्याने गावात भीती' व 'बनाव उघडकीस आल्याने भानामती अदृश्य' या मथळ्याचे अनुक्रमे १ फेब्रु. २ फेब्रु. व ५ फेब्रु. १९८२ च्या) 'सकाळ' मधून प्रसिद्ध केले. प्रस्तुत लेखकाने या तिन्ही लेखांतील विधानांना आव्हान देणारे चार लेख 'सकाळ' ला पाठवले. पण 'सकाळ' ने ते प्रसिद्ध केले नाहीत. कारण हा बनवेगिरीचा प्रकार असल्याचा निष्कर्ष काढून संपादकांनी या भानामतीवर एक खास संपादकीय अगोदरच लिहिले होते! कशाच्या आधारावर? श्री नरदे यांच्या लेखांच्या आधारे तो निष्कर्ष काढला असेल

तर नरदेंप्रमाणे मीही तेथे जाऊन या भानामतीचे जातीने संशोधन केले असल्याने त्यांनी माझीही बाजू वाचकांपुढे ठेवून याविषयी तटस्थपणे निष्कर्ष काढण्याचे स्वातंत्र्य त्यांना द्यावयास पाहिजे होते. संपादकांना सत्याची चाड असली तर ते असे केल्याशिवाय राहते ना, असे म्हटल्यावाचून राहवत नाही.

भानामतीचा प्रकार सामान्य नसल्याने 'सकाळ' च्या बातमीदाराने पुन्हा २२-१-१९८२ च्या बातमीने 'सकाळ' च्या वाचकांना त्याविषयी कळविले. ती बातमी अशी :

## *रेठरे येथील गूढ प्रकार अद्याप सुरूच*

*(आमच्या बातमीदाराकडून)*

*कऱ्हाड ता. २१- रेठरे बुद्रुक येथील तीन घरात सुरू असलेल्या भानामती प्रकाराचे गूढ अधिकच गुंतागुंतीचे होत चालले आहे. हा थट्टेचा प्रकार नसून यामागे कसलीतरी अघोरी शक्ती असली पाहिजे, अशी स्पष्ट चर्चा त्या गावात सुरू आहे. 'सकाळ' मध्ये ही बातमी वाचून अनेक ठिकाणच्या मांत्रिकांनी हे आव्हान स्वीकारून तेथे आपल्या मंत्र-तंत्राचा वापर केला आहे. सहा ते सात मांत्रिक आजवर तेथे गेले व अपयश घेऊन परतले. ही शक्ती आमच्या आवाक्याबाहेरची आहे, असे मत त्यांनी व्यक्त केले. आता अधिक शक्तिशाली अशा बेळगावच्या एका मांत्रिकाला आमंत्रित करण्यात आले आहे, असे ज्यांच्या घरी हे प्रकार सुरू आहेत त्या श्री. चव्हाण यांनी सांगितले.*

*पोलिसांनीही हे प्रकरण हाती घेतलेले आहे. पण त्यांनाही अद्याप त्याचा माग लागलेला नाही. ते चिकाटीने प्रयत्न करीत आहेत. मात्र,* ***'हे वैज्ञानिक दृष्टिकोणात बसत नाही' 'सारे थोतांड आहे' 'अंधश्रद्धेवर विश्वास ठेवू नका,' अशी आवाहने वृत्तपत्रे, मासिके वा सभांतून करणाऱ्यांपैकी अद्याप कोणीही बातमी प्रसिद्ध झाल्यानंतर तेथे पत्र पाठवून, आम्ही शोध घेण्यासाठी येतो आहोत असे कळवलेले नाही, असे तेथील तिन्ही घरांत चौकशी करता सांगण्यात आले.***

*फौजदार जी. एस. मतकर यांनी तेथे जाऊन जळत असलेले धोतर जप्त करून रासायनिक तपासणीसाठी आणले आहे, तर तालुक्याचे मुख्य फौजदार शांताराम थोरात यांनी मंगळवारी (१९ तारखेस) ज्या १० ते १२ या वेळात प्रकार घडतात, त्यावेळी त्या तीन घरांत ठिय्या दिला होता. त्यांच्या उपस्थितीत काही घडले नाही, पण त्यांची पाठ वळताच तेथे कपड्यांना आग लागली.*

*दरम्यान कऱ्हाड नगरपालिकेच्या अग्निशामक दलानेही रेठरे येथून आगीची वर्दी येताच तिकडे एकदा प्रयाण केले होते, असे चौकशी करता समजले. त्या*

*अधिकाऱ्यांचेच शब्दात "आम्ही काय करणार हो. इथे विझवले, तिथे पेटले, तिथे विझविले पलीकडे पेटले; हे आमच्या डोक्यापलीकडचे आहे."*

*दरम्यान तिथे घडत असलेल्या घटना अधिकच गंभीर स्वरूप घेत असल्याचे दिसून येत असून रविवारी अमावास्या आहे. त्या दिवशी तेथे काही भयंकर घडणार असल्याची अफवा त्या भागात पसरली आहे. आजवर त्या गूढ शक्तीचे एका खोलीत येऊन बोलणे, काही मागण्या करणे, अंगावरचे वा वाळत घातलेले कपडे जळणे, दूरवरून अकस्मात दगड येऊन पडणे, शांता (जिच्यामागे ही गूढ शक्ती प्रामुख्याने लागली आहे) जाईल तेथे विविध उपद्रव सुरू करणे अशा घटना घडत होत्या. आता याबरोबरच तेथील* ***एका वृद्धाच्या डोक्यावरचे केसच जळले, स्वयंपाक करण्यासाठी मांडलेली चूल मोडून फेकून दिली, अशा नव्या घटना सुरू झाल्या आहेत.***

*या तीन घरांतील काही मंडळी जिथे जातील तिथे त्यांचा 'पाठलाग' होत असल्याने त्यांना कोणी आसरा देऊ शकत नाही.* ***घरी झोपले तर रात्री दाणदाण आवाज, घर गरागरा फिरत असल्याचे भास होत आहेत.*** *त्यामुळे सारेच अवघड झाले आहे, असे श्री. चव्हाण यांनी सांगितले.*

वरील बातमीतील अधोरेखित मजकूर मी वर बुद्धिवाद्यांविषयी केलेल्या विधानांना कशी पुष्टी देतो हे वाचकांच्या लक्षात आलेच असेल. शिवाय त्यात काही नवीन घटनांचाही समावेश आहे. गुन्हेगार शोधण्यात पटाईत असलेल्या थोरात व मतकर या मातब्बर फौजदारांनाही चकवणारी ही भानामती नवनवीन प्रकार करून आपले अस्तित्व प्रकट करीत असताना बुद्धिवादी तिकडे फिरकून आपले हसे व अपमान कशाला करून घेतील, हे वाचकांना न सांगताही कळण्यासारखे आहे.

असे असूनही 'सकाळ' च्या संपादकांनी ज्या नरदे नावाच्या व्यक्तीच्या माध्यमातून हा बनवेगिरीचा प्रकार ठरवला, त्या व्यक्तीलाच हा प्रकार कळलेला नव्हता ही वस्तुस्थिती, त्या व्यक्तीने स्वत: प्रस्तुत लेखकाला 'हा प्रकार कशामुळे घडत असावा बरे?' असा जो प्रश्न तेथे प्रत्यक्ष विचारला त्यावरून उघड होते! पण त्याविषयी नंतर लिहू. प्रथम या भानामतीविषयी थोडा अधिक तपशील पाहू.

## प्रथम कशी सुरुवात झाली?

रेठरे बुद्रुकची भानामती वृत्तपत्रात बातमी प्रसिद्ध होण्याच्या काही दिवसापूर्वी सुरू झाली अशी समजूत असली तरी ती खरी नाही. ही भानामती एक वर्षापासून घडत होती. कृष्णा चव्हाण, बबन सावंत व कृष्णा झेले यांची घरे एकमेकांना खेटून असून, पैकी कृष्णा चव्हाण हा परीट असून इतर दोन कुटुंबे शेती व मोलमजुरी करून जीवन जगणारी आहेत. कृष्णा चव्हाण याचा मुलगा गोरक्षनाथ उर्फ नाथा या

२७ वर्षे वयाच्या तरुणाने लॉंड्री मशीन बसविण्यासाठी १९८१ च्या मार्च महिन्याच्या पहिल्या तारखेस बँकेचे कर्ज काढले; आणि त्याच वेळी त्याच्या घरावर दगड पडण्यास सुरुवात झाली. हे दगड सावंत व झेले यांच्या घरावरही पडत होते हे विशेष होय. हा दगड पडण्याचा प्रकार बरोबर सात दिवस चालला आणि नंतर आपोआप बंद झाला, हे दगड दिवसाच पडायचे व दगड पडलेला 'ठप्प' असा एकदाच आवाज व्हायचा. तो पत्र्यावर गडगडत जात असल्याचा आवाज कधीही होत नसे. काही दगडांना शेंदूर लावलेला होता. (हे दगड कृष्णार्पण केल्याचे - जवळच्या कृष्णा नदीत फेकल्याचे - लोकांनी सांगितल्यामुळे आम्हास पाहावयास मिळाले नाहीत.) हे दगड परीट, झेले व सावंत या लोकांना क्वचित लागले तरी जखम होण्याइतपत लागले नाहीत. शिवाय रस्त्यावरसुद्धा हे दगड पडायचे. मात्र इतर कोणाच्याही घरावर पडले नाहीत, किंवा इतर कोणालाही लागले नाहीत.

पुढे २७ ऑगस्टला नाथाने लॉंड्रीचे मशीन बसवले. ते तीन महिने सुरळीत चालले आणि पुन्हा नोव्हेंबरमध्ये दगड पडण्यास सुरुवात झाली. याच वेळी कपडे पेटण्याचेही प्रकार सुरू झाले. पहिली पेटण्याची घटना अर्थात, चव्हाण (परीट) यांच्याच घरी घडली. त्यांच्या देवघरातील जमिनीवर अंथरलेली गादी अंथरलेल्या अवस्थेतच पेटली. नाथाची आई साबण आणण्यासाठी त्या खोलीत गेली तेव्हा तिला हे दिसले. ती गादी खालून पेटल्यामुळे जमिनीवर अंथरलेल्या जागेची खूण दाखविणारे काळसर पट्टे आम्हास जमिनीवर स्पष्ट उमटलेले पाहावयास मिळाले. नंतर सावंत व झेले यांच्या घरीही पेटण्याचा प्रकार सुरू झाला . **सावंतांच्या घरी प्रथम पेटण्याचा प्रकार घडला तेव्हा त्यांच्या घरी कोणीच नव्हते. घराला बाहेरून कुलूप होते**. हे सावंतांचे घर ढवळ्यांच्या घराच्या उत्तरेला असून ढवळ्यांच्या घरी भाडेकरू असलेल्या ग्रामसेवकाने प्रथम खिडकीतून सावंतांच्या कुलूप असलेल्या घरात धूर पाहिला व इतरांना सांगितले. त्यामुळे इतरांना हे माहीत झाले. लगेच गल्लीतील लोक जमून कुलूप मोडून घरात त्यांनी प्रवेश मिळविला व आग विझवली. (या प्रकारांनी त्या ग्रामसेवकाच्या मनावर आघात होऊन तो घाबरून ते घर व नंतर गाव सोडून निघून गेला.)

सावंत व झेले यांच्या घरातील कपडे पेटण्याबरोबरच दोन्ही घरामध्ये असलेल्या सामायिक भिंतीच्या वर आडवे बसविलेल्या बांबूच्या पट्ट्या एकदा पेटल्या. हा पेटण्याचा प्रकार हळूहळू वाढत जाऊन डिसेंबरमध्ये त्याने कळस गाठला. इतका की परीट (चव्हाण) यांच्याकडे भट्टीसाठी आलेले लोकांचे कपडे तर सर्व जळलेच, पण नेसत्या वस्त्राशिवाय त्यांच्याकडे एकही स्वत:चा म्हणून कपडा काही शिल्लक राहिला नाही. एकदा तर कृष्णा चव्हाण (परीट) याचा डोक्यावरचा पटका तो घरी बसलेला असताना डोक्यावरच पेटला. कृष्णा झेले या वृद्धाच्या डोक्यावरचाही

पटका अशाच प्रकारे डोक्यावर असतानाच पेटला. डोक्याला गरम लागल्यामुळे हे आपल्याला कळले असे दोघेही सांगतात. यानेही त्या भानामतीचे समाधान झाले नाही म्हणून की काय, कृष्णा चव्हाणाचे केसही जळले !

या प्रकारांमुळे कंटाळून सावंत व झेले ही कुटुंबे गावच्या लोकांच्या सल्ल्यावरून आपली घरे सोडून महादेवाच्या देवळात राहावयास गेली. (चव्हाणांनी मात्र आपले घर सोडले नाही.) झेल्यांनी आपले काही सामान जाण्यापूर्वी तुकाराम खरात यांच्या घरी ठेवले. ते ठेवल्यानंतर थोड्याच वेळात (दुपारी दोनच्या सुमारास) खरातांच्या गोठ्याचा 'कूड' पेटला. हा 'कूड' बंदिस्त जागी असून त्या ठिकाणी बाहेरून परस्पर कोणालाही जाता येत नाही. समोरच्या दरवाज्यातूनच गेले पाहिजे. पण कोणीही तेथून गेले नव्हते असे खरातांचे सर्व कुटुंबीय खात्रीपूर्वक सांगतात. तो 'कूड' विझवतात, तोच खरातांचे माजघरातील अंथरुणाचे कपडे पेटले. हे कपडे म्हणजे चादर, सतरंजी, उशी इ. असून ते एकमेकांवर रचून ठेवले होते. गंमत म्हणजे मधलेच कपडे जळले; खालचे व वरचे कपडे सुरक्षित राहिले! (आम्हाला ही जागा दाखवण्यात आली.) खरातांना झेल्यांचे सामान घरात ठेवून घेतल्यामुळेच आपले सामान जळले असा संशय आला व त्यांनी झेल्यांचे सामान घराबाहेर काढून ठेवले. त्यानंतर खरातांच्या घरी जळण्याचा प्रकार कधीच घडला नाही. (खरातांचे कपडे, 'कूड' जळले तेव्हा झेले-सावंतपैकी कोणीही आपल्या घरी नव्हते, असे खरातांनी आम्हास खात्रीपूर्वक सांगितले.)

काही दिवस महादेवाच्या देवळात राहिल्यानंतर तेथेही या लोकांचे कपडे, धान्य इत्यादी वस्तू जळल्या. पोत्यात घातलेले कपडे व **पोत्यातील खपली आतल्या आतच जळली.** महादेवाच्या गाभाऱ्यात असलेल्या गणपतीच्या फोटोला घातलेला फुलांचा हारही जळला. (पण गणपतीचा फोटो सुरक्षित आहे.) गाभाऱ्याला बाहेरून नेहमी कुलूप असते. सकाळी पुजेसाठी कुलूप काढल्यानंतर पुजाऱ्याला हा प्रकार आढळून आला. त्याच गल्लीत इतर ठिकाणीही भाताचे काड, रचून ठेवलेला धैंचा इ. वस्तू दिवसाच जळले. बाहेर जळणाऱ्या वस्तू लोकांनी पाहिल्यामुळे विझवल्या. या जळण्याच्या प्रकाराविषयी सर्वांनी एक विशेष गोष्ट सांगितली, ती म्हणजे एकदम भडका होतो. पण आग विझवायला गेले की फार प्रयत्न न करता, किंवा तो करण्यापूर्वीच आग विझते. इतक्या आगी लागूनही एकही आग पसरल्याची घटना घडलेली नाही असे सर्वांनी सांगितले. ('सकाळ' च्या वरील बातमीतील घटनांची प्रस्तुत लेखकाने शहानिशा केली असून त्या सर्व खऱ्या असल्यामुळे त्यांची येथे पुनरुक्ती करून जागा आडवत नाही. त्यात नसलेल्या घटनांचा येथे प्रामुख्याने उल्लेख करायचा आहे.)

## रेठरे बुद्रुकचे डॉ. व्ही. एम्. पवार पँटमध्ये लघवी करतात

रेठरे बुद्रुकच्या भानामतीची बातमी पसरल्यामुळे हा प्रकार पाहण्यास परगावचे लोक तेथे अधूनमधून येत. अशाच प्रकारे आपल्या घरी आलेल्या पाहुण्यांना घेऊन रेठऱ्याचे डॉ. व्ही. एम्. पोवार सावंत-झेले यांच्या घरांकडे एकदा हा प्रकार पाहण्यास गेले होते. त्यावेळी त्यांच्या समक्ष घडलेली एक घटना त्यांनी आम्हाला त्या घरासमोरच तेथे जमलेल्या लोकांसमक्ष सांगितली. त्यांच्या सांगण्यानुसार त्यांच्या प्रत्यक्ष नजरेसमोर झेल्यांच्या दारातील तुळशीवृंदावन कट्ट्यातून अचानक आपोआप उखडले गेले व पूर्वेला तीन फूट उडत गेले. नंतर ९० अंशाचा कोन (काटकोन) करून उत्तरेकडे वळले व तिकडे असलेल्या झेल्यांच्या घराच्या दारातून चार फूट आत शिरले व जमिनीवर हातांनी अलगद ठेवावे तसे बसले ! हे सांगताना ते म्हणाले, "हा विलक्षण प्रकार इतक्या अनपेक्षितपणे व अकस्मात घडला की तो पाहून भीतीने पँटमध्येच मला लघवी झाली." हे ते सांगत होते, त्यावेळी बायकांसह बरेच लोक तेथे उपस्थित होते. बायकांसमोर हे सांगताना त्यांना कसलाही संकोच वाटला नाही ही गोष्ट लक्षणीय आहे. याच्याही पुढे जाऊन ते म्हणाले "आईशपथ, हे खरे आहे. ते पाहुणे याला साक्षी आहेत." ते पुढे म्हणाले, की तो प्रकार पाहून विश्वात एक अदृश्य व अज्ञात शक्ती असल्याची माझी खात्री झाली व नास्तिकचा मी आस्तिक झालो. (त्यांची जबानी मी नंतर ध्वनिमुद्रित करून घेतली. तुळशीवृंदावन उखडल्याची खूण कट्ट्यावर होती. ज्या अमावास्येला काहीतरी भयंकर घडणार अशी वंदता होती, त्याच्या दुसऱ्या दिवशीची ही घटना. त्यावेळी पोलिसही हजर होते.)

## बंद घरातील सामान एकदम बाहेर आले !

एके दिवशी झेले व सावंत या घरचे लोक जेवणे आटोपून आपल्या घरापासून दक्षिणेस सुमारे पन्नास फूट अंतरावर असलेल्या ढवळ्यांच्या घरासमोर दारात बसले होते. त्यावेळी त्यांच्या घरातील भांडी वगैरे सामान तेथे अकस्मात येऊन पडले. यावेळी दोन्ही घरांची दारे बंद होती हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. सामान येऊन पडताना दिसले नाही, पडल्यानंतरच दिसले असे ते सांगतात, घराच्या बंद दारातून हे सर्व सामान बाहेर कसे आले हे एक न उकलणारे गूढच राहिले आहे. बंद घरातून झेले व सावंत यांचे सामान अशाप्रकारे बाहेर येऊन पडण्याचा प्रकार दोनदा घडला आहे.

याशिवाय ढवळ्यांच्या घराच्या ईशान्येस असलेल्या विजेच्या लोखंडी खांबाचा फक्त वरचा भाग डुलत असल्याचे आपण पाहिल्याचे रवींद्र ढवळे व त्यांच्या पत्नीने आम्हास सांगितले आहे. हा खांब तळातून कोणीतरी हालवल्यामुळे हलावा

तसा हलत नव्हता, तर फक्त वरचाच भाग हलत होता. (म्हणजे खालचा भाग स्थिर होता) व तोही क्षणभर नव्हे, तर सतत सात मिनिटे असे दोघेही पतीपत्नी सांगतात. (सात मिनिटांची वेळ आपण घड्याळात पाहून निश्चित केली आहे हेही सांगण्यास ते विसरले नाहीत!)

रवींद्र ढवळ्यांनी एकट्यांनी हा प्रकार पाहिला असता तर दृष्टिभ्रम म्हणून त्याची वासलात लावली असती. पण त्यांच्या पत्नीनेही हे पाहिल्याचे सांगितले आहे. याशिवाय इतर अनेकांनीही स्वतंत्रपणे आम्ही घेतलेल्या मुलाखतीत हा प्रकार आपणही पाहिल्याचे आम्हाला सांगितले आहे. म्हणून आम्हाला ही घटना दृष्टिभ्रम म्हणून उडवून लावता येत नाही. म्हणूनच आम्ही या विलक्षण घटना प्रकाराचा येथे खास उल्लेख करीत आहोत. शिवाय रवींद्र ढवळे हे भोळसट नाहीत. ते कऱ्हाड येथे टेक्निकल इन्स्ट्रक्टर म्हणून काम करीत असून ते चौकस व चिकित्सक असल्याचे आम्हास आढळून आले आहे.

## याची उपपत्ती कशी देणार?

आतापर्यंत वर्णन केलेल्या घटनांपैकी दगड पडण्याचे प्रकार मानवकृत आहेत, असे फार तर बुद्धिवादी म्हणू शकतील. (तथापि त्याचेही खास वैशिष्ट्य असून त्याची बुद्धिवादी उपपत्ती लागत नाही. पण ते तूर्त बाजूला ठेवू.) जळण्याच्या प्रकाराची - विशेषत: अंगावरचे कपडे अंगावरच जळण्याच्या प्रकाराची - मानवकृत उपपत्ती हे बुद्धिवादी कशी लावणार आहेत? उदा. कृष्णा चव्हाण व कृष्णा झेले यांच्या डोक्यावरचा पटका डोक्यावरच आपोआप पेटला, तो कसा? त्या वृद्धांनी स्वत:च तो पेटवून घेतला, कारण ते मनोविकृत होते असे ते म्हणणार आहेत काय? मग ही मनोविकृती नंतर त्यांना लगेच सोडून कशी गेली? सावंतांच्या शांता या १२ वर्षे वयाच्या मुलीच्या अंगावरचा फ्रॉकही अनेकदा अंगावरच पेटला. तिलाही एकदम मनोविकृतीने कसे धरले व नंतर सोडले? शिवाय सावंतांच्या बाहेरून कुलूप असलेल्या घरातील वस्तू कशा पेटल्या? खरातांच्या बंदिस्त घरातील 'कूड' कसा पेटला? एकमेकांवर रचून ठेवलेल्या कपड्यांपैकी मधलेच कपडे कसे पेटले व बाकीचे कसे सुरक्षित राहिले? कुलूप असलेल्या देवाच्या गाभाऱ्यातील फोटोचा फक्त हारच का, कुणी व कसा जाळला? तुळशीवृंदावन आपोआप कसे उडाले व सजीवाप्रमाणे जाताजाता वळले व अलगद जमिनीवर बसले? इ. इ. (लेखविस्तार भयास्तव इतर अनेक घटनांचा उल्लेख टाळला आहे.) **'सकाळ' मधील लेखमालेत श्री. नरदे यांनी आपल्याला अडचणीच्या वाटतील अशा घटनेचा उल्लेख केलेला नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे!** जळण्याचे सर्व प्रकार शांता या १२ वर्षाच्या मुलीनेच केले असा एक अजब निष्कर्ष त्या लेखकाने

आपल्या लेखात काढला असून तिने हे प्रकार का व कसें केले याचा मात्र त्याने कसलाच विचार केलेला नाही. फक्त 'इतर व्यक्ती तिला वापरत असावे' असे एक मोघम विधान केले आहे. आपण वाचकांना फसवत आहोत हे त्यांना कळू नये म्हणून लेखकाने " 'आपण लोकांना कसं उल्लू बनवलं' असं मिश्कील हास्य तिच्या (शांताच्या) चेहऱ्यावर दिसलं" असली अर्थहीन व खोटी विधाने जागोजाग करून मोठ्या संशोधकाचा आव मात्र आणला आहे! लेखकाने इतकी खोटी विधाने केली आहेत, की त्यांचा केवळ उल्लेख करणे हेसुद्धा वेळेचा व जागेचा शुद्ध अपव्यय आहे. तथापि, लेखकाच्या खोटेपणाचा नमुना वाचकांना कळण्यासाठी येथे एक दोन उदाहरणे देण्याचा मोह आवरत नाही. पहिल्याच लेखात लेखक म्हणतो, "सलग चार दिवस आम्ही रेठरे येथे राहून शोध घेतला." पण प्रत्यक्षात एकही दिवस तो तेथे राहिला नाही ही वस्तुस्थिती आहे ! याला प्रस्तुत लेखकच साक्षीदार आहे! (खुद्द प्रस्तुत लेखकाचाच 'मी येथे राहात नाही' असे म्हणून त्याने निरोप घेतला आहे !) दुसरे उदाहरण म्हणजे एकदा शांता ही मुलगी नदीला गेलेली असताना चव्हाण यांच्या बाहेरून कुलूप असलेल्या घरातील इस्त्रीच्या टेबलावरील कापड पेटले. हे कृष्णा चव्हाणाने नंतर बाहेरून येऊन पाहिले व विझवले. हा प्रकार प्रस्तुत लेखकाच्या समक्षच घडला आहे. यावेळी ८-१० लोक तेथे हा प्रकार पाहण्यास लगेच जमले. पण या प्रसंगी ५०-६० लोक जमले व हा पेटवण्याचा प्रकार शांतानेच केला, असे लेखकाने आपल्या लेखात चक्क ठोकून दिले आहे ! नरदे या लेखकाचे 'सकाळ' मधील लेख वाचून त्यातील खोट्या विधानांनी गावातील काही प्रतिष्ठित मंडळी किती चिडली होती याचा प्रत्यक्ष अनुभव प्रस्तुत लेखकाला आला आहे. डॉ. पवारांनी तर "तुम्ही याला 'सकाळ' मधून चोख उत्तर द्या" असा प्रस्तुत लेखकाजवळ हट्टच धरला. (माझे लेख 'सकाळ' ने छापले नाहीत, म्हणून मी नरदे यांच्या एका खोट्या विधानाला आव्हान देणारे पत्र 'सकाळ' ला लिहिले. ते डॉ. पवारांनी वाचून ते अगदीच अळणी वाटल्याचे पत्र मला लिहिले व 'चांगले उत्तर द्या' अशी मला त्यांनी पुन्हा पत्राने विनंती केली, हे येथे सांगणे उचित होईल. या पत्राचा पुढे उल्लेख येईल.)

आता सर्वात गूढ अशा बंद खोलीतील आवाजाची नरदे कशी उपपत्ती लावतात हे पाहू.

## बंद खोलीतील दहीभात मागणारा आवाज कोणाचा?

कृष्णा झेले यांच्या घराचे दार आपोआप बंद होऊन आतून आडणा पडण्याचे प्रकार एकूण तीन वेळा झाले. पैकी दोन वेळा आतून बाहेरच्या लोकांना उद्देशून, अनेकदा त्यांची स्पष्ट नावे घेऊन त्या आवाजाने हाका मारल्या. हा आवाज स्त्रीचा

होता. दुसऱ्या वेळी आवाज आला त्यावेळी त्याने इंदू झेले या त्याच घरच्या बाईची नारळ वगैरेनी ओटी भरण्यास सांगितले. इंदू ही बाई विधवा असल्यामुळे तिची ओटी कशी भरायची, असा तेथे जमलेल्या लोकांनी त्या आवाजाला प्रश्न केला; तेव्हा त्याने 'चालते, भरा' असा हुकूम केला. तेव्हा लगेच वस्तू आणवून लगेच इंदूची ओटी भरण्यात आली. त्यावेळी नाथा चव्हाण (परीट) या (लॉंड्री टाकणाऱ्या) कृष्णा चव्हाण याच्या मुलाने खोलीत पिशाच आहे अशा कल्पनेने व त्याला शांत करण्यासाठी आपल्या घरातून 'नवनाथ कथासार' हा ग्रंथ आणून त्यातील ठराविक (भूतबाधाशामक) भाग वाचला व नंतर 'आरती करावी का', असे त्या आवाजाला विचारले. तेव्हा 'करा' असा आदेश आला. तो आरती म्हणू लागताच आतून घंटी वाजत असल्याचा आवाज ऐकावयास आला. (झेले यांच्या घरी घंटी होती व तीच वाजत होती याची प्रस्तुत लेखकाने खात्री केली आहे.) नंतर त्या आवाजाबरोबर नाथा व इतर लोकांनी संभाषणही केले. शांता या मुलीच्या पाठीमागे - ती जाईल तेथे - जळण्याचा प्रकार घडत असून, 'तो केव्हा बंद होणार' असा प्रश्न लोकांनी विचारला असता 'आता येथून पुढे होणार नाही' असे त्या आवाजाने आश्वासन दिले.

बंद खोलीतून आवाज येत असल्याची बातमी गावात पसरल्यामुळे तेथे शेकडो लोक जमले होते. त्यापैकी काही प्रतिष्ठित लोकांची नावे घेऊन त्या आवाजाने त्यांचे ते तेथे येताच 'या' म्हणून स्वागत केले ! हे लोक त्या आवाजाला कसे माहीत झाले? आश्चर्य म्हणजे दत्ता कोळेकर या व्यक्तीला त्या आवाजाने "तू आज आंघोळ केलीस का?" असे त्याचे नाव घेऊन विचारले. त्याने खरोखरच त्या दिवशी आंघोळ केलेली नव्हती! त्याने ओशाळून 'नाही' म्हटले, तेव्हा त्याला तेथून ताबडतोब निघून जाण्यास त्या आवाजाने फर्मावले. (कोळेकर हा एक धार्मिक मनुष्य आहे असे आम्हाला सांगण्यात आले. धार्मिक माणसाने आंघोळीला दांडी मारावी हे त्या आवाजाला पसंत नसावे !) यावेळी गमाजी व तुकाराम खरात यांच्या बायका - भागू व मुक्ता - या फार दूर राहून, म्हणजे ढवळ्यांच्या घरासमोर उभ्या राहून हसत होत्या. त्यांना त्यांची नावे घेऊन आतील आवाजाने जवळ बोलावून घेतले व आपली हसून थट्टा करता काय, असा जाब विचारला. इतकेच नव्हे तर त्याबद्दल त्यांना आपली माफीही मागायला लावली ! त्या बायकांनी "चूक झाली" असे म्हटले व त्या आवाजाच्या पाया पडल्या ! तसेच महादेव हिवरे या तरुणाला पुढे बोलावून "तू नाथा चव्हाणाला का मारलेस?" असे म्हणून त्याबद्दल त्याला दम भरला व एक गलिच्छ शिवीही दिली ! इतकेच नव्हे तर त्याला नाथा चव्हाणाची माफीही मागायला लावले. (हिवऱ्याने नाथाला मारण्याचा प्रकार घडला होता हे खरे होते. पण हे प्रासंगिकपणे घडले होते. वैरामुळे नव्हे.)

काही लोकांना 'नाथाची माफी मागायला लावते, त्या अर्थी नाथानेच कोणा बाईला आत ठेवले असावे,' असा संशय आला. या वेळी तेथे शेकडो लोक जमले होते. रेठऱ्याचे तलाठी बाळकृष्ण उर्फ आणासाहेब जनार्दन कुलकर्णी यांनी व इतरांनी 'आत कोणी बाई असून तिला आता पकडायचेच' असे ठरविले व त्यासाठी दार मोडून काढण्याचा निर्णय घेण्यात आला. कुलकर्णी व इतर लोकांनी जवळच्या सावंतांच्या घरातून, मधल्या भिंतीवरील बांबूच्या पट्ट्यातून काही दिसते का हे पाहण्याचा प्रयत्न केला, पण अंधारामुळे काही दिसले नाही. तथापि, तेथे काही लोक पाळतीसाठी राहिले. पाठीमागे (पश्चिमेकडे) चव्हाणांचे घर आहे. त्या घराच्या व झेल्यांच्या घराच्या मध्ये मोठी भिंत असल्यामुळे आतील व्यक्तीला पाठीमागून निसटणे शक्य नव्हते उत्तरेकडेही भिंत होती. दक्षिणेकडे सावंतांचे घर असून तेथे वर म्हटल्याप्रमाणे काही लोक पाळत ठेवून राहिले आणि बाकीचे दार फोडण्याचा प्रयत्न करू लागले. ते फुटेना म्हणून काही लोक घरावरील पन्हळी पत्र्यावर चढले. ते थोड्याच वेळात उचकटून काढण्यात आले व त्याचवेळी दारही मोडले. लोक आत प्रवेश करून पाहतात तो आत कोणीच नाही ! धान्य ठेवण्याचे हौद होते. तेही तपासले. तेही मोकळेच आढळले.

'सकाळ' मधील लेखात श्री. नरदे यांनी शांता या मुलीला हाताशी धरून त्या मुलीची आई तानूबाई सावंत व शेजारी राहणारा नाथा चव्हाण यांनी संगनमताने झेले यांचे घर बळकावण्यासाठी हा भानामतीचा खेळ केला, असा अजब निष्कर्ष काढला आहे ! हा तर्क इतका पोरकट आहे की त्याची कसलीच दखल घेण्याची वास्तविक आवश्यकता नाही. तथापि, तो कसा पोरकट आहे व खोट्या गोष्टींवर आधारण्यात आला आहे हे वाचकांना कळणे आवश्यक असल्याने त्याची थोडी छाननी येथे करीत आहे.

## माझे आव्हान 'सकाळ' च्या लेखकाने का स्वीकारले नाही ?

श्री. नरदे यांनी 'सकाळ' मधील आपल्या लेखात घर बळकावण्याचा पोरकट तर्क कशाच्या आधारावर केला आहे, तर म्हणे 'झेल्यांचे खरेदीचे कागदपत्र जळले.' हे धांदात खोटे आहे ! कारण झेल्यांचे खरेदीचे कागदपत्र अगदी सुरक्षित आहेत ! बुडत्याला काडीचा आधार म्हणतात; पण बुडणाऱ्या बुद्धिवादाला काडीचाही आधार नसताना व तो गटांगळ्या खात असताना जणू आपण बुडतच नाही असे खोटेच तो ओरडतो! यालाच बुद्धिवाद म्हणतात ! कारण जो बुडत नाही तो कशाला खोटे बोलेल? उगाच कोणी खोटा आरडाओरडा करीत नाही ! प्रस्तुत लेखकाने झेल्यांचा खरेदीचा कागद पाहिला असून तो थोडा (एकाच ठिकाणी) फाटला आहे. पण त्या घरातील इतरही अनेक रद्दीचे कागद फाटले आहेत. तुकडे-तुकडे केले

आहेत. आता प्रश्न असा आहे, की रद्दीचे कागद फाडण्याचे काय कारण होते? ज्या कारणासाठी रद्दीचे कागद फाडले, त्याच कारणासाठी हा खरेदीचा कागदही फाडला हेही उघड आहे. आता घर बळकावण्यासाठी रद्दीचे कागद कोण फाडील काय? आणि पडताळून पाहता येण्यासारख्या पुराव्याचा जो कागद सुरक्षित आहे - जळालेला नाही - तो कागद जाळला असे धडधडीत खोटे विधान जेथे हा लेखक करतो, तेथे पडताळून पाहता न येणाऱ्या गोष्टीविषयी तो किती खोटे लिहीत असेल याची वाचक सहज कल्पना करू शकतात ! या लेखकाचे 'सकाळ' मधील लेख वाचलेले रेठऱ्याचे काही लोक त्याच्यावर इतके का चिडले याचीही वाचकांना आता कल्पना येईल. या बुद्धिवाद्यांना हटकणारे, संशोधनाच्या बळावर आव्हान देणारे कोणी भेटत नाहीत. म्हणूनच हे लोक असे धडधडीत खोटे लिहीत असतात, आपले बुद्धिवादाचे घोडे दामटत असतात व लोकांना फसवत असतात हे उघड आहे. (कडेगावच्या भानामतीविषयीही नेमका असाच प्रकार या लोकांनी केला आहे. पाहा : 'विज्ञान आणि अंधश्रद्धानिर्मूलन' या पुस्तकातील पहिलेच प्रकरण.)

आता झेल्यांच्या बंद घरातून आवाज कसा आला? कुणी काढला?

याविषयी नरद्यांनी 'सकाळ' मधील लेखात काढलेले तर्कट पाहा : ते म्हणतात, ''झेले व चव्हाण यांच्या दरम्यान असलेल्या भिंतीवर आणि छताखाली असलेल्या बारीक फटीतून तानूबाई बोलू लागली.''

प्रथम यात नरद्यांनी किती धडधडीत खोटे लिहिले आहे हे पाहू.

झेले व चव्हाण यांच्या घरामध्ये एक मोठी सामायिक भिंत असून चव्हाणांचे घर झेल्यांच्या घराच्या पश्चिमेला अगदी खड्ड्यात आहे. ती भिंत त्या बाजूने इतकी उंच आहे की तेथे छताजवळ एखाद्या बाईला जाणेच शक्य नाही. बरे, उंच शिडी उभी करून तीवर कोणी उभे राहिले व तेथून कोणी बोललेच तर ते झेल्यांच्या घरातसुद्धा ऐकायला येणार नाही. मग झेल्यांच्या घराबाहेर, ढवळ्यांच्या घराजवळ (जेथे भागू व मुक्ता उभ्या राहून हा आवाज ऐकत होत्या) हा आवाज ऐकणे दूरच. (शिवाय छतातून येणाऱ्या आवाजात व खोलीतून येणाऱ्या आवाजात माणूस सहज फरक करू शकतो. सगळे लोक खोलीतूनच आवाज येत होता असे म्हणतात. झेल्यांच्या घरातील घंटी छताजवळून कशी वाजेल? कोण कोण माणसे उभी होती हे पलीकडच्या घरातून कसे दिसेल? कारण ते येतील तसे 'या' म्हणून त्या आवाजाने त्यांची नावे घेऊन कसे ओळखले? इत्यादी अनेक प्रश्न अनुत्तरितच राहतात.)

हे झाले त्या आवाजाबद्दल. नरदे तेथे बारीक फट असून त्या फटीतून तानूबाई बोलली असे म्हणतात. पण रेठऱ्याच्या भानामतीने नरद्यांनाच झपाटलेले दिसते ! कारण तेथे बारीकच नव्हे तर कसलीही फट नाही ! नरद्यांनाच ती दिसली

यावरून नरद्यांनाच भानामतीने पकडले की काय, असे म्हणणे भाग आहे.

अशी फट जर तेथे असेल तर त्या फटीतून श्री. नरद्यांनी जाहीरपणे बोलून दाखवावे व या प्रयोगाची तारीख व वेळ अगोदरच सांगावी, म्हणजे लोक तेथे जमतील व त्यांची भानामतीविषयी भीती व गैरसमज या जाहीर प्रयोगाने नाहीशा होतील, असे १४-२-१९८२ च्या 'सकाळ' मध्ये पत्र लिहून मी नरद्यांना जाहीर आव्हान दिले. पण ते स्वीकारणे तर राहोच, त्याला समर्पक उत्तरही त्यांना देता आले नाही. उलट त्यांनी मला एक खासगी पत्र लिहून 'सकाळ' ने प्रसिद्ध न केलेल्या माझ्या लेखात मी काय काय लिहिले आहे, याची मात्र विचारणा केली ! (कारण संपादकांनी नरद्यांना माझे लेख वाचावयास दिले नव्हते.) (रेठऱ्याहून परतत असताना त्यांनी ही भानामती कशामुळे होत असावी असे मला विचारले होते. बनवेगिरीचा हा प्रकार आहे असा निष्कर्ष काढणाऱ्याने असा मला प्रश्न विचारावा हे आश्चर्य नव्हे काय? "मी खासगीत काही सांगणार नाही, 'सकाळ' ला जाहीरपणे लिहीन" असे मी त्यांना उत्तर दिले होते.)

पण या तर्कटातील सर्वात मोठा खोटेपणा म्हणजे झेल्याच्या बंद घरातून आवाज येण्याचा प्रकार घडला, त्यावेळी खुद्द तानीबाई शेखर ढवळे यांच्याकडे शेतावर काम करीत होती. कोणीतरी शेखर ढवळे यांना फॅक्टरीवर फोन केला की तानीबाईच झेल्यांच्या बंद घरातून बोलत आहे असा संशय काही लोक बोलून दाखवत आहेत. तेव्हा लगेच शेखरने तानीबाईला मोटरसायकलीवरून रेठरे गावात आणले व सर्वांचे संशयनिरसन केले, असे खुद्द शेखर ढवळे यांनी प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. (तानीबाई शेखर ढवळ्यांच्याकडे शेतकाम करते.)

तेव्हा झेल्यांचे घर बळकावण्याची क्लृप्ती अगदीच केविलवाणी असून ती बुद्धिवाद वाचवू शकत नाही. नाथा या परीटाचा धंदा करणाऱ्याचे इतके कपडे जळले ते त्याने घर बळकावण्यासाठी स्वत:च जाळले हे म्हणणे या लोकांच्या बुद्धिवादाचे बुद्धिदारिद्र्य पुरेसे उघडे पाडणारे आहे. शेवटी चव्हाण व झेले यांच्या डोक्यावरचे पटके व केसही जळू लागले. 'ज्याचे घर बळकावयचे' त्या कृष्णा झेल्याचाही पटका जळाला. तसेच तानीबाईच्या मुलीच्या-शांताच्या-अंगावरचे फ्रॉकही जळू लागले. ती आजोळी आटपाडी येथे गेली तर तेथेही जळण्याचे प्रकार घडले. रात्री झोपलेली खोपच जळली. याशिवाय ज्यांची प्राकृतिक उपपत्ती देता येत नाही अशा (उदा. तुळशीवृंदावन आपोआप एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे, बंद दाराच्या घरातील सामान आपोआप बाहेर येऊन पडणे, आपोआप घराचे दार बंद होणे व आतून आडणा पडणे इत्यादी) घटनाही घडल्या असून त्या सर्व खऱ्या असल्याबद्दल प्रस्तुत लेखकाने स्वत:ची खात्री करून घेऊन मगच त्यांचा येथे उल्लेख व समावेश केला आहे. झेल्यांच्या बंद घरातून बाईचा केवळ आवाज येत

नव्हता, तर **एखादी व्यक्ती पाण्यातून चालावी तसा पावलांचा आवाजही होत असल्याचे** बाहेरच्या लोकांनी ऐकले आहे. जेव्हा त्यांनी दार मोडून आत प्रवेश केला तेव्हा चटणी व जमिनीवर नुकतेच सांडलेले पाणी आढळले. (पाण्यात चटणी मिसळली होती.) माणसाशिवाय हा प्रकार घडणे शक्य नाही असे म्हणणाऱ्या शेकडो लोकांनी घराला वेढा घालून आतील व्यक्ती पकडण्यासाठी दार फोडून पाहिले तरी त्यांना खोलीतील माणूस का सापडू शकला नाही, हे सांगितले पाहिजे. बुद्धिवादाचे बुरखे या रेठऱ्याच्या भानामतीने अशा रीतीने जाहीरपणे टराटर फाडून टाकले आहेत !

■■■

## प्रकरण तिसरे

# एका कुटुंबाला सतत दहा वर्षे छळणारी विलक्षण भानामती

*हे नावाची टाकसाळ ।*
*हे चमत्काराचे वेळाउळ ॥*

*- ज्ञानेश्वर*

---

**ए**कसंबा (ता. चिक्कोडी जि.बेळगांव) येथील सी. के. हायस्कूलमध्ये फर्स्ट डिव्हिजन क्लार्क म्हणून काम करणारे श्री. एस्. जे रजपूत यांना आणि त्यांच्या कुटुंबियांना एकसंब्याहून तीन किलोमीटर अंतरावर असलेल्या त्यांच्या कल्लोळ या गावी व खुद्द एकसंब्यामध्येही सतत दहा वर्षे पीडणाऱ्या विलक्षण भानामतीचा जो जीवघेणा अनुभव आला आहे तो येथे त्यांच्याच शब्दात देत आहे. माझ्या विनंतीवरून हा अनुभव त्यांनी मुळात कानडीतून लिहून काढला असून त्याचे मराठीत मी स्वतःच भाषांतर केले आहे. श्री. रजपूत मुळात भानामती हे 'थोतांड' मानणारे होते. नंतर या अनुभवामुळे त्यांच्यात जे परिवर्तन झाले आहे ते विश्वास न ठेवण्यासारखे आहे. कारण ते या अनुभवामुळे मंत्रतंत्राचा कसून अभ्यास करून त्यात इतके पारंगत झाले आहेत की ते हल्ली स्वतःच एक मांत्रिक बनले आहेत ! आणि तेही साधासुधा मांत्रिक नव्हे, तर या भागात करणीवर हमखास मात करू शकणारे म्हणून नावलौकिक प्राप्त झालेले ! त्यांना करणीग्रस्त लोकांची इतकी मागणी असते की त्यांना हायस्कूलची नोकरी सांभाळणे अवघड होऊन बसले आहे. तर त्यांचे हे अनुभव त्यांच्याच शब्दात ऐकूया :

## मी प्रत्यक्ष अनुभवलेल्या भानामतीच्या विचित्र घटना

दि. ९-१२-१९७२ रोजी मी, माझे वडील व माझी पत्नी कल्लोळ या गावी स्वयंपाकघरात रात्री जेवत असताना आमच्या शेजारी एकदम १० ते १५ दगड येऊन पडले. हा विचित्र प्रकार पाहून आम्ही चाटच पडलो. कारण घराची दारे बंद होती; वरून ते पडावेत म्हणावे तर छतातून इतके दगड कसे पडतील? शिवाय घरावर कसला आवाजही झाला नव्हता. घरात आमच्या तिघांशिवाय कोणीही नव्हते. हा गूढ प्रकार पाहून आम्ही फार घाबरलो.

यानंतर दहापंधरा दिवसांनी माझ्या पत्नीला एकदम थंडी भरली. म्हणून अकरा दिवसपर्यंत औषधोपचार केले. पण काही उपयोग झाला नाही. शेवटी एकसंब्याला श्री. के. के. मठदसर यांच्याकडे तिला नेऊन एका खोलीत ठेवले. संध्याकाळपर्यंत काही फरक न पडल्यामुळे डॉक्टरांचे औषध देऊन परत कल्लोळला आलो.

त्या रात्री असा विचित्र अनुभव आला की काही विचारू नका. घराच्या भिंतीतून नाना प्रकारचे आवाज येऊ लागले. असे आवाज प्रत्येक भिंतीतून येऊ लागले. हे आवाज येण्यास सुरुवात होऊन १० मिनिटे झाली नाहीत तोच भिंतीवर रंगीबेरंगी चित्रे उमटू लागली. हा विलक्षण प्रकार पाहून आम्ही अगदी घाबरून गेलो व गल्लीतील वडिलधाऱ्या माणसांना घरी बोलावून घेतले व त्यांना सोबतीला बसवून घेतले. हे प्रकार ४-५ दिवस सतत चालू होते. आश्चर्य म्हणजे भिंतीवरील चित्रे एखाद्या कसलेल्या चित्रकाराने काढावीत तशी होती. परंतु पाच दिवसात मारुतीचे स्त्रोत्र म्हणू लागताच ती चित्रे अदृश्य झाली. मात्र भिंतीतून चित्रविचित्र आवाज येणे चालूच होते. अशा प्रकारच्या लहानमोठ्या घटना डिसेंबर १९७३ च्या पौर्णिमेपर्यंत घडतच होत्या. यानंतर भयानक घटना घडण्यास प्रारंभ झाला.

डिसेंबर १९७३ च्या पौर्णिमेच्या पहाटे चार वाजल्यापासून माझी बहीण आणि पत्नी या दोघीही बेशुद्ध पडू लागल्या. दोन-तीन तासपर्यंत त्या अशा पडत, पुन्हा दहा मिनिटापर्यंत शुद्ध येई. असे होत होत आम्हा कुटुंबियांची परिस्थिती पार बिघडून गेली. घरात चूलही पेटेना. स्वयंपाक करणे अशक्य झाले. पीठ, तांदूळ, जळण, पाण्याची भांडी हे सर्व अदृश्य होऊ लागले. हा काय प्रकार म्हणून मी कसून तपास केला. स्वत: स्वयंपाक घरात बसून राहिलो. तरी कशाचा काही पत्ता लागेना. अदृश्य झालेल्या वस्तू परत कुठेच मिळाल्या नाहीत. साऱ्या वस्तू पुन्हा नव्यानेच खरेदी कराव्या लागत. यामुळे दिङ्मूढ झालो. काही सुचेना. बहीण आणि पत्नी बेशुद्ध पडलेल्या तशाच तासन्‌तास दिवसभर सुद्धा पडून राहात. पुढे बेशुद्धीनंतर ८ ते १० तासानंतर उर्दू किंवा मुसलमानी भाषेत बोलू लागल्या. (या भाषेचा त्यांना

यापूर्वी गंधही नव्हता.) हा काय प्रकार असावा याचा मी विचार करू लागलो, तोच त्यांचे बोलणे बंद झाले. दोघींचीही जी तोंडे एकदम बंद झाली ती तीन दिवसपर्यंत बंदच राहिली. या अवधीत ना पाणी, ना अन्न अशी त्यांची अवस्था झाली. म्हणून त्यांना सलाईनवर ठेवले. तीन दिवस तोंडही उघडले नसल्याचे पाहून आम्ही शेवटी तिसऱ्या दिवशी संध्याकाळी प्रयत्न करून तोंड उघडायला लावले, तर तोंडातून चुन्याचे मोठमोठे खडे, हळदीची पूड, राख मिसळलेली वाळू, सुयांचे तुकडे अशा वस्तू बाहेर येऊ लागल्या. अशा वस्तू येण्याचे प्रकार दिवसातून आठ ते दहा वेळा तरी होत असत. पाच-सहा दिवसातच तोंडात जखमा होऊन रक्त यायला सुरुवात झाली. त्यामुळे दोघींनाही भयंकर यातना होऊ लागल्या. पुढे जखमा थोड्या बऱ्या झाल्या नाहीत, तोच पत्नीच्या चेहऱ्यावर चुना, हळद, कुंकू, राख, विभूती या सर्व वस्तूंचे पट्टे उठण्यास प्रारंभ झाला. याशिवाय अत्यंत दुर्गंधीयुक्त अशा काळ्या रंगाचे पट्टेही उमटू लागले. चेहरा बघणारी माणसे घाबरत, मुले भीतीने किंचाळत, घरात राहणेही आम्हाला कठीण होऊन बसले.

असे प्रकार चालू असतानाच एके दिवशी दुपारी पत्नीच्या डोक्यातून चटणी पडण्यास प्रारंभ झाला. हा नवा प्रकार पाहून तिच्याजवळ दोन तीन माणसे सतत आळीपाळीने बसून राहण्याची व्यवस्था करावी लागली. कारण ती कोणत्याही वेळी बेशुद्ध पडे. त्यामुळे तिच्या डोक्यावर पडणारी चटणी पुसून काढावी लागे. तिचे चटणीने माखलेले केस दुसऱ्यांना विंचरून वरचेवर स्वच्छ करावे लागत. दर पाच-दहा मिनिटांनी हा उद्योग हा करावा लागे.

हा प्रकार चालू असतानाच तिच्या डोळ्यावरील भुवयांतून एक प्रकारचा काळा द्रव पदार्थ बाहेर येण्यास प्रारंभ झाला. निरनिराळ्या रंगाच्या पट्ट्याही येऊ लागल्या. चटणी, काजळ हे पदार्थही येऊ लागले. पुढे या गोष्टींचा अतिरेक झाला. दिवसांतून किमान २०-२५ वेळा तरी हे प्रकार घडत, त्यासाठी दिवसातून १०-१५ हातरुमाल किंवा फडकी लागत. दोघे जण तर कायमचेच जवळ बसून राहू लागलो. बाहेर येणाऱ्या काळ्या द्रव पदार्थामुळे तर पत्नीला दिसणेच बंद झाले. आम्हा सर्वांची अवस्था अगदी दयनीय झाली. चहा, जेवण, आंघोळ वगैरे गोष्टींकडे आमचे कुणाचे लक्षच नव्हते. अश्रू गाळण्याशिवाय आम्ही काहीच करू शकत नव्हतो. काही सुचत नव्हते.

यावेळी पत्नी पाच महिन्यांची गरोदर होती. एके दिवशी तिला चहा पिण्यासाठी उठवायला लागलो तर पोट सपाट झाल्यासारखे वाटले. पण त्याचे फारसे मनावर घेतले नाही. कारण वरचेवर उपवास घडत असल्यामुळे प्रकृती क्षीण झाली असावी असा तर्क केला. गर्भपाताचे किंवा एम. सी. चेही काही लक्षण दिसले नव्हते. तरीही मी थोडा चिंताक्रांत झालो. इतक्यात घरावर कावळे व घारी ओरडत असल्याचा

आवाज ऐकायला आला. म्हणून कुतूहलाने घराच्या पत्र्यावर प्रयत्न करून चढलो तर कापडाच्या सुरळीत अर्धवट वाढलेला गर्भ, मांस इत्यादी आढळून आले. हा प्रकार पाहून तर जास्तच घाबरलो. पत्र्यावर कोणीही सहज चढून जावे अशी परिस्थिती नव्हती. कोणी टाकले म्हणावे तर आवाजही झालेला नव्हता. गर्भ गुंडाळलेले कापडही विचित्र होते. त्याला तीन-चार प्रकारच्या रंगीबेरंगी बाहुल्या जोडल्या होत्या. गर्भही नुकताच गर्भपात झाल्याप्रमाणे ताजा दिसत होता.

१९७४ मार्चपर्यंत दोनदा अशा रीतीचा विचित्र प्रकार घडला.

पत्नीच्या डोळ्यांना दिसणे तर बंद झालेच होते. त्यात आहारही बंद झाला. म्हणून आम्ही तोंडात बिस्किटे घालू लागलो, तर तोंडात घातलेल्या बिस्किटाची पूड कपाळावर येत असे. मात्र तोंडातील लाळेचा ओलावा त्या पुडीला नसायचा. हा एक आश्चर्यकारक प्रकार होता. हा प्रकार का व कसा घडतो हे बुद्धीला कळणे अशक्य होते. हे सर्वच प्रकार मानवी नसून कोणा अदृश्य शक्तीचेच असावेत अशा ठाम निर्णयाला मला येण्यास १९७२ ते १९७५ पर्यंतच्या घटनांनी भाग पाडले.

हे प्रकार चालू असतानाच १९७४ च्या जुलैमध्ये पत्नीला व मला अदृश्य मार बसू लागले. मला चाबकाने मारल्याचा अनुभव येई, आणि पत्नीला मार बसेल त्या ठिकाणी शरीरावर अर्धा इंचाची जखम होत असे. असे दिवसातून ५-६ वेळा होई. त्यामुळे पत्नीच्या शरीरभर जखमाच जखमा झाल्या. औषधोपचार करू लागलो तरी नवीन जखमा होतच राहिल्या.

आणखी एक विचित्र प्रकार सुरू झाला. तो म्हणजे झालेल्या जखमांतून पत्र्याचे तुकडे, स्प्रिंगसारख्या तारांचे तुकडे (सुरळी असलेले), डॉक्टर वापरतात त्या सिरिंजचे तुकडे अशा वस्तू येऊ लागल्या. पुढे सप्टेंबर १९७५ पर्यंत पत्नी थोडी थोडी शुद्धीवर येऊन, उठून बसणे, फिरणे करू लागली. काही दिवसांनी ती पुन्हा गरोदर असल्याचे आढळून आल्यामुळे या खेपेस कसेही करून गर्भाचे रक्षण करायचेच असे ठरविले. काय करावे, कुठे ठेवावे याचा विचार करू लागलो. कारण कल्लोळपासून अवतीभोवती ३५-४० मैलांपर्यंत कुठेही गेले तरी रस्त्यात असे प्रकार घडतच होते. म्हणून शेवटी बेळगावला ठेवण्याचे ठरविले. त्याच दिवशी तिच्या दोन्ही हातात दोन छिद्रे पडल्याचे आढळून आले. संध्याकाळी त्या छिद्रातून हळद, कुंकू, राखमिश्रित साखर, हाडकाचे तुकडे मिसळलेली साखर येण्यास प्रारंभ झाला. हळद-कुंकू पूड-रूपात पडे, तर साखर इत्यादी बांधलेल्या कागदाच्या पुडीतून बाहेर पडे. ही साखर मात्र खाण्यालायक नव्हती, त्याला दुर्गंधीही होती. पुन्हा डोक्यात चटणी, तोंडभर काजळ असा प्रकार सुरू झाला व ते सर्व पुसून काढण्यातच आम्ही गुंतलो. असो. अशा प्रकारांनी पुन्हा १५-२० दिवसांत तिला अशक्तपणा आला. म्हणून शेवटी ऑक्टोबर १९७५ मध्ये तिला बेळगावला

पाठविले. तेथे किरकोळ प्रकार घडत असतानाच डिसेंबर १९७५ मध्ये ती सुखरूप बाळंत झाली. घरात मात्र आम्हाला त्रास होणे सुरूच होते.

पुढे १९७६ च्या मे मध्ये बाळंतिणीला कल्लोळला घेऊन आलो. पत्नी घराच्या दारात आली नाही तोच तिच्या डोक्यातून पुन्हा चटणी गळू लागली. चटणीचे प्रमाण फारच असल्यामुळे ती डोळ्यातही गेली. हे पाहून एकाने तिच्याजवळचे मूल घेऊन तिला हात धरून आत आणले व तिचे केस विंचरून स्वच्छ केले. तसेच डोळे, भुवया यातील चटणीही पाणी लावून रुमालाने स्वच्छ पुसून काढली. डोळ्यात सारखे पाणी येऊ लागले व बराच त्रास झाला. रात्री २ वाजेपर्यंत तिला थोडा आराम पडला. पण मूल किंचाळू लागल्यामुळे पांघरून काढून त्याची तपासणी केली असता त्याच्या डोक्यात चटणी, अंगड्यात पूर्ण चटणी भरलेली आढळून आली. हा प्रकार पाहून तर आम्ही पूर्ण हताश झालो व मोठ्या विवंचनेत पडलो.

दुसऱ्या दिवशी कल्लोळ गाव सोडून एकसंब्यास येऊन राहण्याचे ठरवले व त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी आलो. तेथे एक दिवस कुणालाही कसलाही त्रास झाला नाही. पण नंतर कल्लोळप्रमाणेच मुलाला व पत्नीला चटणी व शिजलेला चुना यांचा त्रास होऊ लागला. त्यामुळे मुलाला परगावी माझ्या मामीकडे (सासूबाईकडे) ६-७ महिने ठेवले. (मामीनेच मुलाला पुढे ११ वर्षे सांभाळले.) मात्र एकसंब्यात पत्नीला त्रास होणे सुरूच होते. पुढे पुढे जेवताना ताटात चुना, रॉकेल, सुयासुद्धा पडू लागले. त्यामुळे जेवणे अशक्य होऊन बसले. म्हणून आम्ही दोघेही एकाच ताटात जेवू लागलो. कारण माझ्या ताटात कधीच काही पडत नसे. पण एकदा असे झाले की पत्नीने हातात घेतलेल्या भाकरीत चुना व रॉकेल पडले. माझ्या बाजूच्या भाकरीत काही पडले नव्हते. पण संपूर्ण भाकरीला मात्र रॉकेलचा वास होता. खानावळीतून किंवा दुसऱ्यांच्या घरून भाकरी आणली तरी असा प्रकार घडू लागला, म्हणून ५-६ वेळा घर बदलून पाहिले, तरीही हा प्रकार थांबेना. नंतर आम्हाला असे आढळून आले, की हायस्कूलचा शिपाई कृष्णा आणापा चिखले व शिक्षक श्री. के. एस्. पट्टणकुडे सर यांच्या घरून आणलेल्या जेवणात कधीच काही पडत नाही. म्हणून त्यांच्याकडचेच जेवण आणून जेवू लागलो.

अशा रीतीने जेवणाचा प्रश्न समाधानकारकपणे सुटला, तरी घरी किरकोळ त्रास सुरूच होता. एके दिवशी घराच्या भिंतीवर व भिंतीवरील देवांच्या फोटोच्या काचेच्या आत काजळ माखलेले दिसून आले.

अशा प्रकारे नाना तऱ्हेचे त्रास सतत होऊ लागून माझे मानसिक स्वास्थ्य पार बिघडून गेले. भाकरीसाठी दुसऱ्यावर अवलंबून राहणे, घरी सुखाने एक घास खाण्याचाही हक्क नसणे हे पाहून कशाला जगायचे असे वाटून जीव नकोसा झाला व एके दिवशी घरातले देवांचे फोटो गोळा करून, तसेच भानामतीवरील गोळा

केलेले मंत्र वगैरे साहित्य घेऊन कृष्णा नदीत (कल्लोळजवळील) बुडून जीव द्यायच्या उद्देशाने घरात कुणालाही न सांगता रात्री निघालो.

रात्री एक वाजता नदीजवळ येऊन कंबर व मांड्यांना मोठे दगड बांधले व नदीत छातीएवढ्या पाण्यात गेलो. आता मरायचेच आहे तर शेवटी मरण्यापूर्वी गुरूचे एकदा नामस्मरण करावे या उद्देशाने गुरू दत्तात्रयाचा मंत्र १०८ वेळा म्हणालो व पाण्यात बुडलो. त्यानंतर मी शुद्धीवर आलो तेव्हा रात्रीचे २॥-३ वाजले होते आणि मी नदीवरील फरशीवर पडलो आहे असे मला आढळून आले. माझ्या उशाजवळ एक संन्यासी बसलेला दिसला. माझे सर्व अंग ओलेचिंब होते व माझ्या शरीराला बांधलेले ते मोठे दोन दगड जवळच पडले होते. हे काय घडले असा मनात विचार आला, तोच तो संन्यासी म्हणाला, "तू आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न करणे हे सर्वथा चूक आहे. तुझ्या कुटुंबाला सप्तमुखी भानामतीची करणी झालेली असून मी सांगतो तसे कर, म्हणजे ब्याऐंशी सालापर्यंत तू या पीडेतून मुक्त होशील. ताबडतोब घरच्या सर्व लोकांना घेऊन गाणगापूरला जा. गुरुवारी दत्ताची पालखी फिरते. त्यावेळी तुला सूचना मिळेल, त्याप्रमाणे वाग." असे म्हणून तो संन्यासी अंधारात अदृश्य झाला. माझ्या संकटातसुद्धा माझी चिंता वाहणारी कोणती तरी अद्‌भुत शक्ती असल्याची या प्रकाराने मला खात्री झाली व मी घरी आनंदाने परतलो.

घरच्या लोकांना झालेला प्रकार न सांगता गाणगापूरला जाण्याच्या तयारीला लागलो. त्याप्रमाणे ५-६ दिवसात सर्व कुटुंबियांना घेऊन गाणगापूरला गेलो. पुजाऱ्यांनी सांगितलेला धार्मिक विधी पार पाडून पालखी निघण्याची वाट पाहू लागलो. आम्ही सारे देवळातच बसलो होतो. पालखी निघाली व पुजारी लोक ती घेऊन देवळाभोवती प्रदक्षिणा घालू लागले. इकडे मी व वडील यांच्याखेरीज इतर सर्व कुटुंबीय बेशुद्ध पडले. आम्ही तेथेच बसून राहिलो. प्रदक्षिणा संपवून पुजाऱ्यांनी पालखी परत आत आणली व नंतर ते निघून गेले.

आम्ही बसूनच राहिलो. आमच्या समोरच आम्हाला तीन मडकी आढळून आली. त्यामध्ये चुना, चटणी, काजळ भरले होते. तसेच हाडाचा एक सहा इंच लांबीचा तुकडाही त्या मडक्यांपैकी एकात होता. इतक्यात एक वेडसर भिकारी तेथे आला व आम्हाला बघून हसू लागला; आणि म्हणाला, "ही गाडगी घेऊन यज्ञाच्या ठिकाणी जा." आम्हाला ही जागा नवीन असल्यामुळे काही समजेना. तेव्हा तो ती जागा दाखवण्यास तयार झाला. यावेळी रात्रीचे ८ वाजून गेले होते व बेशुद्ध झालेले आमचे कुटुंबीय परत शुद्धीवर आले होते.

वडील त्या सर्वांना घेऊन मुक्कामाच्या जागी गेले. मी त्या भिकाऱ्याच्या पाठीमागून यज्ञस्थळाकडे गेलो. तेथे गेल्यावर तो भिकारी नाहीसा झाला व त्या

ठिकाणी कल्लोळच्या नदीवर भेटलेला संन्यासी दिसला. चटणी, चुना, काजळ यांनी भरलेली ती तीन गाडगी व तो हाडकाचा तुकडा हे सर्व त्या संन्याशाने तेथेच पुरले. "आता काही काळजी करू नकोस. पण परत गावी गेल्यावर एकसंबा आणि कल्लोळ या दोन्ही गावांच्या मध्यावर चिंदीपीर आहे, तेथे जमिनीत पुरलेल्या काही वस्तू आहेत. त्या उकरून काढून व दत्ताचे स्मरण करून त्या वस्तू स्मशानात नेऊन जाळ." एवढे बोलून तो संन्यासी निघून गेला.

तेथून मी रात्री दहा वाजता परत गाणगापूरला मुक्कामाच्या जागी आलो. ह्यावेळी सर्व मंडळी अगदी आनंदात असल्याचे दिसले. नंतर आम्ही जवळ असलेले खाऊन घेतले. सहा वर्षात हेच प्रथम सुखाने खाल्लेले अन्न होते.

दुसऱ्या दिवशी परत एकसंब्यास आलो. संन्याशाने सांगितलेली सर्व हकीगत वडिलांना सांगितली व आलेल्या रात्रीच कल्लोळकडे निघालो. चिंदीपीरजवळ येऊन त्या संन्याशाने सांगितलेल्या खुणेच्या जागी खुरप्याने खणू लागलो. १० ते २५ इंच खोल खणले. काळी भुसभुशीत माती असल्यामुळे खणायला त्रास झाला नाही. त्या ठिकाणी थोडे असेच इकडे तिकडे खोल खणल्यावर एके ठिकाणी चारपाच कापडी बाहुल्या आढळल्या. मी बाहुल्या फाडून पाहिले तेव्हा आतमध्ये चुना, चटणी, काजळ व हाडाचे तुकडे असल्याचे आढळून आले. तसेच ६ ते ७ इंच लांबीचे एक हाडूकही होते. ते सर्व स्मशानात नेऊन जाळले. पण हाडूक मात्र मधेच कुठे गडप झाले कळले नाही.

ही १९७८ सालची घटना. नंतर क्रमाने हळूहळू त्रास होणे कमी झाले. पुढे मी व पत्नी एकसंब्यास राहिलो व वडील, आई व बहीण हे सर्वजण कल्लोळमध्ये आमच्या पूर्वीच्या घरी जाऊन राहिले.

५ जुलै १९७९ रोजी कल्लोळमध्ये रात्री वडील, आई व बहीण हे जेवत असताना वडिलांच्या दातांना काहीतरी बडवल्यासारखे झाले. म्हणून त्यांनी हात लावून पाहिले तर तोंडातील एक बळकट असलेला दात नाहीसा झाल्याचा त्यांना आढळला. त्याला कसली पूर्वी किंवा आता इजाही झाली नव्हती व रक्तही आले नव्हते. तोंडात दुसरा एक हालणारा दात होता. तो मात्र सुरक्षित होता. नंतर तोंडातला गायब झालेला बळकट दात वडिलांना योगायोगाने दारात सापडला. तो पाहून वडिलांची मनस्थिती बिघडली. त्यांचे धैर्य खचले. हे त्यावेळी मला कोणीही सांगितले नाही. पण पुढे १६ जुलै १९७९ रोजी दुपारी १२ वाजता वडील घरातून निघून गेले, ते आजतागायत परत आले नाहीत. त्यांचा शोध केला तरी पत्ता लागलेला नाही.

थोडक्यात सांगायचे, तर मी भानामतीच्या संकटातून कुटुंबाला वाचवू शकलो, पण वडिलांना गमावून बसलो; आणि याचेच मला अतीव दु:ख होते. इतर

कुटुंबीय जिवंत आहेत, म्हणजे त्यांचा पुनर्जन्मच झाला आहे असे म्हणावयास हरकत नाही. या भानामतीग्रस्त काळात मी आर्थिकदृष्ट्या व मानसिकदृष्ट्या किती गांजलो होतो हे एक परमेश्वरालाच माहीत.

अशा प्रकारे १९८३ पर्यंत मी या पिडेतून पूर्ण मुक्त झालो आणि सुखाने जीवन जगू लागलो. काही लोक माझ्या या कथनावर विश्वास ठेवणार नाहीत. त्यांनी तो ठेवावा असा माझा आग्रह नाही. माझी परमेश्वराजवळ एवढीच प्रार्थना आहे की असा त्रास कोणालाही होऊ नये. या प्रार्थनेबरोबरच माझी ही शोककथा संपवितो.

स्वत:चा अनुभव हाच जगात सर्वश्रेष्ठ आहे.

सही

(एस्. जे. रजपूत. F. D.C. )
सी. के. हायस्कूल, यकसंबा,
ता. चिक्कोडी, जि. बेळगांव.

श्री. रजपूत हे पदवीधर आहेत. त्यांच्या हायस्कूलमध्ये व्याख्यानासाठी तेथील आमंत्रणावरून मी एकदा गेलो असता त्यांनी वरील प्रकरण मला कथन केले. त्या हायस्कूलमधील स्टाफपैकी काहींनी 'वरील घटना प्रकाराचे आम्ही साक्षीदार असून हा प्रकार आम्ही प्रत्यक्ष पाहिला आहे,' असे मला सांगितले. श्री. रजपूतांनी काही दिवसांनी हे प्रकरण माझ्या विनंतीवरून वरीलप्रमाणे (कानडीतून) लिहून काढले व माझ्याकडे खास दूतामार्फत पाठवून दिले. ते त्यांच्याच शब्दात वर दिले आहे.

वरील प्रकरणातील डोक्यात चटणी पडण्याचा प्रकार हेरवाडच्या भानामतीच्या प्रकरणातही घडला आहे. (मात्र तेथे झोपल्यानंतर अंथरुणात चटणी पडत असे.) चेहऱ्यावर काळे पट्टे उमटण्याचा प्रकारही तेथे घडला आहे. अनेकदा गर्भपातही झाला आहे. (पाहा, 'विज्ञान व अंधश्रद्धानिर्मूलन' प्रकरण ४)

वरील प्रकरणातील भिंतीवर गूढ रीतीने चित्रे उमटण्याचा प्रकार निपाणी (जि. बेळगाव) येथील देवचंद कॉलेजचे प्रा. ए. आर. पेंढारकर यांच्या घरातही घडला असून प्रस्तुत लेखकाने यापैकी एक चित्र पाहिले आहे. ते आजही स्पष्टपणे दिसते. बाकीची चित्रे त्यांनी दुसऱ्या वेळी भिंतीला रंग देताना मुजवली. प्रा. अशोक रघुनाथ पेंढारकर हे एम. एस्सी. (भौतिकशास्त्र) असून देवचंद कॉलेजमध्ये १९६२ सालापासून भौतिकशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम करत आहेत. भौतिकशास्त्र विभागाचे ते प्रमुख आहेत. निपाणीच्या पश्चिमेस श्रीनगर नावाची जी नवीन वसाहत निर्माण

झाली आहे, तेथे १९७९ साली प्लॉट खरेदी करून त्यांनी इमारत बांधली. घराचा विस्तार ५०० चौ. फू. इतका असून घराला एकूण चार खोल्या आहेत. इमारत बांधल्यानंतर स्वयंपाकघराच्या पूर्वेच्या भिंतीवर गणपती, हनुमान यांची अनेक चित्रे एकदा अचानकपणे उमटलेली त्यांना दिसली. त्यांनी मला स्वाक्षरीने एक निवेदन दिले असून त्या निवेदनात ते म्हणतात,

"ही चित्रे आम्हाला गणपतीची (किंवा हनुमानाची) आहेत हे स्पष्टपणे दिसत असले तरी इतरांना तसे दिसत असेल का, असा प्रश्न पडला. म्हणून आम्ही अशा गोष्टीत इंटरेस्ट असलेल्यांना ती मुद्दाम दाखवली, तेव्हा त्यांनीही ती स्पष्ट गणपतीचीच असल्याचे सांगितले. या चित्रांमुळे आमच्या जीवनावर काही परिणाम (बरा अगर वाईट) झाल्याचे आढळून आलेले नाही. उलट आम्ही सश्रद्ध असल्यामुळे आम्हाला या गोष्टीचे समाधान वाटले."

आजही दिसणारे गणपतीचे चित्र इतके सुबक आहे की ते एखाद्या कसलेल्या चित्रकारानेच काढले आहे असेच कोणीही म्हणेल. पण ते आपोआपच निर्माण झालेले आहे असे पेंढारकर पती-पत्नी सांगतात. (प्रा. पेंढारकरांच्या पत्नीही एम. एस्सी. असून त्यांचा एम. एस्सीचा विषय गणित आहे.)

भिंतीवरची चित्रे आपोआप कशी निर्माण होऊ शकतात?

ही कुणाची 'करणी'?

हे शोधून काढण्यापूर्वी प्रथम अशा घटनांची सत्यता स्वीकारली पाहिजे. रूढ विज्ञानाचे घोडे येथेच पेंड खाते ! (बऱ्याच वर्षांपूर्वी महाराष्ट्रात सार्वजनिक ठिकाणी - एका कातळावर - निरनिराळ्या देवतांची चित्रे आपोआप उमटत असल्याची घटना असंख्य लोकांनी पाहिल्याचे वृत्त पुण्याच्या दै. 'तरुण भारत'मध्ये सतत कित्येक दिवस येत होते.

■■

## प्रकरण चौथे

# भेंडवाडची सर्वांसमक्ष घडणारी भानामती

*जडाजडी अंशी । राहटे जे सरसी ।*
*ते चेतना गा तुजसी । लटिकें नाहीं ।।*

**- ज्ञानेश्वर**

---

**को**ल्हापूरच्या दै. 'पुढारी' च्या ६ एप्रिल १९८२ च्या अंकात खालील बातमी प्रसिद्ध झाली आहे.

### *भेंडवाड गावातील भानामतीचा प्रकार मांत्रिकाने थांबविला?*

*बेळगाव ता. ५ : रायबाग तालुक्यात खळबळ उडविणाऱ्या भेंडवाडजवळील भानामतीला थोपवून धरण्यात एका मांत्रिकाला अखेर यश मिळाले, असे त्या भागातील लोक सांगत आहेत. इंग्रजी चित्रपटाप्रमाणे हे प्रकार सुरू झाले काय आणि एका स्वामीने येऊन त्या भानामतीला हटकले काय, साराच प्रकार चित्तथरारक आहे.*

*चिकोडी रोड रेल्वे स्थानकापासून ५ मैलावर सिदलिंगप्पा याचा मळा आहे. मळ्यातच वृद्ध सिदलिंगप्पा आपल्या कुटुंबियांसह राहतो. गेले वर्षभर हा किरकोळ स्वरूपाचा त्रास सुरू होता; परंतु एक महिन्यापासून विध्वंसाचे प्रमाण वाढले. घरात अचानक आग लागणे, ती विझवण्यास गेल्यास दुसरीकडे आग लागणे, कपडे अचानक पेटणे, झोपडीला आग लागणे, स्वयंपाकात माती, खडे, राख पडणे, शेतातील केळीची, मक्याची, वांग्याची झाडे आपोआप कापली जाणे, रचून*

ठेवलेले, कापलेले धान्य जळून जाणे इत्यादी. तसेच ९ शेळ्या, २ म्हशी, १ गाय ही जनावरे अचानक मरण पावली. शेताला पाणी देण्यासाठी मोट पाण्यात सोडली असता ती पाणी न भरता रिकामीच वर येत होती. बाटलीतील तेल, टोपलीत भरलेले धान्य अचानक नाहीसे होत होते. या प्रकारात सिदलिंगप्पाला मदत करण्यास आलेल्या बाहेरच्या लोकांनाही त्रास सुरू झाला. या प्रकारचे वृत्त पसरताच हजारो लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्या ठिकाणी येऊ लागल्या. बऱ्याच लोकांना हे प्रकार प्रत्यक्ष बघता आले. हे भानामतीचे प्रकार बंद होण्यासाठी सिदलिंगप्पाने मंत्र-तंत्र, देव-देवस्कीचे अनेक उपाय केले, पण गुण आला नाही. एका मांत्रिकाला तर फार त्रास सहन करावा लागला. वारंवार तो आपोआप भिंतीवर फेकला जात होता. या सर्व प्रकारांनी सिदलिंगप्पा व त्याचे कुटुंबीय घाबरून गेले व त्यांनी गाव सोडण्याचा निर्णय घेतला.

हे सर्व प्रकार बघून गावातील प्रमुख मंडळी व्ही. ए. मांडवकर, महादेव रामनगोळ, बाबु इराप्पा चौगुला, पंडितराव कुलकर्णी यांनी चिंचली येथील लोकांना मदत करण्यासाठी तंत्रमंत्रांचा उपयोग करणारे स्वामी श्री. रवी सी. एस. कंठी यांना आणले. त्यांनी पाहणी करून सांगितले, की कोणी तरी सूडबुद्धीने हे भानामतीचे प्रकार करत आहे. वेताळाच्या तीन बाहुल्या मंत्राने भारून हे विध्वंसक कार्य सुरू केले आहे. नंतर त्यांनी हे प्रकार बंद करण्यासाठी आपल्या मंत्राचा उपयोग सुरू केला, पण ज्या मांत्रिकाने हे प्रकार सुरू केले त्याने स्वामींना नांगरलेल्या मळ्यात पळायला लावले, दोन-तीन वेळा त्यांना आपोआप उचलून भिंतीवर फेकण्यात आले. अखेर दोन दिवसांच्या प्रयत्नानंतर त्यांना हे प्रकार बंद करण्यात यश आले. एका महिलेने सूड घेण्यासाठी एका मांत्रिकाच्या सहाय्याने हे भानामतीचे प्रयोग केले असे भेंडवाड गावात बोलले जात आहे. या भानामती प्रकरणात सिदलिंगप्पाचे १५००० चे नुकसान झाले.

भानामतीच्या या प्रकाराचे वैशिष्ट्य म्हणजे सिदलिंगप्पाच्या गंजीला आग लागली. पण त्याच्या बाजूलाच असलेल्या त्याच्या भावाच्या गंजीला मात्र आग लागली नाही. त्याची १०-११ जनावरे मरण पावली, पण देवाच्या नावाने सोडलेल्या बोकडाला मात्र काही झाले नाही. ज्या ज्या ठिकाणी हे प्रकार होत त्या त्या ठिकाणी माणसाच्या टाचेचा ठसा उमटलेला दिसे.

असेच भानामतीचे प्रकार २०-२५ वर्षापूर्वी या भागातील मारुती रामा नाईक यांच्या घरी झाले होते. अशी माहिती गावचे पाटील श्री. एम. आर पाटील यांनी सांगितली.

बातमी प्रसिद्ध झाल्यानंतर लेखक भेंडवाड या गावातील संबंधित कुटुंबियांना, व हा भानामतीचा प्रकार प्रत्यक्ष पाहिलेल्या (तसा तर गावातील सर्वच लोकांनी तो

पाहिला होता.) गावातील लोकांना भेटून वर बातमीत दिलेली माहिती कितपत बरोबर आहे याची प्रत्यक्ष तपासणी करण्यासाठी तेथे गेला. तेथे त्याला जे आढळले त्याचा हा सविस्तर वृत्तांत :

वरील बातमी एप्रिलमध्ये प्रसिद्ध झाली असली तरी प्रत्यक्ष घटना घडण्यास त्या वर्षीच्या ऑगस्ट महिन्यापासून सुरुवात झाली होती. दररोज काही ना काही प्रकार घडत असे. असे सात-आठ महिने हे प्रकार सुरू होते. ज्या मळ्यात हे प्रकार घडत होते तो मळा भेंडवाड गावापासून एक किलोमीटर अंतरावर असून हे प्रकार पाहण्यासाठी बऱ्याच अंतरावरून लोक सायकली, मोटर सायकली, कार इत्यादी वाहनांतून रोज येत होते. हजारो लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्या मळ्याकडे सारख्या धाव घेऊ लागल्यामुळे ज्या ठिकाणी पूर्वी जाण्यासाठी रस्ता नव्हता, तेथे सारखे लोक जाऊन मळून आपोआपच उत्तम रस्ता तयार झाला होता ! काही लोकांना या भानामतीचे प्रत्यक्ष प्रकार पाहण्याबरोबरच प्रत्यक्ष अनुभव घेण्याचेही 'भाग्य' लाभले. कारण त्यांच्या सायकली, मोटर सायकली, कार ही वाहने पंक्चर झाली ! काही लोकांनी त्या घटनेचा संबंध तेथील भानामतीशी जोडला आहे.

ज्याच्या मळ्यात हे प्रकार सुरू झाले त्याचे नाव सिदलिंगा सत्याप्पा अंदाणी असून त्याचे सात जणांचे कुटुंब आहे. थोरला भाऊ मल्लाप्पा अविवाहित आहे. सिदलिंगाशिवाय त्याची बायको, दोन मुलगे, एक मुलगी व थोरल्या मुलाची बायको अशी कुटुंबात माणसे आहेत. थोरला मुलगा सत्याप्पा याचे लग्न झाल्यानंतर सून सावक्का ही नांदायला आली आणि चारच दिवसात हे भानामतीचे प्रकार सुरू झाले. प्रथम घराला आतूनच आग लागली. ती एकदम गॅसबत्ती भडकावी तशी लागली. पण थोड्या प्रयत्नाने लगेच विझलीही. अशी अकरा वेळा आग लागली आणि अकरा वेळा विझवण्यात आली. बाराव्या वेळी मात्र संपूर्ण खोप जळून गेली. प्रत्येक आगीच्या वेळी सून घरात होती. ती नसताना कधीच आग लागली नाही. घरातील इतर प्रकारही तिच्या उपस्थितीतच घडले आहेत. एकदा दगडी जाते फुटले. त्यावेळीही ती हजर होती.

जळण्याचे प्रकार घराबाहेर झाले, त्यावेळीही सून काही अंतरावर होतीच. घराबाहेर कापून रचलेली कुळथी जळली, ज्वारी जळली, वीस गाडी कडबा जळला, तूर जळली. जळण्याचे प्रकारही विचित्र. एकदम भडका व्हायचा. विझवायला गेले की दुसरीकडे भडका होत असे. शेवटी सारे जळून भस्म व्हायचे. काहीही शिल्लक राहात नसे.

या जळण्याच्या प्रकाराबरोबरच जनावरे मरण्याचे प्रकारही घडले. प्रथम जनावर थंडीने थरथर कापत असे. यानंतर काही तासातच ते मरून पडे. अशा रीतीने आठ शेळ्या (बातमीत नऊ म्हटले आहे ते बरोबर नाही.) दोन म्हशी व एक

गाय मेली. अशी एकानंतर एक जनावरे मरत असलेली पाहून सिद्दलिंगाने दोन बैल ४० मैलावरील हळ्ळूर या गावी आपल्या पाहुण्याकडे पाठविले. त्यामुळे ते वाचले व सोबतची गाडीही वाचली. (अन्यथा तीही जळली असती.)

वरील प्रकार घडत असतानाच घरात इतर प्रकारही सुरू होते. उदा. स्वयंपाकात राख व माती पडत असे. चहा केला तरी त्यात राख, कोळसा पडत असे. हे कितपत खरे आहे हे पाहण्यासाठी भेंडवाड गावातील काही तरुणांनी मुद्दाम मळ्यात येऊन सिदलिंगाच्या घरी चहा करण्याचा प्रयोग केला. उदा. भीमाप्पा शिवणगोळ हा दूध भरण्याचा धंदा करणारा व भानामतीचे प्रकार थोतांड मानणारा तरुण एकदा आपल्या मित्रांना घेऊन तेथे गेला व चुलीवर स्वत: पाण्याचे भांडे ठेवून त्यात त्याने चहा-साखर घातली व त्यावर झाकण घातले. इतकेच नव्हे तर त्याने एक काठी घेतली व ती झाकणावर ठेवून तिने चहा उकळेपर्यंत वरून झाकण दाबून धरले. चहा उकळल्याची खात्री पटल्यावर झाकण काढून पाहिले, तेव्हा चहात कोळशाची पूड व राख असल्याचे आढळून आले. हे स्वत: भीमाप्पानेच लेखकाला सांगितले आहे.

मुत्ताप्पा बंडी या सायकल दुकानदाराचा अनुभव तर याहूनही विलक्षण आहे. त्याने वर झाकण वगैरे काहीही न ठेवता चहा उकळायला ठेवला. तो उकळत असतानाच जवळच्या जमिनीची माती आपोआप उकरली जाऊन ती चहाच्या भांड्यात जाऊन पडली ! एका फूटावरून ही माती जाऊन पडल्याचे तो सांगतो. वीतभर जमीन उकरली होती, असेही तो म्हणतो. यावेळीही सिदलिंगाची सून मळ्यात होती.

अशा रीतीने स्वयंपाकात राख, माती, कोळसा पडू लागल्यामुळे सिदलिंगाच्या कुटुंबाला स्वयंपाक करणे व जेवणे मुष्कील झाले. (ज्या सुनेमुळे हे घडत होते तिच्या जेवणातही राख पडत असे व तिलाही उपास घडत होता. गावातील लोक किंवा हे प्रकार बघायला येणारे लोक त्या कुटुंबासाठी जेवण घेऊन येऊ लागले. पण कुटुंबातील लोकांनी अगोदर शिवले तर त्यातही राख पडे. लोकांनी त्यांच्या हातात उचलून जेवण (भाकरी इत्यादी) दिले तरच ते चांगले राही. हे राख पडण्याचे प्रकार दोन महिने चालले होते.

सर्वात आश्चर्यकारक प्रकार म्हणजे केळीची झाडे आपोआप बुडख्यातून कापून पडणे, मक्याची धाटे आपोआप कापली जाऊन मुठीत धरून ठेवल्याप्रमाणे ठेवली जाणे, वांगी तुटून (चावून टाकल्याप्रमाणे) पडणे, नंतर वांग्याची झाडेही कापली जाणे, केळी काठीने मारून चिरडल्याप्रमाणे होणे इत्यादी. दोन हजार केळी अशा रीतीने आपोआप चेंगरली जाऊन नाश पावली आहेत. वांगी प्रत्यक्ष माणसाने तोंडाने चावल्याप्रमाणे चावलेल्या व अर्धवट खाल्लेल्या अवस्थेत झाडातून तुटून पडली व नंतर वांग्याची झाडेही कापून पडली. एकही झाड शिल्लक राहिले नाही.

हे सर्व सिदलिंगा व त्याचे लोक, गडी वगैरे शेतात काम करीत असताना त्यांच्या समक्ष घडले आहे. त्यांच्या परोक्ष एकही घटना घडलेली नाही. सिदलिंगाच्या कुटुंबियांखेरीज त्यावेळी शेतात त्यांच्याबरोबर काम करीत असलेल्या गड्यानेही हे आपण प्रत्यक्ष पाहिल्याचे सांगितले. यावेळी सिदलिंगाची सूनही शेतात काम करीत होती.

सिदलिंगाने कापून ठेवलेले पीक जळू लागल्यामुळे, कापलेले ज्वारीचे पीक त्याने आपल्या एका पाहुण्यांना घेऊन जाण्यास सांगितले. पण ते नेले तर आपलेही पीक जळेल या भीतीने त्याने ते नेले नाही. त्यामुळे ते ठेवलेल्या ठिकाणीच जळून गेले. त्याची खोप जळून कुटुंब उघडे पडल्यावर शेजारच्या भाऊबंदाच्या लोकांनी त्यांना आपल्या खोपीत आसरा दिला नाही. म्हणून ते कुटुंब जवळच डोंगरात असलेल्या रामन कट्टी या मठात राहायला गेले. तेथे एके दिवशी त्यांनी आंघोळ करून कपडे धुतले व ते वाळवून व्यवस्थित घड्या घालून एका दगडावर ठेवले. काही वेळाने ते आपोआप पेटले व क्षणात जळून गेले. मठात राहूनही उपयोग नाही हे ओळखून ते कुटुंब परत मळ्यात आले व आपल्या भावाच्या जनावरांच्या गोठ्यात राहू लागले. पण एके दिवशी तो गोठाही संपूर्ण जळून गेला. तो पेटलेला असताना लोकांनी विझवण्याचा प्रयत्न करताना त्यातही अडथळे आले. उदा. विहिरीत सोडलेल्या घागरी भरत नसत. आग पसरू नये म्हणून विळ्यांनी व खुरप्यांनी खोप तोडू लागताच विळे व खुरपी मोडून पडत. मातीने आग विझवावी म्हणून माती खणू लागले तर कुदळ व फावडी मोडून पडत. तेथून दोन हातावर असलेली त्याच्या भाऊबंदाची खोप मात्र वारा सुटलेला असतानाही जळली नाही.

वरील बातमीत एका महिलेने सूडबुद्धीने हे एका मांत्रिकाच्या साह्याने केले असे लोकांचे म्हणणे असल्याचे म्हटले असले, तरी आपली महिला शत्रू कोण हे सिदलिंगाचे कुटुंब सांगू शकत नाही. सून घरात नांदायला आल्याबरोबर हे प्रकार सुरू झाले असल्यामुळे सुनेमुळेच हे घडत असून गोकाकच्या लोकांचा (सून गोकाकची आहे) यात हात असावा असे त्यांना वाटते. (नंतर या मुलीला घटस्फोट देण्यात आला.) कंठी या मांत्रिकाची शेतात त्रेधा तिरपीट उडाल्याचे खरे असल्याचे मात्र सांगण्यात आले. शेतात त्याला पळविले गेले हे विशेष नाही, तर त्याला कोलांट्या उड्याही मारायला लावल्याचे सांगण्यात आले !

■■

## प्रकरण पाचवे

# कवठेगुलंदची भानामती

*जे जडातेही नाडवी । इयेचा नाडू ।।*
*- ज्ञानेश्वर*

---

कवठेगुलंद हे नरसोबाच्या वाडीपासून पूर्वेला सुमारे दहा किलोमीटर अंतरावर कृष्णा नदीजवळील एक लहानसे खेडे आहे. या गावात १९८३ साली अण्णासाहेब सातगोंडा पाटील यांच्या घरी व मळ्यात घडलेली भानामती वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालेली नसल्यामुळे गावातील लोकांव्यतिरिक्त ती कोणालाही माहीत नाही. योगायोगाने तिची माहिती मला मिळाली. माझे काही परिचयाचे लोक त्या गावी आहेत. त्यांनी ती मला सांगितली व संबंधित कुटुंबाकडून तिची इत्थंभूत माहिती मिळविण्यासाठी मला आपल्या गावी पाचारण केले. त्याप्रमाणे मी तेथे गेलो असता माझ्या येण्याची पूर्वसूचना अगोदरच दिली असल्यामुळे अण्णासाहेब यांचे घरी बरीच मंडळी जमलेली दिसली. खुद्द अण्णासाहेब सातगोंडा पाटील (शिक्षण ७ वी पास, वय ४८) यांच्याकडून मिळालेली या भानामतीची माहिती अण्णासाहेब यांच्याच शब्दात खाली देत आहे. या माहितीला इतर जमलेली ग्रामस्थ मंडळी दुजोरा तर देत होतीच, पण अधूनमधून त्या माहितीत भरही घालत होती. कारण ही भानामती त्या सर्वांसमक्ष व गावातील इतरही अनेक लोकांसमक्ष घडलेली आहे.

"तो दिवस गुरुवार होता. स्वच्छ चांदणे पडले होते. मक्याच्या पिकाची राखण करण्यासाठी मी शेतातील बांधाकडेने जात होतो. इतक्यात एक बारीक दगड अंगाला येऊन लागला. कोणीतरी मक्याच्या पिकात बसून थट्टेने खडे मारीत आहे

असे वाटून मी म्हणालो, 'अरे,'जेवण घेऊन आलोय, ये.' कोणी बोलले नाही. काही अंतर गेल्यावर पुन्हा एक खडा अंगाला लागला. म्हणून मी पुन्हा म्हणालो, 'अरे मी तुझ्यासाठी भाकरी आणलीय् ये.' तरी कोणी आले नाही. त्या रात्री घोडेखोपीत बसून मी जेवू लागलो, तेव्हा खोपीवर मोठे दगड येऊन पडू लागले. हा प्रकार बराच वेळ चालू होता.

"नंतर दुसरे दिवशी रात्री ८ वाजता पुन्हा दगड पडण्यास सुरुवात झाली. जिकडून दगड येत होते तिकडे मीही गोफणीने दगड मारू लागताच विरुद्ध दिशेने दगड येऊ लागले. त्या दिशेनेही मी दगड मारू लागताच पुन्हा वेगळ्याच दिशेने ते येऊ लागले. गावात पंचायत इलेक्शन असल्यामुळे हा खोडसाळपणा विरोधी पक्षाच्या लोकांचा असावा असे मी ताडले. रात्री एक नंतर मात्र दगड येणे बंद झाले.

"तिसरे दिवशीही असाच प्रकार झाला. हा दगड येण्याचा प्रकार मात्र पुन्हा रात्री एकला बंद झाला. तो बंद होताच कुत्री भुंकण्याचा आवाज येऊ लागला. ज्या दिशेने कुत्री भुंकण्याचा आवाज येत होता त्या दिशेवरून दगड मारणारे लोक हायस्कूलच्या दिशेने जात असावेत, कारण तिकडे काही लोक राहातात, असा अंदाज मी बांधला. ते लोक पुढे जातील तसे कुत्री भुंकण्याचा आवाजही पुढेपुढेच जात आहे असा मी अंदाज केला. त्या दिशेवरून त्या लोकांचे राहण्याचे ठिकाण कोणते असावे हेही मी ताडले व काही विशिष्ट लोकांचा मला संशय आला.

"चौथ्या दिवशी मी माझ्या दोस्ताला बोलावून घेतले. सोबत आमच्या गड्याचे पोरगेही होते. गड्याच्या पोराला दोन माणसे दिसली, पण नंतर ती अदृश्य झाली.

"पाचव्या दिवशी पुन्हा दोघांना बरोबर घेऊन गेलो. त्यांना झाडावर बसवले. झाडावर बसलेले असतानाच त्या दोघांच्याही नेमके ढुंगणांना दगड मारले गेले ! पुन्हा सहाव्या दिवशी त्यांना घेऊन गेलो. त्या दिवशी त्या दोघांनाही दोन माणसे दिसली. पण तो भास होता; कारण प्रत्यक्ष माणसे असती तर त्यांची हालचाल दिसली असती. पण तसे काही नव्हते. म्हणजे माणसे असल्याचे चिन्ह दिसायचे. माणसे नसायची. कारण त्यांना धरायला गेले की ती गडप व्हायची व नंतर दगड यायचे.

"सातव्या दिवशी पुन्हा गड्याला माणसे दिसली. दगड गोफणीने मारल्याप्रमाणे सूँऽऽसूँऽऽ असा आवाज करीत येत. दगड बरेच मोठे असत. आमच्या जवळच येऊन ते पडत. पण एकही दगड कधी लागला नाही. रात्री बारा वाजले. पुन्हा गड्याच्या पोराला माणसे दिसली. पुन्हा खोपीवर दगड पडले. मी मोठ्याने आव्हान दिले. मला भीती नव्हती, कारण आम्ही जवळ हत्यारेही बाळगत होतो. त्या दिवशीही नेहमीप्रमाणे रात्री एकला दगड बंद झाले.

"आठव्या दिवशी सकाळी नऊ-दहाच्या सुमारास खोपीत जेवत होतो. गड्याच्या मुलाला कणसे मोडत असलेले लोक दिसले. पण जवळ जाताच ते नाहीसे झाले.

"नवव्या दिवशी गडी राखणीसाठी वस्तीला गेला. पुन्हा दगड येऊन पडू लागले. त्याने घरी प्रथमच माझ्या वडिलांना हे सांगितले.

"दहाव्या दिवशी वडिलांनी साठचा बल्ब लावण्यास सांगितले. मी बल्ब होल्डरमध्ये घालून कनेक्शन देत असतानाच बल्ब दगड लागून फुटला. त्या दिवशी खोपीत मध्यभागी मी कंदील लावून लोंबकळत ठेवला. आम्ही जेवत असतानाच तो दगडाने फोडण्यात आला.

"त्यानंतर आम्ही राखणीसाठी वस्तीला जाण्याचे बंद केले. काय नुकसान होते ते होऊ दे असा विचार करून राखण करण्याचे सोडून दिले. तरीसुद्धा दुसऱ्या दिवशी दिवसा जाऊन पाहिले तेव्हा खोपीत दगडांचा ढीग रचून ठेवलेला दिसला. म्हणजे दगड मारणारे लोक गप्प बसलेले नाहीत हे त्यांना दाखवायचे होते.

"त्यानंतर आमच्या मुलाला गावंधरीच्या (गावाच्या लगत असलेला पश्चिमेकडचा शेतभाग, याला गावंधरी म्हणतात. अण्णासाहेबांचे घर गावंधराजवळ आहे.) शेतात पुन्हा माणसे दिसली. (हे शेत घराला लागूनच आहे. त्यात ऊसाचे पीक आहे.)

"बाराव्या दिवशी रात्री आमच्या घराच्या पाठीमागच्या (पश्चिमेकडील) बंद दरवाजाला एक भलामोठा दगड येऊन आदळला. आम्ही दार उघडले. पण बाहेर कोणी नव्हते. पण तरीही दगड येऊन पडू लागले. किती दगड येऊन पडले याचा हिशेबच नाही. वरच्या फळीच्या छतातूनही दगड येऊन पडू लागले. पडल्यावरच दगड दिसायचे. बंद फळीच्या छतातून दगड कसे येत होते हे आम्हाला कळत नसे. तरीपण कुणी तरी माणसेच दगड मारत आहेत, असे मला वाटत होते. भानामतीचा संशय नव्हता. घरावर शंभरचा बल्ब लावला. तोही दगडाने फोडण्यात आला.

एकदा दिवसा गावंधरीतील (पश्चिमेकडील) ऊसात दोन माणसे आम्हाला पळाल्याची दिसली. म्हणून आम्ही तसेच गावातील हजारो लोक गोळा होऊन ऊसाला चोहोबाजूंनी वेढा घातला व ऊसाच्या प्रत्येक सरीतून घुसून त्यांना शोधण्याचा प्रयत्न केला. पण ते सापडले नाहीत.

"एकदा मी घरी दगड पडत असताना उगीचच 'पिस्तूल घेरे' असे म्हणालो. तर दुसरे दिवशी गड्याच्या मुलाला तो शेताच्या रस्त्याने जात असताना तिघे आडवे झाले व "तुझ्या मालकाजवळ पिस्तूल तरी आहे काय रे? हे पाहा, आमच्याजवळ पिस्तूल आहे" असे म्हणून त्याच्यावर पिस्तूल रोखले, तेव्हा तो घाबरून बेशुद्ध पडला. त्याला तसे पडलेले कुणीतरी पाहिले आणि सरळ उचलून आमच्या घरी आणले.

"घरात दिवसाही दगड पडत असल्यामुळे व पिस्तुलाच्या प्रकरणामुळे मला हा प्रकार सामान्य माणसांचा नसावा असे वाटू लागले. दिवसाही घरात सारखे दगड पडू लागल्यामुळे मी एकदा सहज म्हणालो, 'असे दगड कुठेतरी पडतात, पण या फोटोला का लागत नाहीत?' आणि काय आश्चर्य? मी ज्या फोटोला उद्देशून असे म्हणालो, तो फोटो नेमका दगड लागून फुटला ! असे ज्या ज्या वस्तूबद्दल आम्ही म्हणू त्या त्या वस्तूला नेमका कुठून तरी येऊन दगड लागे ! ही बातमी अनेकांना कळल्यामुळे हा अनुभव अनेकांनी येथे येऊन घेतला आहे. (तेथे जमलेल्या अनेक लोकांनी हे आपण प्रत्यक्ष पाहिल्याचे तेथेच प्रस्तुत लेखकाला सांगितले.) तसेच अनेकांनी बंद छतातूनही दगड येत असल्याचे पाहिले आहे. (ही गोष्टही आपण पाहिल्याचा निर्वाळा तेथे जमलेल्या अनेकांनी लेखकाला लगेच दिला.) या प्रयोगाने आम्ही आमचे स्वत:चे अनेक फोटो, बाटल्या इत्यादी वस्तू कुतुहलाने फोडून घेतल्या! हे दगड लागून फुटण्याचे प्रकार केवळ मीच नव्हे, तर जमलेल्यांपैकी कुणीही म्हटले तरी होत असे ! मात्र दगड़ कुठून येतात हे कळत नसे. दरवाजे बंद केले तरी दगड येत. हे दगड प्रत्यक्षात कुठून येतात हे कळण्यासाठी आम्ही एकदा प्रयोग केला. घराभोवतीच्या दगडांना चुना लावला. तेव्हा ते चुना लावलेलेच दगड घरात येऊन पडत असल्याचे आढळले. म्हणजे नवीन (शून्यातून) दगड निर्माण होत नव्हते, तर अवतीभोवतीचेच दगड येऊन पडत होते. तसेच हजारो दगड येऊन पडले तरी एकही दगड कधी कुणाला लागला नाही. जखम होण्याचा प्रश्नच नाही. (याला अपवाद फक्त मला सुरुवातीला लागलेले दोन खडे व झाडावरील दोन माणसांच्या ढुंगणाला लागलेले दोन छोटे दगड एवढाच.) तसेच दगड पडणे नेहमी रात्री एकलाच बंद होई. एकनंतर एकही दगड कधी पडला नाही. हे वेळेचे टाइमटेबल काटेकोर पाळले जाई. यात कधी कसूर झाली नाही. घरी दगड पडतात म्हणून घरी झोपायला बोलावलेल्या लोकांच्या धोतरात, विजारीत किडे, विंचू यासारखे काहीतरी वळवळत असे. पण हे रात्री कुणी काही सांगितले नाही. दुसरे दिवशी एकाने हे सहज सांगताच दुसरा, तिसरा, असे प्रत्येकजण म्हणू लागला की 'होय, होय, मलाही तसे होत होते!' म्हणजे वळवळण्याचा हा खोडसाळपणाचा प्रसाद रात्री सर्वांनाच मिळाला होता !

"अशा रीतीने दगडाचे प्रकार सतत एक महिना चालू होते. ते प्रकार एका मांत्रिकामुळेच शेवटी बंद झाले. या मांत्रिकाचा अनुभवही सांगण्यासारखा आहे. आम्ही त्या मांत्रिकाकडे प्रथम गेलो, तेव्हा त्याने काही वस्तू मंत्रून माझ्याबरोबर असलेल्या दोन माणसांजवळ दिल्या. मालकाजवळ त्या द्यायच्या नसतात असे तो म्हणाला. त्या वस्तू घेऊन येत असताना त्या दोघांना रस्त्यात सापच साप दिसू लागले. त्यामुळे त्यांनी घाबरून त्या वस्तू टाकून दिल्या. त्या वस्तू टाकताच साप

दिसणे बंद झाले. अशा रीतीने अडथळा का आला म्हणून मी चौकशी केली, तेव्हा ट्रॅक्टरसारख्या वाहनातून वस्तू आणल्या तर तसे काही होणार नाही असे सांगण्यात आले. म्हणून मी ट्रॅक्टर घेऊन त्यात माणसे बसवून वस्तू मंत्रून आणल्या. पण त्याचाही उपयोग झाला नाही. मांत्रिक म्हणाला, 'करणी जबरदस्त आहे. येथून काही चालत नाही, मलाच आले पाहिजे. पण परवानगी मिळत नाही.'

"पुढे एकदा आम्ही न बोलावताच तो मांत्रिक आमच्याकडे आला व तेथून मंतरलेल्या वस्तू घेऊन आमच्या शेताकडे पळत गेला. यापूर्वी त्याने आमचे शेत पाहिले नव्हते, त्यामुळे तो नेमका आमच्याच शेतात गेल्याचे आश्चर्य वाटले. आमच्या शेताच्या हद्दीत त्याने काहीतरी कार्यक्रम केला. यानंतर दगड पडणे बंद झाले.

"यानंतर तीन आठवड्यांनी विहिरीतील मोटर चालू असतानाच विहिरीत जाऊन पडली. ती विहिरीपासून ४-५ फूट अंतरावर होती. ती ढकलत नेली असती तर जमिनीवर ओरखडे उठलेले आढळले असते. पण कसलीही खूण नव्हती. यावरून ती सरळ उचलून टाकली असल्याचा निष्कर्ष आम्ही काढला. चालू मोटार सरळ उचलून टाकणे कसे शक्य आहे, हा प्रश्न अर्थात आहेच.

"यानंतर मी एक मोटर सायकल व ट्रॅक्टर खरेदी केले. पण ती दोन्ही वाहने वरचेवर नादुरुस्त होणे, रस्त्यात मध्येच पंक्चर होणे, दुरुस्तीला अतोनात खर्च येणे, मध्येच पंक्चर झाल्यामुळे बरेच अंतर ढकलत नेऊन दमछाक होणे असले प्रकार सतत घडू लागले. तसेच आमच्यात गडी राहू नयेत, घाबरून जावेत असेही घडू लागले. पहिला गडी निघून गेल्यावर दुसऱ्या गड्यालाही तोच अनुभव. एकंदरीत माझे नुकसान व्हावे असा या घटना घडण्याच्या पाठीमागचा उद्देश दिसला. हे माझ्या शत्रूचे काम असल्याचे एकदा स्पष्ट झाले. कारण एके दिवशी पहाटे आमच्या उंबरठ्यावर एक कागद ठेवलेला आढळला."

असे म्हणून अण्णासाहेबांनी जपून ठेवलेला एक कागद मला दाखवला. त्यात "तुझे अजूनही नुकसान करतो. तुझ्या मांत्रिकाचे काय चालते बघतो" अशा आशयाचा आठ-दहा ओळींचा मजकूर लहान मुलाने लिहावे तशाच हस्ताक्षरात लिहिलेला आढळला.

परंतु हा कागद आढळल्यानंतर मात्र काहीच प्रकार घडलेला नाही, असे अण्णासाहेबांनी सांगितले. या कागदावर एक काटा खोवलेला लिंबूही होता असे ते म्हणाले. त्या मांत्रिकापुढे शत्रूचे काही चालले नसावे असे त्यांना वाटते. (कदाचित् काही न चालल्यामुळे चिडूनही तो कागद ठेवला असावा.)

हा शत्रू कोण आहे हे आपल्याला माहीत आहे, असेही ते म्हणाले.

■■

## प्रकरण सहावे

# एका संपूर्ण गावाला पिडणारी भानामती

*मनाकरवी मानवी । शोकमोहो ।।*

\- ज्ञानेश्वर

---

'विज्ञान व अंधश्रद्धानिर्मूलन' या पुस्तकातील 'कर्नाटक सरकारचा भानामतीचा बुद्धिवादी शोध' या प्रकरणात गुलबर्गा जिल्ह्यातील अनेक खेड्यात चालणाऱ्या भानामती प्रकरणांच्या, बेंगळूर युनिव्हर्सिटीचे भूतपूर्व व्हाइस चान्सेलर व बुद्धिवादी एच्. नरसिंहय्या यांच्या नेतृत्वाखाली नेमलेल्या समितीने केलेल्या शोधाचे व तिने दिलेल्या उपपत्तीचे इतिवृत्त दिले असून ते वैज्ञानिक दृष्ट्या लोकांच्या डोळयात कसे धूळ फेकणारे आहे हे तेथे साधार दाखवून दिले आहे. त्या प्रकरणातील माझ्या प्रतिपादनाला दुजोरा देणारे भानामतीचे आणखी एक प्रकरण अलीकडे पुन्हा गुलबर्गा जिल्ह्यातच जीवणगी नावाच्या आणखी एका खेड्यात घडले असून वृत्तपत्रातून ते बरेच गाजले आहे.

येथे त्यावर कसलेही भाष्य न करता हुबळी व बेंगळूर येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'संयुक्त कर्नाटक' व 'प्रजावाणी' या कानडी दैनिकात या भानामतीचे जे वृत्त प्रसिद्ध झाले आहे ते मराठीत भाषांतर करून (योग्य त्या संक्षेपाने) जसेच्या तसे खाली देत आहे.

प्रथम 'संयुक्त कर्नाटक' दैनिकाच्या १३ जुलै १९९६ च्या अंकातील बातमी देतो.

## *भानामतीची पीडा : जीवणगी भयग्रस्त*

*गुलबर्गा, १२ : नाव शिवकुमार, वय १८, धडधाकट, उद्योग : खेड्यातील हॉटेलात काम. असेल तसा पळत सुटतो. विजेच्या खांबावर माकडापेक्षाही जास्त वेगाने चढतो. अगदी टोकाला पोचल्यावर एकदम हात सोडून देतो आणि धाडकन् जमिनीवर पडतो. जखम नाही. रक्त नाही. झाडावर चढतो. तेथेच झोपतो. विचित्र आवाज काढतो. तसेच आणखी बरेच. खायला अन्न दिले तर जमिनीवर टाकतो व ते जनावरांप्रमाणे खातो. पाणीही जनावराप्रमाणेच पितो.*

*त्याची ताकदही राक्षसी आहे. १०-१५ जणांनी धरले तरी सोडवून घेऊन पळतो. हातपाय दोरीने बांधले तर ती एखादा दोरा तोडावा तशी तोडून फेकून देतो. ही त्याची ताकद पाहून सबंध गावच आश्चर्यचकित झाले आहे.*

*श्रीदेवी पडशेट्टी (वय २५) दोन मुलांची आई. उगीचच एकदम किंचाळते. मला शिंदी द्या. कोंबडी आणा. दारू आणा असे ओरडते. आयुष्यात तिने शिंदी, दारू कसली असते हे पाहिलेले नाही. कोंबडीचे मांस माहीत नाही. अत्यंत सनातनी असलेल्या तिच्या कुटुंबियांची अवस्था अवघड झाली आहे.*

*गुलबर्गा तालुक्यातील 'जीवणगी' गावात अलीकडे घडणाऱ्या प्रकारांपैकी हा एक नमुना.*

*ही एक जर्सी गाय. रोज आठ लिटर दूध देते. एकदा दुधाऐवजी आचळातून एकदम रक्त येण्यास सुरुवात झाली. तिने चारापाणी सोडले. १० हजार किंमतीची ही गाय आठवड्यातच मरून पडली.*

*बंडय्या स्वामी हे गावचे पोस्टमास्तर. त्यांच्या दुकानात रात्री कुणीतरी नारळ आणि फुले ठेवून गेले. दुकानाचा व्यापार मोडून पडला. आठ वर्षांच्या त्यांच्या संगीता नावाच्या मुलीला घरात एक बाहुली दिसली. आणि ती तिला बोलवू लागली, जवळ गेली असता दोन्ही पाय विस्तवाने भाजून निघाले.*

*शामाबाई (वय १८) अविवाहित. अंगावरचे कपडे फाडून टाकते व विचित्र रीतीने बोलते. संगम्मा (वय २०) या विवाहित तरुणीचीही अशीच अवस्था. हा प्रकार पाहून नवऱ्याने तिला तिच्या माहेरी पाठवून दिले.*

*जीवणगी गावातील ४०० कुटुंबांपैकी १५० पेक्षा जास्त कुटुंबांत असला काही ना काही प्रकार सुरू आहे. गेल्या पाच वर्षांत एखाद्याला असा अधुनमधून अनुभव आला असता दवाखान्यात नेऊन त्याच्यावर उपचार करण्यात हजारो रुपये खर्च केले असतानाही काहीही उपयोग झालेला नाही. अलीकडे तर हे प्रकार फारच वाढले असून काही लोकांनी गावही सोडले आहे. गावाच्या हद्दीबाहेर मात्र काही होत नाही. गावातील शेतात जेवण नेले तर त्यात साप ! बसलेल्या कट्ट्याखाली*

*शेकडो विंचू. 'संयुक्त कर्नाटक' च्या प्रतिनिधीने गुरुवारी गावाला भेट दिली असता प्रत्येक घरातून असले एकेक विचित्र अनुभव सांगण्यात आले.*

*गुलबर्गा तालुक्याचे तहसीलदार याच गावचे. त्यांच्या कुटुंबालाही असाच त्रास झाला आहे. त्यांनी एके दिवशी पोलिसांच्या मदतीने मंत्र-तंत्र करणाऱ्यांना शोधून कैद केले. पण नंतर ते जामिनावर सुटले.*

*महागाव ठाण्याच्या पोलिसांनी शमसुद्दीन, मेहमूबसाब, नबीसाब, सलीमसाब, शरणाप्पा, कल्याणी अशा सहाजणांना पकडले. परंतु या लोकांच्या टोळीतील इतर बारा जण फरारी झाले आहेत. पकडलेल्यांवर गावच्या लोकांच्या जिवाला धोका निर्माण केल्याच्या आरोपावरून खटला भरून त्यांना न्यायालयात हजर केल्यानंतर प्रत्येकाकडून १० हजार रुपये जामीन घेऊन सोडण्यात आले. ते सुटल्यानंतर पुन्हा गावाला जास्त धोका निर्माण झाला आहे, असे ग्रामस्थांचे म्हणणे आहे.*

***हे प्रकार पाहून पुरोगामी व विज्ञानवादी म्हणवून घेणाऱ्यांनाही भानामती खोटी म्हणणे अशक्य झाले आहे. अनेकांनी मनोवैज्ञानिकांकडूनही उपचार करून घेतले आहेत. काही धारवाडच्या वेड्यांच्या इस्पितळात कित्येक महिने राहून हजारो रुपये खर्च करूनही काही उपयोग न होता परत आले आहेत.*** *ज्यांनी गावच कायमचे सोडले आहे असे काही मोजके लोक वगळता बाकीच्यांचा त्रास किंचितही कमी झालेला नाही.*

*पकडलेल्यांना सोडले असले तरी त्यांना शिक्षा करण्याची कायद्यात तरतूद नाही. कदाचित फरारी बारा लोकांना पकडले असते तर त्रास कमी झाला असता. आणि जे सुटून बाहेर आले आहेत ते सूडबुद्धीने अधिक त्रास निर्माण करण्याचा धोका आहे असे गावचे लोक बोलतात. जामिनावर सुटलेल्यांना दररोज पोलिस ठाण्यावर हजेरी देण्याचे बंधन घातले असले तरी आजपर्यंत एकानेही हजेरी दिलेली नाही. तहसीलदार कचेरीलाही कोणी आलेले नाही. गावातही ते हजर नाहीत. सर्वजण बेपत्ता आहेत.*

***आधुनिक विज्ञानयुगात वैज्ञानिकांपुढे हे एक मोठे आव्हान आहे, संपूर्ण गावच्या गाव भानामतीला बळी पडून यातना भोगत असतानाही कोणाचेही तिकडे लक्ष जाऊ नये याचे आश्चर्य वाटते.*** *जिल्हाधिकाऱ्यांना याविषयी छेडले असता जुजबी आश्वासनापलीकडे काही हाती आले नाही.*

'प्रजावाणी' या कानडी दैनिकाच्या १३ जुलै १९९६ च्या अंकातील वर 'संयुक्त कर्नाटक' मध्ये दिलेल्या बातमीतील भाग सोडून (पुनरुक्ती टाळण्यासाठी) फक्त जी जास्तीची माहिती आली आहे, तेवढीच खाली वेगळी देत आहे.

'प्रजावाणी' दैनिकाच्या १३ जुलै, १९९६ या अंकात आलेली ही बातमी पाहा.

*गुलबर्गा, १२ : भानामतीच्या भयानक त्रासाला बळी पडलेल्या जीवणगी गावाला पत्रकारांच्या एका तुकडीने आज सकाळी भेट दिली असता पोलिस अधिकारी गावच्या पंचायतीच्या ऑफिसमध्ये भानामतीच्या त्रासाला बळी पडलेल्या लोकांकडून निवेदने लिहून घेत होते. गावचे सगळे लोक पंचायतीच्या इमारतीभोवती जमले होते. **पोलिसांना निवेदन देत असतानाच शिवशरणाप्पा नावाच्या माणसाला पंचायत ऑफिसमध्येच भानामतीने धरले.** एकदम जमिनीवर पडून तो हातपाय झाडू लागला व लोळू लागला. 'अय्यो' असे ओरडू लागला. त्याच्या डोळ्यातून पाणी गळू लागले. थोडा वेळ याच अवस्थेत गेल्यानंतर व पूर्वस्थितीवर येऊन तो सावरून बसल्यानंतर त्याला याविषयी विचारले असता तो म्हणाला, ''दिवसातून एक-दोन वेळा असे होते हो. हातापायातील शक्ती जाते व कोणीतरी मारत असल्याचा भास होतो.''*

*अशाच प्रकारचा विचित्र त्रास होणाऱ्या पन्नासपेक्षाही अधिक लोकांची पोलिसांनी निवेदने घेतली असून पाच लोकांना पकडलेही आहे. अजून पंधरा तरी लोक बेपत्ता आहेत. त्यांचा शोध आम्ही घेत आहोत, असे डी. एस. पी. आण्णाराव पुणेकर यांनी सांगितले.*

*शिवकुमार नावाच्या विजेच्या खांबावर सरसर चढणाऱ्या, अन्न म्हणून माती खाणाऱ्या, मोरीचे पाणी जनावराप्रमाणे पिणाऱ्या तरुणाला पोलिसांनी पत्रकारांसमोर बोलावले तेव्हा तो म्हणाला, ''त्यावेळी मला शुद्ध नसते. मी काय करतो हे मला माहीत नसते. अंगातून भानामती निघून गेल्यावरच मी शुद्धीवर येतो.'' आपल्याकडून पैसे घेतलेला शमसू (दीन) हाच माझ्यावर प्रयोग करतो, असेही तो म्हणाला.*

*'आमच्या शेतात काही मुसलमान गोरी बांधण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांना मी व आई मिळून विरोध केल्यामुळे सूडबुद्धीने ते आमच्यावर भानामतीचे प्रयोग करीत आहेत,' असे अरुणकुमार या तरुणाने सांगितले. त्याला भानामती येताच पोटात टोचायला लागते, डोके गरगरते असे तो म्हणाला. त्याने हा त्रास चुकविण्यासाठी तापलेल्या लोखंडाने कपाळावर डागून घेतल्याची खूणही आम्ही पाहिली. बंडाप्पा नावाच्या एका शेतकऱ्याने सांगितले, की त्याच्या घरात कुणीतरी मानवी कवटी आणून ठेवलेली आढळली. त्यामुळे आपले बैल मेले असे तो म्हणाला.*

*फरारी भानामती आरोपींपैकी दोन महिलाही असल्याचे महागाव पोलिस-ठाण्याचे इन्स्पेक्टर नौबादी व डी. एस. पी. पुणेकर यांनी सांगितले. गेली दहा वर्षे भानामतीचा त्रास या गावाला होत आहे. मात्र गेल्या वीस दिवसात तो फारच वाढलेला आहे.*

*गावाबाहेरील स्मशानातील वडाच्या झाडाला लोखंडी खिळे मारलेले असून तेथेच वामाचार करण्यात येतो, हे आता सर्व गावाला माहीत झाले आहे. पत्रकारांच्या*

*तुकडीने पोलिसांसमवेत त्या जागेला भेट दिली असता हे खिळे त्या झाडात आढळले. यापूर्वी २०-२५ खिळे तेथून काढून पोलिसांनी ताब्यात घेतले होते. आता ते वडाचे झाडच तोडण्याचे ठरले असून त्या कामाचे एकाला कंत्राटही देण्यात आले आहे. तेथेच कल्याणी, रामय्या इत्यादींनी वामाचारासाठी बांधलेले देऊळ जमीनदोस्त करण्यात आले आहे.*

*आता तेथे भानामतीविरोधी संघ स्थापण्यात आला असून त्याचे १२ सदस्य आहेत. भानामती करणाऱ्यांना थांबवता येईल. पण डोळ्यांना न दिसणाऱ्या भानामतीला कसे थांबवायचे हा प्रश्न आता त्यांच्यापुढे आहे.*

'संयुक्त कर्नाटक' दैनिकाच्या जुलै १६, १९९६ च्या अंकात 'भानामतीच्या अभ्यासासाठी समिती' या मथळ्याच्या बातमीत कर्नाटक विधान परिषदेमध्ये या जीवणगी गावाच्या भानामतीवर झालेल्या चर्चेची माहिती आली आहे. विधान परिषदेच्या शून्य तासाला झालेल्या या चर्चेत सदस्यांनी या भानामतीची तपासणी करण्यासाठी एक समिती नेमावी व भानामती करणाऱ्यांविरुद्ध कायदा करावा, असा आग्रह धरला. कायदामंत्री नाणय्या यांनी सदस्यांची ही मागणी मान्य केली व भानामती खरी आहे, ती नाकारण्यात अर्थ नाही; केरळमध्ये या विद्येत पारंगत असलेल्यांना 'कुट्टीचाटन' म्हणतात इत्यादी माहितीही त्यांनी पुरविली. कायदामंत्र्यांच्या भानामती खरी असल्याच्या प्रतिपादनाशी विधान परिषद सदन सहमत आहे असे समजावयास हरकत नाही. **कारण भानामती खोटी असती तर ती करणाऱ्या लोकांविरुद्ध कायदा करण्याचा त्यांनी आग्रह धरला नसता.** गुलबर्गा विद्यापीठाच्या काही मानसशास्त्राच्या प्राध्यापकांनी, लोकांनी भानामतीवर विश्वास ठेवू नये असे जे निवेदन प्रसिद्ध केले आहे, ('संयुक्त कर्नाटक' : २४-७-१९९६) त्याला या सदनाने काटशह दिला आहे असे म्हणावयास हरकत नाही. **कारण भानामती खोटी असेल तर ती करणाऱ्याविरुद्ध कायदा करणे म्हणजे अस्तित्वात नसलेल्या गुन्ह्याविरुद्ध कायद्यात तरतूद केल्यासारखे होते. अशा कायद्याचा आग्रह नरसिंहय्या समितीनेही धरला होता; आणि या समितीने भानामती खोटी आहे असे आपल्या इतिवृत्तात म्हटले होते !** या समितीचे लोक एकतर स्वत:ची फसवणूक करत होते किंवा आपण काय म्हणतो हे त्यांना कळत नाही असे तरी म्हणावे लागते. (अधिक माहितीसाठी 'विज्ञान व अंधश्रद्धानिर्मूलन' या पुस्तकातील प्रकरण ८ पाहावे.)

■■

प्रकरण सातवे

# वि. स. पागे यांना चोखोबांचा साक्षात्कार

*मीचि तो तेणे मिसे । भेटे तयाते ।।*

\- ज्ञानेश्वर

---

**दै.** 'सकाळ' (कोल्हापूर) च्या ३० नोव्हेंबर १९८३ च्या अंकात खालील वृत्त प्रसिद्ध झाले. ते जसेच्या तसे येथे देत आहे.

***'मला चोखोबांचा साक्षात्कार' : वि. स. पागे***

*(ना.वा. ढवळे यांजकडून)*

*कऱ्हाड, ता. २९ : तशी ही घटना जुनी आहे. हरिजनांना मंदिरप्रवेश मिळावा, यासाठी साने गुरुजी यांनी पंढरपूर येथे आमरण उपोषण सुरू केले, त्यावेळी ती घडली होती. संत फुटाणे यांचा अमृतमहोत्सव शनिवारी रात्री कऱ्हाडमध्ये साजरा झाला, त्यावेळी प्रथम श्री. वि. स. पागे यांनी ती जाहीररीत्या प्रकट केली. त्यामुळे महाराष्ट्रातील बुद्धिवादी व विज्ञाननिष्ठ विरुद्ध अध्यात्मवादी यांच्यातील वादविवादाला एक नवे व्यासपीठ उपलब्ध होणार आहे. किंबहुना तसा जाहीर वादविवाद घडावा, असे आव्हान खासदार यशवंतराव चव्हाण व श्री. वि. स. पागे यांनी यावेळी दिले.*

*सुमारे ३५ वर्षांपूर्वी जी घटना घडली, ती वि. स. पागे यांच्या शब्दांत अशी-*

*'पूज्य साने गुरुजी यांनी हरिजनांना मंदिरप्रवेश मिळावा या हेतूने पंढरपूरला आमरण उपोषण सुरू केले होते. साने गुरुजींना पाठिंबा मिळावा म्हणून प्रचारासाठी*

मी फिरत होतो. महिपतींच्या ग्रंथाच्या आधारे मी 'संत चोखोबांचा मंदिरप्रवेश' या नावाचे छोटे पुस्तक लिहिले होते. आणि मी ते लोकांना वाटत असे. या पुस्तकात अशी कथा आहे की, चोखोबांना बडव्यांनी बहिष्कृत केले व चोखोबा चंद्रभागेच्या पलीकडे झोपडी बांधून राहू लागले. त्यांनी तेथे एक दीपमाळ बांधली. त्या दीपमाळेला एक छोटासा कोनाडा असून त्यामध्ये श्री पांडुरंगाची मूर्ती आहे. एकदा समस्त बडवे मंडळींनी चोखोबांच्या या झोपडीला भेट दिली. चोखोबा तेव्हा जेवावयास बसले होते. पत्नी दही वाढत असताना ते म्हणाले, 'बेताने दही वाढ, नाहीतर पांडुरंगाच्या पितांबरावर ते पडेल.' बडव्यांना पांडुरंग दिसला नाही. त्यांना चोखोबाचे हे उद्‌गार ढोंगीपणाचे वाटले व त्यांनी त्याला चोप दिला. दुसऱ्या दिवशी बडवे देवळात गेल्यावर त्यांना असे दिसले की, देवळातील देवाच्या अंगावर वळ उठलेले आहेत. त्यामुळे बडव्यांना पश्चात्ताप झाला. 'ते पासूनी चोखा मेळा । सदा राऊळी जावो लागला ॥'

नामदेव मंदिराजवळच्या घाटावर मी हे पुस्तक संत फुटाणे यांना वाचून दाखवीत होतो. वर्णाने तांबूस गव्हाळी, वय अदमासे २५ ते ४०, अंगावर गांधीजींसारखा पंचा गुंडाळलेला असा एक मनुष्य केव्हा आमच्याजवळ येऊन बसला ते कळलेच नाही.

पुस्तकात जेव्हा दीपमाळेचा उल्लेख आला तेव्हा संत फुटाणे मला म्हणाले, "का हो, खरोखरच अशी दीपमाळ अस्तित्वात आहे का?" त्यावर मी म्हणालो, "मला नक्की माहीत नाही." त्यावर तो शेजारचा मनुष्य म्हणाला, "हो, हो, आहे ना!" मी म्हणालो, "तर मग आम्हाला ती दाखव."

नावेतून आम्ही पलीकडे गेलो. 'वल्लभस्वामींची गादी' या नावाची एक मोठी इमारत तेथे आहे. तिच्या बाजूने नदीकाठ चढून आम्ही पुढे गेलो, तो तेथे एक दीपमाळ दिसली आणि श्री पांडुरंगाचे दर्शन झाले. आम्ही नमस्कार केला. दीपमाळ दाखवणाऱ्याला आम्ही नाव विचारले, त्याने 'चोख्या' असे नाव सांगितले. 'मी मराठवाड्यातील आहे,' असे तो म्हणाला. आम्ही परतलो. त्याने माझ्या हातातील पुस्तक मागून घेतले. अकस्मात चमत्कार घडला. बघता बघता चोख्या गुप्त झाला. अगदी आमच्यापासून पावला-दोन पावलांवर. माझ्या आणि संतांच्या डोक्यातील काळा पडदा दूर झाला. संत चोखोबांचे ते रूप असावे. तो त्यांचा साक्षात्कार असावा!'

खासदार यशवंतराव चव्हाण म्हणाले, "कोठलाही बुद्धिवादी ही गोष्ट ऐकून स्तिमित झाल्याशिवाय राहणार नाही. दुसरे कोणी असे म्हटले असते तर मी त्याला वेड्यात काढले असते. पण पागे यांना मी चांगला ओळखतो. ते जसे अध्यात्मवादी आहेत, तसेच बुद्धिवादी व विज्ञाननिष्ठ आहेत. बुद्धिवाद्यांना हे आव्हान आहे. मी एवढेच म्हणेन, मंदिरप्रवेशाच्या वेळी हे घडले. ज्ञानेश्वर,

*चोखोबा हे सारे संत या नव्या सुधारणेच्या मागे आहेत. याची मला त्यामुळे खात्री पटलेली आहे.''*

*पागे म्हणाले, ''मी आणि संत आयुष्याच्या अखेरच्या पर्वात आहोत. समाजापुढे केव्हा तरी हा विषय आणावा असे वाटत होते. संतांच्या अनुमतीशिवाय तो मी आणला आहे आणि यशवंतरावांनी त्याला तोंड फोडले आहे. यावर बुद्धिमंताची प्रतिक्रिया हवी आहे. यशवंतरावांनी सूतोवाच केले आहे. मी आज एवढेच सांगू इच्छितो की, ज्या पांडुरंगाची आम्ही आजन्म भक्ती केली, त्याच्या साक्षीने आम्ही खोटे बोलत असू तर नरकात जाऊ. बुद्धीने बुद्धीचे प्रमेय सिद्ध होते. सत्य वस्तू अनुभवल्याशिवाय सिद्धच होत नाही. बुद्धीने सिद्ध होणारे हे तर्काचे प्रमेय आहे. तर्काने फक्त विचार सत्य होतो; अनुभव नव्हे. चेतनाने हे जग निर्माण केले आहे, की जडातून चेतन निर्माण झाले आहे, हा जगातल्या तत्त्वज्ञानाचा शेवटचा प्रश्न आहे. आम्ही चैतन्यवादी आहोत. ही सृष्टी बेवारस नाही. तिचा कर्ता करविता 'कलानाथ' अस्तित्वात आहे. ती संकल्पशक्ती सृष्टीचे जसे नियमन करू शकते, तसे नियमनाचे उल्लंघन करून चमत्कारही करू शकते. या सृष्टीला शुद्धीत ठेवण्यासाठी संतांचे अवतार, आचार, चमत्कार आहेत. दुसऱ्या कोणाला काही वेगळे मांडावयाचे असेल तर आम्ही ऐकायला, वादविवादाला तयार आहोत. त्यामुळे समाजाच्या विचाराला चालना तरी मिळेल.''*

*दीपमाळेच्या दर्शनानंतर परतत असता संत चोखोबा आणि पागे यांच्यामध्ये जी चर्चा झाली ती मात्र त्यांनी प्रकट केली नाही, कदाचित वादविवाद झाला तर त्यासाठी त्यांनी ती हातची राखून ठेवली असण्याचीही शक्यता आहे.*

या बातमीवरील प्रस्तुत लेखकाची प्रतिक्रिया म्हणजे 'सकाळ'च्या २६ डिसेंबर १९८३ च्या अंकात प्रसिद्ध झालेला खालील लेख. तो लेख येथे जसाच्या तसा देत आहे. लेखाचा मथळा आहे : विज्ञानाच्या दृष्टिकोणातून 'चोखोबांचा साक्षात्कार.'

## विज्ञानाच्या दृष्टिकोणातून 'चोखोबांचा साक्षात्कार'

आपणाला चोखोबांचा साक्षात्कार झाल्याची घटना केव्हातरी समाजाला सांगून त्याला याविषयी विचारप्रवृत्त केले पाहिजे, असे बऱ्याच दिवसांपासून वाटत असलेल्या श्री. वि. स. पागे यांनी शेवटी ज्यांच्यासमवेत त्यांना हा साक्षात्कार झाला त्या संत फुटाणे यांच्या अमृतमहोत्सवाचा सार्वजनिक प्रसंग पकडून आपल्या मनातील व जीवनातील बरेच दिवस जपून ठेवलेला विचार व प्रसंग उघड करून समाजातील एका महत्त्वाच्या प्रश्नाला वाचा फोडली आहे. याविषयी कोणाला काही वेगळे मांडायचे असेल तर ते ऐकण्याची व वादविवाद करण्याची त्यांनी आपली तयारी

दर्शविली असल्याने याविषयी अधिक चर्चा व्हावी (निदान तशी ती होईल), अशी त्यांची इच्छा व अपेक्षा असावी, असे दिसते. बातमीदार श्री. ना. वा. ढवळे यांनी परतीच्या वाटेवर चोखोबांशी झालेले संभाषण हे प्रसंगोपात प्रकट करता येईल म्हणून पागे यांनी मुद्दाम हातचे राखून ठेवले असावे, असा तर्क व्यक्त केला आहे. एकीकडे अंधश्रद्धाविरोधी विज्ञानयात्रा काढून समाज प्रबोधन करण्याचा प्रयत्न होत असतानाच दुसरीकडे हा साक्षात्काराचा प्रसंग उपस्थित करून समाजाला चमत्काराकडे व गूढवादाकडे उलटे खेचण्याचा हा अध्यात्मवाद्यांचा प्रयत्न विज्ञानविरोधी वाटण्याचा संभव असल्यामुळे या विषयावर सुस्पष्ट व खुली चर्चा होणे आवश्यक आहे, हे निराळे सांगायला नको.

याविषयी वैज्ञानिक दृष्टिकोणातून विचार करणाऱ्यांचे तीन गट पडतात. पहिल्या गटाला 'पक्षपाती गट', दुसऱ्या गटाला 'मताग्रही गट' व तिसऱ्या गटाला 'सत्याग्रही गट' अशी नावे देता येतील.

पहिल्या 'पक्षपाती' गटानुसार भौत वस्तू हा विज्ञानाचा विषय असून, या क्षेत्राबाहेरील संशोधन हा विज्ञानाचा विषय होऊ शकत नाही. या लोकांच्या दृष्टीने विज्ञान व अध्यात्म ही अगदी भिन्न क्षेत्रे असून एकाचा दुसऱ्याशी कसलाही संबंध नाही. हे लोक विज्ञानाचे पक्षपाती असले तरी विज्ञान हे अंतिम सत्याचा मक्तेदार आहे, असे ते मानत नाहीत. त्यामुळे एकीकडे विज्ञाननिष्ठ असलेले हे लोक दुसरीकडे परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवत असल्याचेही आढळून येतात. अशा लोकांपैकी प्रसिद्ध म्हणून न्यूटन व आईन्स्टाईन यांचा उल्लेख करता येईल.

दुसऱ्या 'मताग्रही' या गटानुसार विज्ञानाचा विषय भौत वस्तू हाच असला तरी त्याच्यापलीकडे संशोधनाचे व सत्यशोधनाचे क्षेत्रच असू शकत नाही, असे ते मानत असल्यामुळे त्यांच्या दृष्टीने विज्ञान हाच सत्याचा मक्तेदार ठरतो. म्हणून हे लोक अतींद्रिय शक्तीविषयीचे संशोधन व्यर्थ समजतात व त्यासंबंधीचे पुरावे हे खोटे मानतात. अतींद्रिय शक्तीसंबंधीच्या प्रसिद्ध शास्त्रज्ञ जे. बी. ऱ्हाईन यांच्या प्रयोगात्मक पुराव्यांना 'फसवेगिरी'च्या सदरात ढकलायला या लोकांनी कमी केलेले नाही. या गटात प्रसिद्ध असा एकही शास्त्रज्ञ नसला तरी हॅन्सेलसारखे अप्रसिद्ध शास्त्रज्ञ मात्र बरेच आहेत.

तिसऱ्या 'सत्याग्रही' गटानुसार विज्ञानाचे नियम वेगळे व अध्यात्माचे नियम वेगळे असा पक्षपात निसर्गाला मान्य नाही. निसर्ग हा निष्पक्ष असून त्याला विश्वात कप्पे मंजूर नाहीत, असे हे लोक मानतात. परमेश्वराने निर्माण केलेले नियम सर्व विश्वाला सारखेच लागू झाले पाहिजेत व ते नियम परमेश्वर हस्तक्षेप करून मोडणे संभवनीय नाही. (म्हणजेच निसर्गनियम लहरी नाहीत). या मतानुसार 'चमत्कार' हे 'वास्तविक चमत्कार' नसून विशिष्ट नियमानुसार घडून येणाऱ्या त्या 'निसर्गघटना'च

आहेत. फक्त त्यांचे नियम आज आपणास माहीत नसल्यामुळे ते चमत्कार वाटतात. भविष्यात त्यांचे नियम ज्ञात झाल्यानंतर त्यातील चमत्कार नाहीसा होईल. म्हणून अशा घटनांचा सत्यशोधनांच्या दृष्टीने वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास व संशोधन होणे अगत्याचे आहे, असा या लोकांचा आग्रह आहे. या दृष्टिकोणाचा पुरस्कार करणारे बरेच शास्त्रज्ञ असून त्यांच्या प्रयत्नातून 'परामानसशास्त्र' (पॅरासायकॉलॉजी) या नावाने ओळखल्या जाणाऱ्या विज्ञानाचे एक नवीनच दालन खुले झाले आहे.

'पक्षपाती' गटाच्या म्हणण्यानुसार भौतिक व अभौतिक अशा दोन अगदी भिन्न क्षेत्रांत विश्व विभागले गेले असेल व फक्त भौतिक विश्वाचेच वैज्ञानिक ज्ञान शक्य असेल तर अशा प्रकारचा भेद मुळात का व कसा निर्माण झाला, याचे उत्तर देणे क्रमप्राप्त ठरते. पण हे उत्तर अजून कोणी दिलेले नाही. हे मत खरे असेल तर भौतिक व अभौतिक क्षेत्रांत (त्यांचे नियम वेगवेगळे असल्याने) परस्पर व्यवहार (इंटर-ॲक्शन) घडून येणार नाहीत, येणे शक्य नाही, हे शक्य आहे. पण प्रत्यक्षात ते घडून येत असल्याचे आढळून येतात. पण अशा युक्तिवादाची आता गरजच नाही. कारण नव्या भौतशास्त्रातील क्वाँटम फिजिक्समधील संशोधनाने अशा प्रकारचा भेद हा कृत्रिम असल्याचे आता सप्रयोग सिद्ध झाले आहे. या शोधामुळे विश्वाला भौतिक व अभौतिक असा भेद तर मान्य नाहीच, पण त्याला स्थलभेद व कालभेदही मान्य नाही, असा सिद्धांत आता पुढे आला आहे. डेव्हिड बोहम व बी. हायली यांच्या सिद्धांताला बेल या शास्त्रज्ञाने गणिताच्या भाषेत रूपांतरित केले असून क्लॉजर व फ्रीडमन या शास्त्रज्ञांनी त्याला प्रत्यक्ष भौतशास्त्रीय प्रयोगाने आधार दिला आहे. अशा प्रकारे विश्व हे कप्पेबंद नाही, हे मत आता विज्ञानमान्य समजावयास हरकत नाही.

आता 'मताग्रही' या गटाच्या म्हणण्याप्रमाणे भौतवस्तूविज्ञान हाच सत्याचा मक्तेदार असेल. म्हणजे भौतिक घटनांपलीकडील घटनांचे ज्ञान हे अशक्य वा असत्य मानावयाचे झाल्यास भौतशास्त्रज्ञांनीच उपस्थित केलेल्या एका प्रश्नाचे उत्तर या लोकांना प्रथम द्यावे लागेल. हा प्रश्न असा की काही भौतिक घटनांची उपपत्ती अभौतिक - अतींद्रिय घटनांचा आधार घेतल्याशिवाय लावताच येत नाही, हे कसे काय? हा प्रश्न भौतशास्त्रज्ञांनीच भौतिक प्रयोगांती उपस्थित केला असल्यामुळे त्याविषयी 'फसवेगिरी' (फ्रॉड) चा आरोप लादला जाऊ शकत नाही. उदा. डगलस डीन या भौतशास्त्रज्ञाने प्लेथिस्मोग्रॅफ (रक्ताचे प्रमाण मोजण्याचे यंत्र) या यंत्राच्या सहाय्याने व रसेल टार्ग व हॅरॉल्ड पुथॉप या शास्त्रज्ञांनी ईईजी (मेंदूतील विद्युततरंग मोजण्याचे यंत्र) या यंत्राच्या सहाय्याने दूरस्थ व्यक्तीच्या विचारांचा व भावनांचा परिणाम अनुक्रमे दुसऱ्या व्यक्तीच्या शरीरातील रक्तप्रमाणावर व मेंदूतील विद्युततरंगावर होत असल्याचे सप्रयोग दाखवून दिले आहे आणि हा परिणाम यंत्राने नोंद केल्यानंतरच

त्या व्यक्तीला (व शास्त्रज्ञांनाही) कळला. तोपर्यंत त्याची तिला जाणीव नव्हती. यावरून विचारसंक्रमण टेलिपथी किंवा परचित्तज्ञान हे दोन मनांमध्ये वा मनामार्फतच होते, असे नसून एकाचे मन व दुसऱ्याचे शरीर यामार्फतही ते होत असते, हे सिद्ध होते. अशा रीतीने अतींद्रिय शक्ती भौतिक पातळीवर कार्य करीत असल्याचे भौतशास्त्रज्ञांनीच सिद्ध केले असल्यामुळे हा पुरावा 'मताग्रही' लोकांना डावलता येणार नाही. अतींद्रिय शक्तींची भौतिक क्षेत्रातील ही 'लुडबूड' एवढ्यावरच थांबलेली नाही. पण यासंबंधीचा सर्व प्रयोगांचा परामर्ष येथे घेण्याची आवश्यकता नाही. येथे फक्त एकाच प्रसिद्ध प्रयोगाचा उल्लेख करतो. तो अशासाठी की त्यामुळे पागे यांनी चोखोबांच्या साक्षात्काराची जी घटना सांगितली आहे, तिच्यावर थोडा प्रकाश पाडता येणार आहे व तिसऱ्या 'सत्याग्रही' गटातील लोकांच्या मतालाही त्यामुळे सहजच पुष्टी मिळणार आहे.

हा प्रसिद्ध प्रयोग टेड सिरिओस नावाच्या व्यक्तीवर ज्यूल आयसेनबड या शास्त्रज्ञाने अनेक महिने करून त्यासंबंधीचा ''द वर्ल्ड ऑफ टेड सीरिओस'' नावाचा एक संशोधनात्मक ग्रंथ लिहिला आहे. टेड सिरिओस या व्यक्तीमध्ये केवळ विचारशक्तीने कॅमेऱ्याच्या सहाय्याने छायाचित्र उमटविण्याचे सामर्थ्य असल्याचे आढळून आले आहे. (केवळ विचाराने उमटविलेल्या छायाचित्रांचा एक मोठा संग्रह या ग्रंथात पाहावयास मिळतो.) हे सामर्थ्य इतरही प्रकारे कमीजास्त प्रमाणात प्रकट होत असल्याचे आढळून येत असून या प्रकाराला परामानसशास्त्रज्ञांनी 'छायाचित्रग्रहण' किंवा 'फोटोग्राफी'ऐवजी 'थॉटोग्रॅफी' किंवा 'विचारचित्रग्रहण' असे समर्पक नाव दिले आहे. आता विचार हे फोटोच्या रूपाने फिल्मवर उमटत असतील, तर ''चितिर्मूर्तिमती। साच अप्रतिहता शक्तिः।'' या योगसारोपनिषदातील (विचार म्हणजे वस्तू, थॉट इज थिंग) मंत्राला तर प्रायोगिक बळकटी मिळतेच, शिवाय भौतिक व अभौतिक क्षेत्रात नियमाच्या दृष्टीने भेद नाही, या 'सत्याग्रही' गटातील लोकांच्या मतालाही त्यामुळे पुष्टी मिळते. विचार हा मूर्तिमंत वस्तूच असेल तर ती मूर्तिमंत व्यक्तीही असू शकेल. या दृष्टीने साक्षात्काराची उपपत्ती लावता येणे शक्य आहे. भौतशास्त्र सांगते की, केवळ वस्तूचेच छायाचित्र उमटते, पण येथे तर विचाराचे छायाचित्र उमटते. म्हणजे विचार हा वस्तूचे रूप घेऊ शकतो, असे दिसून येते. मग तो व्यक्तीचे रूप का घेऊ शकणार नाही? कारण व्यक्ती ही एक वस्तूच (पण जिवंत) आहे. आता हे विचाराचे वस्तूत वा व्यक्तीत कोणत्या नियमांनी वा कोणत्या परिस्थितीत रूपांतर होऊ शकते, हा पुढील संशोधनाचा विषय असून परामानसशास्त्रज्ञांचे याविषयीचे संशोधन व प्रयोग चालू आहेत. पण या गोष्टी अशक्यच आहेत असे अगोदरच ठरवून ('मताग्रही' असे या गटातील लोकांना म्हणूनच नाव दिले आहे.) याविषयीचे संशोधनच अशक्य ठरविले तर निराळ्या अर्थाने भाबड्या लोकांना

चमत्काराच्या मागे लावण्याच्या विज्ञानविरोधी कृत्याचे वाटेकरी होण्याचे पातक स्वत:ला विज्ञाननिष्ठ म्हणवून घेणाऱ्या या लोकांना लागणारे आहे. यादृष्टीने विज्ञानयात्रा काढणाऱ्यांनी आत्मपरीक्षण करणे व त्यांच्या भूमिकेचा पुनर्विचार होणे हे समाजाच्या खऱ्या उद्‌बोधनाच्या दृष्टीने आवश्यक आहे, असे म्हणावे लागते.

**टीप :** आयसेनबडच्या प्रयोगांना फ्रॉड (फसवेगिरी) म्हणणाऱ्यांना टेड सिरिओसप्रमाणे कॅमेऱ्याच्या सहाय्याने फसवेगिरीने चित्र उमटविण्याचे आव्हान आयसेनबडने कायमचे देऊन ठेवले असून, ते आव्हान व जादूगारांना टेडप्रमाणे शेकडो वेळा नव्हे, निदान एकदा तरी हातचलाखीने असे चित्र उमटविण्यासाठी त्याने केलेले आव्हानही अजूनही कोणी स्वीकारलेले नाही.

याविषयाची अधिक माहिती 'विज्ञान आणि बुद्धिवाद' या पुस्तकातील 'खरे विज्ञान आणि खोटे विज्ञान' या प्रकरणात मिळेल.

यानंतर ना. वा. ढवळे यांनी पागे यांची पुन्हा भेट घेऊन 'सकाळ'मधून त्यांच्या कथित अनुभवासंबंधी प्रकट झालेल्या प्रतिक्रियेविषयी विचारले असता त्यांनी जे मत व्यक्त केले ते वरील लेखात प्रकट केलेले विचार मनात धरूनच व्यक्त केल्याचे व त्याला ते पोषकच असल्याचे ढवळ्यांनी त्यांच्या घेतलेल्या मुलाखतीचे २२ फेब्रु. १९८४ च्या 'सकाळ'मध्ये जे वृत्त प्रसिद्ध झाले त्यावरून स्पष्ट होते. संपूर्ण वृत्त खाली देत आहे.

## *शास्त्रीय सत्य बाहेर यावे म्हणून साक्षात्कार सांगितला : वि. स. पागेंचे प्रतिपादन*

*(ना. वा. ढवळे यांजकडून)*

*कऱ्हाड, ता. २१ : "संत फुटाणे यांच्या कऱ्हाड येथील अमृतमहोत्सव प्रसंगी मी मला व संत फुटाणे यांना झालेल्या एका साक्षात्कारसदृश अनुभवाचे कथन केले होते. अंधश्रद्धा किंवा बुवाबाजी वाढावी म्हणून मी हा अनुभव सांगितला नव्हता तर शास्त्रीय सत्य त्यातून बाहेर यावे, या ओढीने मी ते बोललो होतो. इंद्रिय प्रत्यक्ष प्रतीतीला विज्ञानाची तर्कप्रक्रिया किंवा प्रायोगिक पद्धती लावून माणसाने स्वत:च्या ज्ञानात भर टाकली. अतींद्रिय अनुभवाला हीच प्रक्रिया का लावू नये, लावणे कितपत शक्य आहे, याचे विचारमंथन घडावे एवढाच माझा हेतू होता." असे श्री वि. स. पागे यांनी येथे 'सकाळ' शी बोलताना सांगितले. त्यांनी कऱ्हाड येथे हा अनुभव दोन महिन्यांपूर्वी सांगितला होता. त्यावरील 'सकाळ' (पुणे) 'सकाळ' (कोल्हापूर), 'मुंबई सकाळ' व 'स्वराज्य' मध्ये अनेक प्रतिक्रिया व्यक्त करण्यात आल्या होत्या. त्या संदर्भात विचारले असता, त्यांनी वरील मत व्यक्त केले.*

हा वृत्तांत प्रसिद्ध झाल्यानंतर ही घटना खरी किंवा संभाव्य मानून आणि खोटी, मुद्दाम काही हेतूने सांगितली असे मानून टीका-उपटीका प्रसिद्ध झाल्या आहेत. एक खरे की, हा वृत्तांत आल्यानंतर अनेकांनी आपल्याला आलेले असे अनुभव जाहीर केलेले आहेत. तेव्हा एक पागे खोटे म्हणणाऱ्यांना या संबंधित अनुभव खोटे असे म्हणावयाचे असेल, सर्वांनाच खोटे ठरवायचे असेल, तर त्यांच्याशी वाद वाढविण्याचे काही कारण नाही. तो फुकट वेळ घालविणे ठरेल. ही घटना संभाव्य किंवा खरी मानणाऱ्यांचाच फक्त विचार करावा लागेल, असे सांगून त्यांनी साने गुरुजी यांच्या उपोषणाच्या वेळी घडलेल्या घटनांचा तपशीलवार आढावा घेतला.

काँग्रेस सरकार हरिजन मंदिरप्रवेशाचे बिल आणणार आहे, पण हे श्रेय समाजवादी गटाने घ्यावे म्हणून साने गुरुजींचे हे उपोषण आहे, अशी समजूत प्रथम महात्मा गांधीजींची करून देण्यात आली होती. त्यामुळे प्रथम गांधीजींना हे उपोषण पसंत नव्हते. लोकसभेचे माजी सभापती मावळंकर पुण्याला आले. त्यांना सर्व समजावून सांगितल्यावर त्यांनी महात्माजींची भेट घेतली व मग महात्माजींनी उपोषणास पाठिंबा दिला. माझ्या अंतर्मनात एकीकडे महात्माजींच्या मनात असे विचार का यावेत हा विचार, तर दुसरीकडे चोखामेळा असे विचार होते. तोपर्यंत वारकऱ्यांची अशी समजूत होती की, चोखामेळा देवळात कधीच गेला नाही. उलट 'बडवे मजला मारताती' असेच त्याविषयी मत होते. महिपतींच्या ग्रंथात मला हे प्रथम समजून आले व मी त्या आधारे पुस्तक छापून, चोखामेळा देवळातच नव्हे, तर राऊळात म्हणजे गाभाऱ्यात जात असे, ती नदीपलीकडील दीपमाळ त्याने बांधली आहे, असे वारकऱ्यांना प्रथम सांगितले. गांधी व चोखामेळा यांचे माझ्या मनात असलेले तीव्र विचार याचा परिणाम म्हणजे माझ्या अंतर्मनातून अशी निर्मिती होण्याची शक्यता मी नाकारीत नाही.

त्याने चोख्या असे नाव सांगितले. तो मंगळवेढ्याचा चोखोबाच, असा माझा आग्रह नाही. पण ही घटना घडली, तेव्हा मी हे पुस्तक संत फुटाणे यांना वाचून दाखवत होतो. शेजारी तो चोख्या येऊन बसला होता. माझी अशी सवय आहे, की अधूनै मधून 'काय समजले काय?' असा प्रश्न जेव्हा मी विचारी, तेव्हा तो महिपतींच्या ग्रंथातील पुढील ओव्या म्हणून दाखवीत असे. या ओव्या कोठल्याही वारकऱ्याला मुखोद्गत नाहीत. शिवाय तो मुक्त पुरुषासारखा होता. अतीव नम्र दिसे व दर दोन-तीन मिनिटांनी आनंदाच्या लहरी त्याच्यातून उमटत. त्याशिवाय त्याने 'आम्ही न्हावन' असा शब्द वापरला होता. या 'न्हावन' शब्दाचा अर्थ गेली ३५ वर्षे मी अनेकांना विचारीत आहे. पण अद्याप त्याचा अर्थ मला कोणीही सांगितलेला नाही.

प्रत्येक मनुष्यात विश्वचैतन्याचा भाग असतो. Every man at deeper

*level, is also universal.* *त्याला या गोष्टीची जाणीव असेलच असे नाही. शिवाय प्रत्येक कल्पनेला कर्ता असतो. भावनेला कर्ता नाही. तेव्हा हा कल्पनेचा खेळ नसून Deeper than imagination आहे. आता हे कसे होते, हे मला ठाऊक नाही; कुणी यावर विचार केला असेल तर त्याने ते समजावून सांगावे, म्हणून हे प्रकट कथन आहे. पागे पुढे म्हणाले, "सर्वत्र चैतन्य हे तत्त्वज्ञानाचे उत्तर आहे. विज्ञानाचे नाही. पण श्रेष्ठ वैज्ञानिकांनी अणुचा आधार घेऊन 'कॉन्शस माईंड' आहे, हे मान्य केले आहे. विश्व हे मूलत: जड का चेतन, हा खरा प्रश्न आहे. आणि आमची त्यासंबंधी व्याख्या सोपी आहे. हलण्याचे जाणण्याचे सामर्थ्य आहे, ते चेतन व आपणहून हालत नाही, जाणण्याचे समार्थ्य नाही, ते जड. अगदी साधे घर घेतले तरी त्याची रचना करणारा कुणी इंजिनिअर असतो. एखादी गोष्ट ॲटोमॅटिक आहे असे आपण म्हणतो. पण त्यामागे कुणाची तरी बुद्धी असतेच ना! मग अशा कृत्रिम गोष्टीमागे रचना असते तर चंद्र, सूर्य, तारे, त्यांच्या फिरण्याच्या गती अशा गोष्टींमागे का रचना असून नये? दृष्टावरून अदृष्टाचे अनुमान का काढू नये?"*

*अतींद्रिय शक्तीविषयी पाश्चात्य देशात संशोधन सुरू आहे. 'सायकिक डिस्कव्हरीज बिहाईंड आयर्न कर्टन', (रशिया), 'मेटासायन्स कार्पोरेशन' (अमेरिका) अशा पाश्चात्य देशातील अनेक संस्थांत संशोधन सुरू आहे. अशा अनुभवांचे विवरण जगभर केले जात आहे. इथे ते का होऊ नये? आपल्याकडे फक्त विचारांची दिशा आहे. संशोधन नाही. मेंदू, श्वास, हृदय यांचे कार्य, त्यांची शक्ती मोजण्याची साधने उपलब्ध आहेत. यासाठी मूळ विषय लागतो. अनुभव आलेल्यांनी त्यासाठी अशा प्रयोगांसाठी बसले पाहिजे. असे झाले तर थोड्या मर्यादेत का होईना, हे कोडे सुटू शकेल. या वैज्ञानिक संशोधनातून मानव जात सत्यापर्यंत जाण्यास समर्थ ठरेल."*

*शेवटी ते म्हणाले, "अनेक घटनांतून वाचनांतून आलेले असे अतींद्रिय अनुभव मांडले गेले पाहिजेत. संशोधनासाठी ते उपयुक्त ठरतील. बुद्धिवाद्यांनीही हे लक्षात घ्यावे, की बुद्धीचे लक्षण हे की कोठलाही अनुभव ती नाकारीत नाही. फक्त आपल्या कसोटीवर घासून बघते."*

पागे यांनी व्यक्त केलेल्या वरील विचारांवरून पुढील अनुमान निघते. पागे यांच्या अंतर्मनातील चोखाबांविषयीचे तीव्र विचार चोखोबांच्या रूपात मूर्त झाले असले तरीही 'मूर्त व्यक्ती' म्हणजे पागे यांचा विचार किंवा कल्पना नव्हे. कारण 'न्हावन' हा कुठेही न सापडणारा व अर्थ न कळणारा शब्द तिने वापरला होता. याचा सरळ अर्थ असा होतो की ती व्यक्ती प्रत्यक्ष चोखोबाच होती. पण ती पागे यांच्या चोखाबांविषयीच्या तीव्र विचाराने मूर्त स्वरूपात प्रकट झाली. म्हणजे विचार

मूर्तरूप धारण करू शकतात. पण शुद्ध व्यक्तिनिष्ठ (Subjective) नसतात, तर त्यात वस्तुनिष्ठताही (objectivily) मिसळू शकते, असा याचा अर्थ होतो. देहधारी व देहातीत अशा भिन्न चेतनांचा जेव्हा परस्परव्यवहार (interaction) होतो, तेव्हा असे धेडगुजरी अनुभवाचे प्रकार घडत असल्याची अनेक उदाहरणे असून 'संचार' हे त्यातील एक ठळक उदाहरण होय.

■■■

## प्रकरण आठवे

# एक आधुनिक अग्निदिव्य

*हुताशनश्चंदनपंकशीतलः ।।*

*- कालीदासाची समस्यापूर्ती*

---

गुलबर्गा जिल्ह्यातील अफजलपूर तालुक्यातील हिरेजेवरगी हे सुमारे दीडहजार वस्तीचे एक लहान खेडे. या खेड्यात कोणाचाही विश्वास बसणार नाही अशी एक घटना घडल्याची बातमी प्रस्तुत लेखकाने धारवाडला असताना एका कानडी वृत्तपत्रात वाचली आणि लगेच 'तरुण भारत' (पुणे) व 'सकाळ' ला ''बुद्धिवाद्यांना आवाहन'' या मथळ्याखाली पत्र लिहिले. त्या पत्रात म्हटले होते की, गुलबर्गा जिल्ह्यातील अफजलपूर तालुक्यातील हिरेजेवरगी या गावी नवऱ्याने आपल्या पत्नीच्या शीलाचा संशय घेऊन तिला उकळत्या तेलातील नाणे काढायला लावून परीक्षा घेतली असल्याची व पत्नीने कसलीही दुखापत न होता ती परीक्षा पार पाडल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. ही बातमी सकृद्दर्शनी खरी असावी याबद्दलचे संकेत दोन गोष्टींनी मिळतात. एक, तिने उकळत्या तेलातील नाणे काढून ते पतीच्या हातात दिल्यानंतर पतीचा हात भाजल्याचे सांगण्यात येते. दुसरे, तिने हे अग्निदिव्य यशस्वीपणे पार पाडल्याबद्दल तिचा त्या गावातील लिंगायत स्वामीकडून जाहीर सत्कार करण्यात आला आहे. बुद्धिवाद्यांनी या बातमीच्या सत्यासत्यतेची शहानिशा करून एक तर ती खोटी असल्याचे सिद्ध करावे अन्यथा आपला बुद्धिवाद फारच तोकडा असल्याचे जाहीरपणे मान्य करावे, असे त्या पत्रात शेवटी म्हटले होते.

याविषयी कसलीही प्रतिक्रिया 'सकाळ' मधून नंतर प्रसिद्ध झालेली नाही.

याचे दोन अर्थ निघू शकतात. एक तर ही बातमी खरी असणे शक्य नाही असे समजून त्याची सत्यासत्यता तपासून पाहण्याची गरज कोणाही बुद्धिवाद्याला वाटली नसावी व ती ते विसरूनही गेले असावेत; किंवा ही घटना घडणे शक्य आहे असे वाटून 'तिच्या सत्यासत्यतेची तपासणी कशाला करायला पाहिजे?' असे काही जणांना वाटले असावे व ते स्वस्थ बसले असावेत. या दोनही प्रतिक्रिया किंवा दृष्टिकोण वैज्ञानिक प्रवृत्तीला धरून नाहीत, असे प्रस्तुत लेखकाचे मत असल्यामुळे तो स्वत: या घटनेची सत्यासत्यता तपासण्यासाठी तेथे गेला व त्याची त्याने शहानिशा केली.

## विज्ञान अनुभवजन्य आहे

याविषयी वैज्ञानिक विचारसरणी काय आहे हे स्पष्ट केले पाहिजे असे वाटते. विज्ञानाचे कार्य बुद्धीच्या निकषावर चालत असले तरी शेवटी अनुभवाचा त्याला आधार असावा लागतो. विज्ञानाचा पाया वास्तवावर (facts) रचावा लागतो, केवळ बौद्धिक सिद्धांतावर नव्हे. विज्ञान हे अनुभवजन्य (empirical) आहे, असे याच कारणासाठी म्हटले जाते. कोणत्याही गोष्टीची सत्यासत्यता केवळ बुद्धिवादाने ठरवता येत नाही, तर ती अनुभवाने ठरवली पाहिजे असे विज्ञानवादी म्हणतो. अणूचे विभाजन करणे अशक्य आहे असा शास्त्रज्ञांचा एकेकाळी बौद्धिक सिद्धांत होता. (अणु याचा अर्थच ज्याचे पुन्हा विभाजन करता येत नाही असा पदार्थाचा 'अंतिम घटक.') पण शेवटी अणूचे विभाजन झाले ! जे बुद्धीला अशक्य वाटले ते अनुभवाने शक्य ठरले. जे खरे आहे (अणूचे अविभाज्यत्व) असे बुद्धीला वाटत होते, ते अनुभवाने खोटे आहे हे सिद्ध झाले. खरे-खोटे अनुभवाच्या निकषावर तपासून पाहिल्याने म्हणजे प्रयोगाने ठरते, केवळ बुद्धिवादाने ठरत नाही. कदाचित् अशा गोष्टीविषयी वृत्तपत्राला पत्र लिहिणारा मी मध्ययुगीन विचारसणीचा आहे असे काहींना वाटले असणे शक्य आहे. पण ज्यांना असे वाटते त्यांनी ज्याच्याविषयी मी पत्र लिहिले त्याची शहानिशा करून ते खोटे आहे हे सिद्ध करायला नको काय? घरी बुद्धिवाद वा तर्क करीत बसल्याने काय सिद्ध होणार आहे? मी ३०० किलोमीटर अंतरावरील त्या गावी प्रत्यक्ष जाऊन या घटनेची माहिती मिळविण्याचा का प्रयत्न केला हे सांगण्यासाठी हे सर्व लिहिले. मला तेथे प्रत्यक्ष तपासाअंती काय आढळले ते वाचकांपुढे ठेवण्याचा येथे प्रयत्न करीत आहे.

## थोडी पार्श्वभूमी

ही बातमी वाचल्यानंतर माझे मित्र डॉ. सी. बी. देसाई यांना या बातमीसंबंधी पत्रव्यवहार करायला सांगितले. त्यांनी ज्या बाईने ही परीक्षा यशस्वीरीत्या पार

पाडल्याचे सांगण्यात येते त्या बाईचा जाहीर सत्कार करणाऱ्या हिरेजेवरगीच्या बृहन्मठाच्या गुरुशांत स्वामींना व हे प्रकरण उजेडात आणणारे गुलबर्गा जिल्ह्याचे 'कोरडवाहू भू-अभिवृद्धी मंडळा'चे अध्यक्ष व कर्नाटक विधानसभेचे माजी सदस्य श्री. हणमंतराव देसाई यांना पत्रे लिहिली. श्री. देसाई हे हिरेजेवरगीचे असले तरी गुलबर्ग्यात राहात असल्याने व ते बेंगळूरला वरचेवर जात असल्याने त्यांच्याकडून कसलेच उत्तर आले नाही. (आमचा पत्रव्यवहार हिरेजेवरगीच्या पत्त्यावर चालू होता.) हिरेजेवरगीच्या बृहन्मठाच्या गुरुशांत स्वामींनी मात्र आमच्या पत्राला उत्तर लिहिले. त्याना मी या प्रकरणाचा तपास करण्यासाठी येणार असल्याचे कळविले व दोन दिवस अगोदर तार पाठवून मी पाठोपाठ गेलो. (पण मी तेथे गेल्यानंतर तार मिळाली !) तेथे श्री. हणमंतराव देसाई यांचे बंधू श्री. बसवंतराव देसाई हे भेटले व त्यांनीच हे प्रकरण प्रत्यक्ष हाताळले व आपले बंधू हणमंतराव यांचे मार्फत कानडी पत्रात प्रसिद्ध करविले असे मला तेथे गेल्यानंतर कळले. श्री. बसवंतराव देसाई हे धारवाडच्या कर्नाटक युनिव्हार्सिटीचे बी. ए. असून ते हिरेजेवरगीच्या व्यवसाय सेवा सहकारी संघाचे चेअरमन आहेत. त्यांनी व मठाधीश गुरुशांत स्वामी यांनी माझ्या तपासकामात अनमोल साह्य केले.

हिरेजेवरगी हा गाव अफजलपूर या तालुक्याच्या ठिकाणाहून उत्तरेला २३ किलोमीटर अंतरावर आहे. या गावातील सर्वात श्रीमंत व प्रतिष्ठित घराणे म्हणून हणमंतराव देसाई यांचे घराणे प्रसिद्ध आहे. देसाई यांच्या तीनही बंधूंना गावातील लोक फार मानतात असे आढळून आले. गाव केवळ दीड हजार वस्तीचा असूनही तेथे शांतलिंगेश्वर बृहन्मठ या नावाचा एक मोठा मठ आहे, त्या मठाचे स्वामी अक्कलकोट, दुधणी इ. पाच मठांचे अधिपती आहेत असे समजले (त्यांच्या षष्ठ्यब्दी समारंभाला त्यावेळचे कर्नाटकचे मुख्यमंत्री देवराज अरस यांनी खास शुभसंदेश पाठविला होता.) स्वामींना गावातीलच नव्हे तर पंचक्रोशीतील सर्व जातींचे लोक फार मानतात व खासगी भांडणेही स्वामींच्या मध्यस्थीने मिटवली जातात. अर्थात् देसाई बंधूंचे या कामी त्यांना साह्य मिळते.

## प्रत्यक्ष घटना

हिरेजेवरगीचा एक (मुस्लिम कुटुंबातील) रहिवासी सैफनसाब महमद ख्याडगी याचे घरी घडलेली ही घटना. बारा वर्षांपूर्वी सैफनसाबचे लग्न आंदेवाडी या त्याच तालुक्यातील जवळच्या खेड्यातील मुलीशी लागले. दोन-तीन वर्षानंतर तिला मुले होत नाहीत या सबबीखाली त्याने आपल्या आप्तातील दुसऱ्या एका मुलीशी लग्न लावले. दुसऱ्या बायकोला हल्ली चार मुले आहेत. दुसऱ्या लग्नानंतर पहिल्या मदीनाबी या बायकोशी सैफनसाबचे व त्याच्या दुसऱ्या बायकोचे व आईचे पटेनासे

झाले. नवऱ्याने तिला वरचेवर माहेरी पाठवून द्यावे, तिने स्वामींच्या व देसाई बंधूंच्या मध्यस्थीने परत नवऱ्याकडे यावे असे अनेक वेळा घडले. असे होण्याचे मुख्य कारण म्हणजे तिच्या शीलाविषयी सैफनसाबला नेहमीच संशय येत असे. नवऱ्याच्या संशय निरसनासाठी तिने अनेकदा देवाच्या शपथा दिल्याचे सांगण्यात आले, पण त्याचा त्याने संशय फिटत नसे, व भांडणे सुरूच राहिली. अशाच प्रकारे २७ मार्च रोजी सकाळी साडेदहाच्या सुमारास अशीच दोघांची वादावादी झाली. सैफनसाबने एकदम तिला "तू शुद्ध असशील तर उकळत्या तेलातील नाणे काढशील काय?" असे विचारले. तिने ताबडतोब होकार दिला व लगेच स्वतःच एका भांड्यात पाऊण एक किलो गोडेतेल घालून ते चुलीवर ठेवून उकळविले. सैफनसाबने तेलाला उकळी फुटताच त्यात एक पाच पैशाचे नाणे टाकले व मदीनाबीने ते काढून त्याच्या हातावर टाकले. त्याने ते हातात झेलले. पण हात भाजताच ते खाली टाकले. लगेच मदीनाबीने बाहेर जाऊन शेजारच्या दोन बायकांना बोलावून आणले व घडलेली हकीगत सांगितली. थोड्याच वेळात ही बातमी वाऱ्यासारखी गावभर पसरली, व गावातील लोकांची त्यांच्या घराकडे रीघ लागली. सोसायटीचे चेअरमन श्री. बसवंतराव देसाई रात्री आठ वाजता त्यांच्या घरी आले व लोकांना आपापल्या घरी जायला सांगितले. कारण लोक सैफनसाबवर बायकोची अशी परीक्षा घेतल्याबद्दल भयंकर संतापले होते व त्यालाही अशीच परीक्षा देण्याचा आग्रह करीत होते ! (गावकऱ्यांच्या रोषाला बळी पडायला नको म्हणून सैफनसाब दुसऱ्या दिवशी पहाटे सोलापूरला पळून गेला, तो दोन दिवस आलाच नाही. सोलापूरला त्याचा काका मिलमध्ये काम करतो.) त्यांनी मदीनाबीचा हात पाहिला व तिच्या हाताला कसलीच इजा पोचली नसल्याबद्दल स्वतःची खात्री करून घेतली. नंतर त्यांनी गुलबर्ग्यात राहात असलेल्या आपल्या थोरल्या बंधूना-हणमंतराव देसाईना-ही बातमी कळविली. त्यांनीच नंतर या घटनेला वृत्तपत्रातून प्रसिद्धी दिली. 'कलियुगाची सीतादेवी' या मथळ्याखाली ही बातमी प्रथम 'संयुक्त कर्नाटक' या कानडी वृत्तपत्राच्या १५ एप्रिलच्या अंकात गुलबर्ग्याहून पाठवलेली बातमी म्हणून प्रसिद्ध झाली. याच्या चारच दिवस अगोदर म्हणजे ११ एप्रिल रोजी मदीनाबी हिचा हिरेजेवरगीत गुरुशांत स्वामी यांच्या हस्ते शाल, चोळी, श्रीफळ इत्यादींनी जाहीर सत्कार करण्यात आला होता.

मी प्रत्यक्ष घटनास्थळी भेट देऊन संबंधित व्यक्तींच्या गाठीभेटी घेऊन मिळविलेली माहिती ही अशी आहे. ज्या भांड्यात तेल तापविले ते भांडे हल्ली बसवंतराव देसाईंनी आपल्या ताब्यात घेतले आहे. ते मला दाखवण्यात आले. ही घटना घडली तेव्हा मदीनाबी व तिचा नवरा सैफनसाब हे दोघेच घरी होते. सैफनसाबचा बाप वारला असून आई या घटनेच्या वेळी करजगी या गावी गेली

होती. सैफनसाबची दुसरी पत्नी मुलांच्या शिक्षणासाठी सोलापूरला (तिच्या माहेरी) जाऊन राहिली आहे असे सांगण्यात आले.

आता ही घटना कितपत खरी मानायची? ही घटना प्रत्यक्ष घडली तेव्हा सैफनसाब आणि त्याची बायको यांच्याशिवाय दुसरे कोणीही तेथे नसल्याने या दोघांवर कितपत विश्वास ठेवायचा? हा त्यांचा बनाव नसेल कशावरून? उकळत्या तेलात हात घातल्यानंतर तो पोळल्याशिवाय राहील काय? हे विज्ञानाच्या प्रस्थापित नियमाविरुद्ध नाही काय? इत्यादी प्रश्न साहजिकच येथे निर्माण होतात. त्यांचा विचार करण्यापूर्वी ज्या कुटुंबात ही घटना घडली त्या कुटुंबाचा इतिहास समजावून घेतला पाहिजे.

## कुटुंबाचा इतिहास

हिरेजेवरगीच्या घटनेचा मुख्य व एकमेव साक्षीदार सैफनसाब हा सुमारे ३२ वर्षे वयाचा असून या घटनेची नायिका सैफनसाबची पत्नी मदीनाबी हिचे वय २८ आहे. या कुटुंबाची जेवरगीत थोडी जमीन असून हल्ली ते राहात असलेले घर - ज्या घरात ही घटना घडली-त्याच्या स्वत:च्या मालकीचे आहे. सैफनसाबने मदीनाबीशी भांडण न करता प्रपंच केला तो लग्नानंतर दोनच वर्षे, म्हणजे दुसरे लग्न होईपर्यंत. नंतर त्याचे तिच्याशी दहा वर्षे, परवाच्या घटनेपर्यंत पटले नसल्याचे दिसून येते. त्याची दुसरी बायको ही आप्तातील असल्याने - ती त्याच्या आत्याची मुलगी - त्याला व त्याच्या आईला जवळची वाटते. या तिघांचा मदीनाबीवर ती भानामती करते असा आरोप असून तो आरोप तिच्यावर कशाच्या आधारावर ते करीत असत हे कळू शकलेले नाही. बहुधा तिला घरातून हाकलून देण्यासाठी रचलेले ते तिच्याविरुद्धचे कुभांड असावे असा दाट संशय येतो. कारण मदीनाबीच्या वडिलांकडून कळले की मदीनाबीवरच भानामती करण्यात आली असून तिला आपण कित्येक वर्षे आपल्या घरी ठेवून घेतले व देवर्षीकडून उपचार करविले. (याविषयी संबंधित देवर्षीची माहिती मला त्याने दिली व आपले म्हणणे खरे की खोटे याची शहानिशा करून घेण्यास मला सांगितले.) या आरोप प्रत्यारोपावरून एक गोष्ट स्पष्ट होते की सैफनसाबच्या कुटुंबात मदीनाबीला एकाकी पाडण्यात आले होते व तिला नांदवायला ते कुटुंब उत्सुक तर नव्हतेच, पण कसेही करून तिची घरातून हकालपट्टी कशी करता येईल याचे निमित्त शोधत होते. भानामती हे निमित्त असले तरी खरे कारण वेगळे होते. खरे कारण सैफनसाबला मदीनाबीच्या शीलाविषयी सारखा संशय येत होता हे होते. पण असा संशय घ्यायला त्याच्याजवळ कसलाच प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पुरावा अगर आधार नव्हता. मदीनाबी दिसायला सुस्वरूप आहे, हेच तिच्या संशयी वृत्तीचे कारण असावे असे मात्र वाटले.

## मदीनाबीचा कृत्रिम गर्भपात कशासाठी?

मदीनाबीला नांदवायची सैफनसाबची तयारी नसण्याचे तिच्या शीलाविषयी त्याला येणारा संशय हेच एक कारण नसावे. तो आप्तातील आपल्या बायकोच्या पूर्ण कह्यात असावा असा एक संशय येतो. असा संशय येण्यासारखी एक घटना घडली आहे; सैफनसाबच्या दुसऱ्या लग्नानंतर त्याच्या पहिल्या पत्नीला, मदीनाबीला (जिला मूल होत नाही म्हणून दुसरे लग्न केले होते) दिवस गेले आणि तीन महिन्यानंतर तिला किरकोळ आजार आला असता त्याने आजारावरचे औषध म्हणून तिला फसवून गर्भपाताची गोळी दिली आणि तिचा गर्भपात झाला. (हे तिला माहीत झाल्यानंतरही नवऱ्यावर रूष्ट होण्याऐवजी तिची त्याच्यावरची भक्ती व प्रेम अढळ असून, कितीही जाच झाला तरी त्याच्या घरीच नांदणार कशी तिची जिद्द असल्याचे तिच्या वडिलांनी सांगितले.) मदीनाबीला अपत्य झाले तर मदीनाबीचा सैफनसाबच्या उत्पन्नावर व कुटुंबावर मालकी हक्क प्रस्थापित होणार ही भीती त्याच्या दुसऱ्या पत्नीला वाटत असली पाहिजे हे उघड आहे. आणि असे होऊ नये म्हणून तिने नवऱ्याचे सहकार्य मिळविले असले पाहिजे; नाहीतर दुसऱ्या बायकोला चार मुले झाली तरी त्याची फिकीर न करणाऱ्या सैफनसाबला पहिल्या पत्नीला (जिला मूल होत नाही म्हणून त्याने दुसरे लग्न केले) बऱ्याच वर्षानंतर गर्भ राहिला तर तो नको का असावा हे कळणे कठीण आहे. या सर्व गोष्टींवरून हे स्पष्ट होते की मदीनाबी ही सैफनसाबला, त्याच्या कुटुंबाला नको असलेली एक व्यक्ती होती व कसेही करून तिची ब्याद घालविण्याची सर्वांची, विशेषत: सैफनसाबची खटपट होती. तिच्या शीलाविषयी त्याला येणारा संशय हा या गोष्टीत भरच घालणारा ठरला. ती तर तिच्याविरुद्ध त्याची मुख्य तक्रार होती आणि यासाठी उकळत्या तेलातील नाणे काढणे ही नामी शक्कल त्याने हुडकून काढली ! कारण त्याची खात्री होती की या प्रयत्नात तिचा हात पोळेल आणि आपण ती बदफैली आहे असे उघडपणे म्हणू शकू व तिच्यापासून सुटका मिळवू शकू. पण घडले ते विलक्षण !

## बनावाची शक्यता ?

पण खरोखरच विलक्षण घडले की हा सारा बनाव होता?

बनावाची शक्यता गंभीरपणे विचारात घेण्यासारखे प्रस्तुत लेखकाला काहीच आढळून आलेले नाही, हे येथे स्पष्ट केले पाहिजे. बनाव असलाच तर त्यात सैफनसाबचा हात असण्याचा सुतराम संभव नाही. मदीनाबीने हा बनाव घडवून आणला असेल तर तो कसा घडविणे शक्य आहे? तेल उकळत होते हे खरे मानले पाहिजे. कारण सैफनसाबचा हात भाजला आहे आणि मदीनाबीचा हात भाजलेला नाही याबद्दलही संशयला जागा नाही. कारण याविषयी अनेकांच्या (सैफनसाबाशिवाय)

साक्षी आहेत. सैफनसाबने तर मी विचारल्यावरून हिरेजेवरगीच्या 'राजा बागस्वार' या पीराची शपथ दिली आणि म्हटले की हे सर्व खरे आहे. ('राजा बागस्वार' या संताचा उरूस रमजानानंतर एकविसाव्या दिवशी हिरेजेवरगीत प्रतिवर्षी भरतो असे सांगण्यात आले.)

अशा रीतीने या बनावात (तो बनाव असेलच तर) सैफनसाबचा हात नसेल, तेलही उकळत होते हे खरे असेल व मदीनाबीचा हात भाजलेला नाही हेही खरे असेल, तर मग तो 'बनाव' कसा ठरतो? बुद्धिवादी म्हणतील की होय, एवढे करूनही तो बनाव असू शकतो. कसा? तर मदीनाबीने आपला हात पोळू नये म्हणून स्वत:च्या हाताला एक विशिष्ट रसायन लावून घेतले असेल ! असे एक रसायन आहे असे गृहीत धरले तरी लहान खेड्यात जन्मलेल्या व लहान खेड्यातच लग्न झालेल्या मदीनाबीसारख्या अशिक्षित बाईला या रसायनाची कल्पना असेल यावर विश्वास ठेवणे कठीण आहे.

पण मुख्य मुद्दा असे रसायन मदीनाबीला माहीत आहे असे गृहीत धरले तरी ते वापरण्याची परिस्थिति व शक्यता होती का, हा आहे. कारण उकळत्या तेलातून नाणे काढण्याची कल्पना मदीनाबीला पूर्वकल्पना न देता अवचितपणे तिच्यापुढे सैफनसाबने मांडली आहे; आणि तिनेही त्याच्या समक्ष क्षणाचाही विलंब न लावता ही परीक्षा दिली आहे. मदीनाबीला एक तास नव्हे, एक दिवस अगोदर याची सूचना देऊन ही परीक्षा घेतली असती तर कदाचित संशय घेता आला असता. (पण हे रसायन तिला नवऱ्याला कळू न देता एक दिवस अगोदर सूचना देऊनही खेड्यात कसे मिळवता आले असते हा प्रश्नच आहे.) पण तसे घडलेले नाही. तेव्हा या तथाकथित रसायनी बनावाची कल्पना गंभीरपणे विचारात घेण्याचे कारण नाही.

या घटनेत मदीनाबीने सैफनसाबला अन्य मार्गाने फसविण्याचा काही प्रकार असता तर त्याला तेवढेच निमित्त तिच्याविषयीच्या संशयला बळकटी आणण्यास पुरेसे वाटले असते. पण त्याचे याबाबत पूर्ण समाधान झालेले आहे. या घटनेची सत्यता दृढ करणारा दुसरा व निर्णायक पुरावा म्हणजे मी तेथे गेलो तेव्हा ही घटना घडून दोन महिने उलटले असूनही मदीनाबीशी सतत भांडण्याऱ्या सैफनसाबने तिच्याशी एकदाही भांडण काढलेले नाही असे मला आढळले. इतकेच नव्हे तर तो तिच्याशी आनंदाने संसार करीत आहे, आता त्याला तिच्याविषयी यत्किंचितही संशय नाही असे आढळले. आपले पूर्ण समाधान झाले आहे असे तो म्हणतो.

मी मदीनाबीला विचारले, "पुन्हा ही परीक्षा देशील का?" तर ती म्हणाली, "नवऱ्याने सांगितले तर देईन." मी सैफनसाबला विचारले, "पुन्हा तिची परीक्षा तू घेशील का?" तर तो म्हणाला, "आता पुन्हा त्याची जरूरी नाही; माझा संशय फिटला आहे."

अशा रीतीने येथे बनावाची शक्यता नाही असे म्हणावे लागते. आणि बनाव असलाच तर त्यात सैफनसाबचाही हात असल्याचे गृहीत धरावे लागते. पण प्रत्यक्षात आढळून आलेले सर्व पुरावे या शक्यतेच्या विरुद्ध आहे.

मग ही घटना सत्य मानायची काय?

प्रस्तुत लेखकाला तरी तसे मानण्यावाचून दुसरा पर्याय दिसत नाही. पण हे तर्काला, बुद्धीला व विज्ञानाला धरून आहे काय? नसेल तर अशी गोष्ट खरी मानून आपण अंधश्रद्धेत भरच घालीत नाही काय?

## खरी अंधश्रद्धा कोणती ?

वरील प्रश्नात बऱ्याच गोष्टी गृहीत धरलेल्या आहेत. एक म्हणजे जे तर्काला वा बुद्धीला धरून आहे तेच खरे मानले पाहिजे. दुसरे, बुद्धीला जे धरून आहे तेच विज्ञान म्हटले पाहिजे. आणि तिसरे, जे बुद्धीला धरून नाही ते प्रत्यक्ष घडले तरी खोटे म्हटले पाहिजे. बुद्धीला न पटणारे प्रत्यक्षात घडले असेल तर ते खरे मानणे ही अंधश्रद्धा होय.

प्रत्यक्ष घडलेले बुद्धीला पटत नाही म्हणून खोटे मानणे याला विज्ञान म्हणायचे असेल तर विज्ञानाचा उद्देश सत्य शोधणे हा नसून खोटी बौद्धिक सुसंगती शोधणे हा आहे असे ठरते. तर्कविरुद्ध पण प्रत्यक्षात घडलेले खरे मानणे ही अंधश्रद्धा म्हणायची झाल्यास तर्काला धरून असलेल्या पण प्रत्यक्षात न घडलेल्या गोष्टीवर (भ्रमावर) विश्वास ठेवणे हा डोळसपणा ठरतो. एकंदरीत जे प्रत्यक्ष घडते - म्हणजे जे इंद्रियगम्य आहे ते खरे मानायचे झाल्यास तर्क वा बुद्धी बाजूला ठेवावी लागते; व बुद्धी प्रमाण मानायची झाल्यास जे इंद्रियगम्य आहे त्यावर अविश्वास दाखवावा लागतो, ते खोटे मानावे लागते, असा हा पेचप्रसंग आहे. जे इंद्रियगम्य आहे ते केवळ तर्काला विरोधी आहे म्हणून खोटे मानले पाहिजे असे म्हणणारे बुद्धिवादी नवी अंधश्रद्धा निर्माण क़रीत आहेत, असेच म्हणावे लागते. कोणी म्हणेल की जे घडणेच शक्य नाही ते खोटे मानण्यात अंधश्रद्धा कसली? पण विज्ञानात असा काही सिद्धांत आहे का की अमुक गोष्ट घडणेच शक्य नाही? विज्ञान निरीक्षणावर आधारलेले असते. विस्तवामुळे भाजण्याची संवेदना होते व काही लक्षणे दिसून येतात हे निरीक्षणाने आढळत असले तरी नेहमीच असे घडते असा त्यावरून निष्कर्ष निघत नाही. उदा. कागदाने कधीच भाजत नाही, प्रत्यक्ष केलेल्या संमोहन प्रयोगात कागदाने नव्हे तर कशानेही (न तापलेल्या वस्तूने) भाजते (फोड उठतात) हे सप्रयोग दाखवून देण्यात आले आहे. (पाहा : The Challenge of Hypnosis :- L. Chertok) नेहमी कावळे काळे आढळून येतात, म्हणून पांढरा कावळा असणेच शक्य नाही असा त्यावरून निष्कर्ष निघत नाही; आणि कोणी तसा

तो काढला व एकदा पांढरा कावळा आढळून आला तर तो निष्कर्ष चुकीचा ठरतो. वरील मदीनाबीचा हात न भाजण्याची घटना म्हणजे पांढरा कावळा मानला तर बुद्धीचा काळ्या कावळ्याविषयीचा निष्कर्ष चुकीचा होता असे मानावे लागते. विज्ञान शेवटी अनुभवजन्य (Empirical) आहे. म्हणजे जे इंद्रियगम्य आहे त्यावर विश्वास ठेवायला प्रथम विज्ञान सांगते. मग भले ते तर्काला विरोधी असेल. **विश्वामागे दडलेले सत्य शोधणे शक्य आहे असे मानावयाचे झाल्यास ते बुद्धिवादाने शक्य नसून विज्ञानवाद स्वीकारल्यानेच शक्य आहे असा यावरून निष्कर्ष निघतो.**

## बुद्धिवादी गप्प का?

पण सत्य शोधणे हे बुद्धिवादाचे कामच नसेल तर? विश्व किंवा विश्वातील घटना समजून घेणे हे आपले काम नव्हे असे बुद्धिवादी मानत असतील तर? असे प्रश्न उपस्थित करण्याचे कारण, मी हे वृत्त 'बुद्धिवाद्यांना आवाहन' या मथळ्याखाली वृत्तपत्रांना देऊन कित्येक महिने लोटले तरी त्यानी त्याची कसलीच दखल घेतली नाही. मी हिरेजेवरगीत यासंबंधी चौकशी केली असता काही लोकांची चौकशी करणारी पत्रे आली असली तरी प्रत्यक्ष कर्नाटकातून वा महाराष्ट्रातून कोणीही या घटनेची शहानिशा करण्यासाठी आलेले नाहीत असे कळले. (हिरेजेवरगी कर्नाटक-महाराष्ट्र सीमेवर आहे.) या घटनेची शहानिशा न करता असली खोटी बातमी छापून अंधश्रद्धा पसरविण्यास हातभार लावल्याबद्दल संबंधित 'संयुक्त कर्नाटक' या कन्नड वृत्तपत्राच्या संपादकाची निर्भत्सना करणारी पत्रे मात्र कानडी बुद्धिवाद्यांनी संपादकांना अवश्य लिहिली आहेत! (ती संपादकांनी 'संयुक्त कर्नाटका'त प्रसिद्ध केली आहेत.)

या घटनेविषयी बुद्धिवादी दृष्टिकोणातून मी हिरेजेवरगीतील लोकांपुढे असा प्रश्न उपस्थित केला, की ही घटना खरी असेल तर इतरत्र अशी परीक्षा घेतली असता पत्नीचा हात पोळल्याची जी उदाहरणे घडली आहेत तिची उपपत्ती कशी लावणार? याला बसवंतराव देसाईनी उत्तर दिले, की अशी परीक्षा देणारी स्त्री कदाचित पतिव्रता नसेल. पण ती पतिव्रता नसती तर तिने ती परीक्षा दिलीच नसती असे मी म्हणताच स्वामीजींनी सांगितले की, असले प्रयोग सर्वत्र यशस्वी होतील असे म्हणता येत नाही; हा श्रद्धेचा प्रश्न आहे. बसवंतराव म्हणाले, की आम्ही स्वतःची सही दोनदा केली तर त्यात थोडा तरी फरक दिसून येतो. एकासारखी दुसरी सही करण्यात पूर्ण यश कोणालाच येत नाही. मग अशा प्रयोगात त्याची कशी अपेक्षा धरता येईल? एकंदरीत या लोकांनी या घटनेविषयी ती खरी असल्याबद्दल खात्री पटल्याने बुद्धिवादी दृष्टीने स्वतःची काहीतरी समजूत काढलेली दिसून येते, एवढे खरे.

या घटनेच्या खरेपणाविषयीचे परिस्थितिजन्य पुरावे इतके बळकट आहेत की ते नाकारणे हा निव्वळ आडमुठेपणा ठरेल. ही घटना खोटी म्हणायची झाल्यास सैफनसाब व त्याची बायको (या दोघांशिवाय या घटनेच्या वेळी इतर कोणीही हजर नव्हते) या दोघांनी हा बनाव घडवून आणण्यासाठी दहा वर्षे भांडणाचे नाटक केले असे मानावे लागते. शिवाय मदीनाबीला भानामतीमुळे जो त्रास झाला असल्याचे सांगण्यात आले आहे, (ज्याचे तपशीलवार वर्णन करण्याचे अंधश्रद्धेत भर घातल्याचा माझ्यावरील आरोप टाळण्यासाठी मी येथे मुद्दाम टाळले आहे, पण ज्याची माहिती मदीनाबीच्या वडिलांनी मला तपशीलवार सांगितली आहे.) तोही या नाटकाचा एक भागच मानावा लागतो! पण भांडणाचे नाटक करता येते, म्हणून भानामतीच्या त्रासाचे नाटक करता येत नाही. कारण हा त्रास शारीरिक होता ! आणि तो होत होता याबद्दल मदीनाबीच्या वडिलांची साक्ष आहे. तोही बनाव मानायचा झाल्यास या बनावाच्या नाटकात मदीनाबीच्या वडिलांचाही समावेश करावा लागतो ! पण मदीनाबीच्या वडिलांनी हा त्रास खरा असल्याबद्दल एका देवऋषीची साक्ष काढलेली असल्यामुळे हा देवऋषीही या बनावाच्या नाटकात सामील होता असे म्हणावे लागते! आणि या लोकांनी हे नाटक रचून काय मिळविले? त्यांना त्याचा काय फायदा झाला? दहा वर्षे कशासाठी हे नाटक केले? याचाही विचार करावयास पाहिजे. याचा एक 'फायदा' म्हणजे सैफनसाबला गावच्या लोकांचा रोष ओढवून घ्यावा लागला व त्या रोषाचा परिणाम टाळण्यासाठी दोन दिवस गाव सोडून पळून जावे लागले ! (कारण ह्याच्या पाठीमागे अशीच परीक्षा देण्यासाठी गावकऱ्यांचा ससेमिरा सुरू होता !) म्हणून म्हणावे लागते की ही घटना खरी असून बुद्धिवाद्यांपुढील ते एक आव्हान आहे. या उप्परही प्रत्यक्ष तेथे जाऊन या घटनेची शहानिशा न करता ती खोटी असावी असे बुद्धिवाद्यांना म्हणावयाचे असेल, तर मानवातही (Ostrich) शहामृग आहेत असा निष्कर्ष काढण्यावाचून गत्यंतर नाही !

**टीप :** संमोहनाच्या प्रयोगात कोणत्याही थंड वस्तूने त्वचेवर भाजल्याचे फोड उठवता येतात, त्याचप्रमाणे संमोहनाने तप्त किंवा जळत्या वस्तूपासून इजा न होणे शक्य आहे. गिनीज बुकच्या १९८५ च्या आवृत्तीमधील १४९४ अंश फॅरनहाईट इतक्या उष्णतेच्या इंगळावरून २५ फुटापर्यंत कसलीही इजा न होता चालत जाणाऱ्या कोमारचे उदाहरण 'विज्ञान आणि बुद्धिवाद' या ग्रंथात दुसऱ्या प्रकरणामध्ये दिले आहे. (प्रेक्षकांना या इंगळाच्या खड्ड्याजवळ १५ फुटापर्यंत सुद्धा येणे शक्य होत नसे !) भारतातील दरवर्षी घडणारेही एक उदाहरण त्याच ग्रंथात सहाव्या प्रकरणामध्ये दिले आहे. संमोहनाखेरीज अन्य नैसर्गिक कारणामुळेही विस्तवाने न भाजणे शक्य आहे. या संदर्भात महामहोपाध्याय पं. गोपीनाथ कविराज या अनुभवी व अधिकारी पुरुषाचे पुढील टिपण उद्बोधक आहे.

"अग्नीचे दाहकरूप आम्ही जर जाणले नाही तरी त्यात हात घातल्यावर तो भाजायचाच. पदार्थाचा गुणधर्म आपले कार्य करीत राहायचाच. मग त्याचा तुम्ही विचार करा किंवा करू नका. परंतु अशी एक अवस्था असते की, हात विस्तवात घातल्यावरही तो भाजत नाही. त्यावेळी त्याचा नैसर्गिक गुणधर्म कार्य करीत नाही. कशामुळे? तर प्रतिबंधक कारणामुळे. प्रतिबंधक कोण आहे? तो कोणीही असो; त्याच्या मुळाशी प्रबळ विश्वास, विरुद्ध गुणधर्म, मंत्र अथवा इच्छाशक्ती असते. याचा अर्थ असा की गुणधर्म हेही कोणत्यातरी विश्वासाचे, इच्छाशक्तीचे फलस्वरूप आहेत." **मनीषाकी लोकयात्रा** (पं. गोपीनाथ कविराज यांचे चरित्र) लेखक डॉ. भगवती प्रसाद सिंह. (मराठी अनुवाद **'सिद्ध योग्यांच्या सान्निध्यात**) पं. गोपीनाथ कविराज यांची माहिती प्रकरण ११ मध्ये दिली आहे.

वरील उताऱ्यातील 'प्रबळ विश्वास' व 'इच्छाशक्ती' हे अग्नीचे दाहक गुणधर्माला प्रतिबंधक ठरतात असे गोपीनाथांनी म्हटले आहे. याचा अर्थ, नैसर्गिक भौतिक गुणधर्मांना (Physical properties) प्रतिबंध करणारी नैसर्गिकच पण'अभौतिक' (अतींद्रिय) शक्ती अस्तित्वात आहे असा होतो. या शक्तीचा शोध भौतशास्त्राला (Physics) अर्थातच लागणार नाही. म्हणून ती शक्ती अस्तित्वातच नाही असे ते शास्त्र म्हणू शकणार नाही. ती शक्ती शोधण्याचे कार्य म्हणूनच अतींद्रिय विज्ञान (Parapsychology) हे नवे शास्त्र करते. दुर्दैवाने ते शास्त्र अजूनही बाल्यावस्थेत आहे आणि जोपर्यंत अध्यात्मशास्त्र आणि योगशास्त्र यांचे निकष ते शास्त्र वापरत नाही, तोपर्यंत तसेच ते बाल्यावस्थेत राहणार याविषयी संशय बाळगण्याचे कारण नाही. पतंजलींनी योगसूत्रात वर्णिलेल्या सिद्धी खोट्या म्हणणाऱ्यांना पतंजलींनी घालून दिलेले नियम, अटी व निकष यांचा मात्र सोयिस्करपणे विसर पडत असतो! कारण त्या गोष्टी पाळण्याची त्यांच्यात कुवत नसते आणि म्हणून त्या ते अशक्य कोटीतल्या मानून मोकळे होतात! म्हणून पं. गोपीनाथ कविराज यांनी अनेक सिद्धयोग्यांच्या सानिध्यात राहून त्यांच्या सिद्धींच्या खरेपणाचा पडताळा घेऊन वरीलप्रमाणे विधान केले आहे.

आपल्या मांडीवर झोपलेल्या पतीला उठवून चुलीतील ज्वालेत हात घालणाऱ्या मुलाला प्रतिबंध करण्याऐवजी प्रबळ विश्वासाच्या बळावर पतीला न उठवता अग्नीच्या दाहकतेलाच प्रतिबंध करणाऱ्या पतिव्रतेची एक कथा संस्कृत वाङ्मयात पाहावयास मिळते.

कालीदासाच्या समस्यापूर्तीतला हा श्लोक असा आहे.

**सुतं पतंतं प्रसमीक्ष्य पावके न बोधयामास पतीं पतीव्रता ।**
**तदाभवत्तत्पति भक्तिगौरवात् हुताशनश्चंदन पंकशीतलः ।।**

**अर्थ :** अग्नीत हात घालणाऱ्या (पडणाऱ्या) आपल्या मुलाला पाहून (मांडीवर डोके टेकून झोपलेल्या आपल्या पतीला पतिव्रतेने जागे केले नाही. (त्याला बाजूला सारून-जागे करून-मुलाला उचलले नाही). मात्र तिच्या त्या पतिभक्तीच्या गौरवामुळे अग्नी चंदनाप्रमाणे थंड झाला.

**कोणी पतिभक्ती म्हणतील, पण मदीनाबीचा आपण शुद्ध असल्याचा प्रबळ विश्वास तिचा हात न पोळण्यास कारणीभूत ठरणे शक्य आहे.**

■■

## प्रकरण नववे

# महाभारतातील आकाशवाणीचे शास्त्रीय सत्यत्व

*हे नादाची दाकसाळ ।*

*- ज्ञानेश्वर*

---

'रेडिओ' या इंग्रजी शब्दाबद्दल मराठीत 'नभोवाणी' किंवा 'आकाशवाणी' हा शब्द रूढ झाला आहे. पण पुराणांतरी मानवाला अज्ञात सत्य सांगून त्याची अडचणीतून सुटका करणाऱ्या किंवा मार्गदर्शन करणाऱ्या आकाशातील वाणीला 'आकाशवाणी' असे संबोधण्यात आले आहे. महाभारतातील ग्रंथात अशा आकाशवाणीची अनेक उदाहरणे आढळून येतात. उदा. शकुंतला जेव्हा दुष्यंताकडे त्यांच्या संबंधातून जन्मलेल्या भरताला घेऊन जाते व मी तुमची गांधर्व विवाहाची पत्नी व हा तुमचा त्या संबंधातून जन्मलेला मुलगा भरत आहे असे सांगते, तेव्हा तो तिला ओळखत नाही व मुलगा माझा नव्हे असे म्हणतो. कितीही परोपरीने सांगूनही तो जेव्हा शकुंतलेचे म्हणणे मान्य करायला तयार होत नाही, त्यावेळी आकाशवाणी होऊन 'ही तुझीच बायको व मुलगा आहे. त्यांचा स्वीकार कर' असे सांगून शकुंतलेची या अडचणीतून सुटका केल्याचे वर्णन आहे. त्यावेळी 'अथ अंतरिक्षात् दुष्यन्तं वाग् उवाच अशरीरिणी' (म्हणजे अंतरिक्षातून दुष्यंताला अशरीरी वाणी म्हणाली) असे म्हटले आहे. येथे आकाशवाणीला 'अशरीरी वाणी' म्हटले असून हल्लीच्या आकाशवाणीला हा शब्द लागू होत नाही. कारण आकाशवाणीवर रेडिओतून ऐकायला

येणारे शब्द हे मानवी शरीरातूनच आलेले असतात. आवाज रेकॉर्ड करतेवेळी मनुष्यच बोलत असतो, व तो आवाज विद्युत्‌चुंबकीय तरंगामार्फत वितरण (ब्रॉडकास्ट) करणारे यंत्र आकाशवाणी केंद्रात नसेल व आपल्याकडे त्या विद्युत्‌चुंबकीय तरंगांचे पुन्हा ध्वनितरंगात रूपांतर करणारे यंत्र (रेडिओ वा रिसीव्हर) नसेल तर तो आवाज आपल्याला ऐकायला येणार नाही. म्हणून रेडिओमधून येणाऱ्या आवाजाला 'अशरीरी वाणी' हे शब्द लावता येत नाहीत. महाभारतादी ग्रंथात उल्लेखिलेली 'अशरीरी वाणी' ही अशा प्रकारची यांत्रिक पद्धतीने निर्माण केलेली, म्हणजे भौतिक स्वरूपाची वाणी नव्हती. म्हणून पुराणांतरी वर्णिलेली ही 'अशरीरी वाणी' (अथवा आकाशवाणी) ही एक भाकडकथा आहे असे बुद्धिवादी म्हणतात. ही आकाशवाणी म्हणजे भोळसर लोकांचा चमत्कारांकडे असलेला कल व त्यांची धार्मिक अंधश्रद्धा लक्षात घेऊन त्यांची इच्छापूर्ती करणारी कविकल्पना किंवा कथानकातील एक क्लृप्ती या पलीकडे तिला महत्त्व नाही असे ते मानतात.

पाश्चात्य अतींद्रिय संशोधकांनी अशा प्रकारची अशरीरी वाणी ऐकायला येऊ शकते हे सप्रयोग दाखवून दिले असून त्यासाठी ज्या खास बैठका ते घेतात त्यांना 'सीअन्स' म्हणतात. मात्र त्यासाठी एखाद्या माध्यमाची जरूरी असते. पण बहुतेक वेळा हा आवाज एखाद्या तुतारीसारख्या साधनातूनच व अंधाऱ्या खोलीतच ऐकायला येतो असे आढळून येते, (याला काही अपवाद अर्थातच आहेत.) मी येथे जी अशरीरी वाणीची स्वयंसंशोधित उदाहरणे देणार आहे ती प्रत्यक्ष दररोजच्या व्यवहारात सर्वांना ऐकायला आलेली वाणी असून - म्हणजे महाभारतादी ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे ती अक्षरश: 'अशरीरी वाणी' असून - ती ऐकल्याबद्दलच्या घटनेचे अनेक साक्षीदार आहेत. त्यासाठी पाश्चात्य पद्धतीप्रमाणे कुठल्याही माध्यमाची जरूरी नाही, की तुतारीची जरूरी नाही. महाभारतादी ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे ती वाणी साक्षात् आकाशातून (अवकाशातून) सरळ येत असल्यामुळे ती खऱ्या अर्थाने 'आकाशवाणी' ठरते. या पुराणातील भाकडकथा आहेत असे म्हणणाऱ्यांनी स्वत: प्रत्यक्ष अशा घटनांची शहानिशा केल्याशिवायच तसे म्हणण्याचे इत:पर तरी धाडस करू नये.

गळतगा (ता. चिक्कोडी, जि. बेळगांव) या गावी ही आकाशवाणी १० नोव्हेंबर १९९० रोजी प्रथम ऐकायला आली. नंतर दोन महिन्यांनी १० जाने. १९९१ रोजी व पुन्हा १० फेब्रु. १९९१ रोजी असे तीन वेळा ही अशरीरी वाणी गावातील ५०-६० लोकांनी ऐकली. त्यावेळी या घटनेची बातमी वृत्तपत्रातून देण्यात आली होती. पण त्याची कोणी फारशी गंभीरपणे दखल घेतली असल्याचे दिसून आले नाही. प्रस्तुत लेखकाने या प्रकरणाची कसून तपासणी केली असून त्याचा वस्तुनिष्ठ वृत्तांत येथे देत आहे.

१० नोव्हे. १९९० रोजी गळतग्याचे श्री. अण्णासाहेब भरमू चौगुले (झुलपे) (वय ४०, शिक्षण एस्. एस्. सी.) यांच्या शेतात हा आवाज प्रथम ऐकायला आला. सुशीला सुरेंद्र सुतार (वय ४५) ही विधवा बाई व शाला हलसवडे ही १२ वर्षाची ५ वीत शिकणारी मुलगी अशा दोघीजणी अण्णासाहेब यांच्या शेतात भाजी खुडत असताना सुशीलेला उद्देशून 'तू इथे का आलीस? इथे का भाजी खुडतेस? इथून निघून जा' असा तिला आवाज ऐकू आला. हा आवाज सुशीला हिच्या ओळखीचा निघाला. तो चार वर्षांपूर्वी (१९८६ साली) मेलेल्या तिच्या नवऱ्याचा होता, व तो कानडीत बोलत होता. (ते कुटुंब कानडी बोलणारे आहे.) हा आवाज नंतर मराठीतून बोलतानाही काहींनी ऐकला. तो जवळपासच्या शेतात, अण्णासाहेबांच्या शेतातील घरात, जवळच्या (या घरालगतच्या) गावाकडे जाणाऱ्या रस्त्यात अशा अनेक ठिकाणी नंतर अनेकांनी ऐकला. (ऐकलेल्या लोकांच्या नावाची यादी लेखकाकडे आहे.) हा आवाज चार तासापर्यंत ऐकायला येत होता. गावातील अनेक लोकांच्या नावानेही त्याने हाका मारल्या. नाव घेऊन हाक मारलेल्या लोकात मेलेल्या सुरेंद्र सुताराची पूर्वी ओळख नसलेली माणसेही होती. तो मेल्यानंतर गळतगा गावी लग्न होऊन नव्याने नांदायला आलेली परगावची एक मुलगीही होती. तिचे नाव घेऊनही त्या आवाजाने तिला हाक मारली. याचा अर्थ मेलेल्या सुरेंद्र सुताराला माहीत नसलेल्या व्यक्तींनाही तो 'आवाज' ओळखत होता असा होतो. ह्या आवाजाने लोकांशी संभाषणेही केली.

१७ जाने. १९९१ रोजी ह्या आवाजाने सुशीलेला पुन्हा त्याच मळ्यात शिव्या दिल्या. अण्णासाहेब चौगुले (शेतमालक) याच्या बायकोला गलिच्छ शिव्या दिल्या. गावात जाऊन उपाध्यायाला (उपाध्याय जैनांच्या पुरोहिताला म्हणतात.) बोलावून आणले असता त्या उपाध्यायाने 'तू कोण आहेस?' असे विचारले, तेव्हा 'मी सुऱ्याप्पा सुतार' असे त्या आवाजाने स्पष्ट सांगितले नंतर 'तू इथे का आला आहेस?' असे विचारता त्याने सुशीलेला उद्देशून 'तू मला पाहिजेस' असे म्हटले. तेव्हा ती अतिशय घाबरली. त्यानंतर पुन्हा आवाज आला नाही. पण दुसऱ्या दिवशी त्याच शेतात तंबाखूत खुरपण करीत असताना शेतमालकाला पुन्हा आवाज ऐकू आला. यावेळी शेतातील इतर बायकांशी त्याने संभाषण केले. त्याने 'सुशी का आली नाही?' असे विचारले तेव्हा शेतमालकाने 'तिला आम्ही कामासाठी बंद केले आहे' असे सांगितले. तेव्हा तो म्हणाला, 'माझे दिवस घातले नाहीत. दिवस घाला' (पितृश्राद्धाला खेडूत 'दिवस घालणे' म्हणतात.) शेतमालक म्हणाला, 'आम्ही तिला सांगतो.' नंतर 'मग मी जातो' असे त्याने म्हटले.

तिसऱ्या दिवशी दुसऱ्या शेतात शेतमालकाला पुन्हा त्याने विचारले 'दिवस घालायला सांगितले की नाही?' मालकाने 'सांगितले' असे म्हणताच 'सुशीला इकडे

कामाला येऊ देऊ नका' असे त्याने बजावले. 'आम्ही तिला बंद केले आहे' असे मालकाने सांगताच 'मग मी बाक्षात (स्मशानात) जातो' असे त्याने म्हटले.

पण तो गेला नाही. कारण त्यानंतर इतर लोकांशीही तो इतरांच्या शेतात बोलू लागला. काही बायकांना रस्त्यात त्याने हाका मारल्या. एका नवीन नांदायला आलेल्या मुलीला ती रस्त्याने जात असता 'साऊ' असे तिचे नाव घेऊन त्याने हाक मारली व 'मी मधल्या शेतात असतो, तिथे ये' असे तो तिला म्हणाला. तेव्हा ती अतिशय घाबरून डोक्यावरील टोपली तेथेच टाकून जवळच्या मालकाच्या शेतातील घराकडे धूम पळून गेली. एव्हाना गावात याविषयीची बातमी पसरलेली असल्यामुळे मळ्याकडे बरेच लोक आले होते. काही लोकांना हा आवाज स्पष्ट ऐकायला आला. कोणी त्याला शिव्या दिल्या तर 'शिवी देऊ नकोस' असे तो म्हणे. बायकांना मात्र तो सर्रास शिव्या देई. स्वत:च्या बायकोलाही तो शिव्या देई. श्री. वसुपाल बोके या मेकॅनिकल इंजिनिअरचा डिप्लोमा हे शिक्षण घेतलेल्या त्या गावातील तरुणाचा या गोष्टीवर विश्वास न बसल्यामुळे तो व त्याचे वडील हे दोघेही मळ्याकडे मुद्दाम या घटनेची शहानिशा करण्यासाठी गेले. त्यांनाही हा आवाज ऐकायला आला. प्रथम संशयवादी भूमिका घेणाऱ्या त्या दोघांनीही हा प्रकार सत्य असल्याचे मान्य केले. वसुपालला तर त्या आवाजाने 'काय वसुपाल!' अशी त्याच्या नावाने स्पष्ट हाकच मारली. इतकेच नव्हे तर त्याच्या समक्ष शेतमालकाच्या बायकोला त्याने अत्यंत गलिच्छ (न लिहिता येणारी) शिवीही दिली. तेव्हा तिनेही त्याला शिवी दिली. यावेळी वसुपालने त्याला 'तुला काय पाहिजे?' असे विचारले, तेव्हा 'मला सुशी पाहिजे' असे तो म्हणाला. वसुपाल म्हणाला, 'तू असा का फिरतोस?' तेव्हा तो म्हणाला, 'माझे दिवस घातले नाहीत.' वसुपाल म्हणाला 'म्हणजे काय?' तेव्हा तो म्हणाला, 'मी नागडा फिरत आहे.' * यानंतर त्याने शेतमालकाच्या बायकोचे नाव घेऊन पुन्हा गलिच्छ शिवी दिली.

विद्यासागर बोके या पी. यू. सी. दुसऱ्या वर्षापर्यंत शिक्षण झालेल्या एका तरुणाला तो शेतातून घराकडे 'यामा' मोटरसायकलीवरून यावयास निघाला असता (१० फेब्रु. १९९१ रोजीची ही घटना) 'विद्दू' अशी त्याने हाक मारली. विद्यासागर

---

* उपनिषदात अन्न वा पाणी नसलेल्या प्राणाला 'नागडा' म्हटले आहे. 'दिवस' न घातलेला (अन्नपाणी नसलेला) सुऱ्यापा नागडा होता असे या दृष्टीने म्हणावे लागते, पण हे उपनिषदातील ज्ञान त्याला कसे झाले? तो अशिक्षित होता आणि सर्वच सुशिक्षितांना हे ज्ञान नसते. कदाचित परलोकातील (मरणोत्तर जीवनाच्या पातळीवरील) ही Common parlance (रूढ भाषा) असावी व ती औपनिषदीय ऋषींना ज्ञात झाली असावी. (छांदो. उप. ५.२.१-२) मृताच्या पिंडदानाला बोलीभाषेत 'पाणी ठेवणे' म्हणतात.

म्हणतो, की 'त्याची व माझी तो हयात असताना कधीच गाठभेठ झालेली नव्हती. माझे नावही त्याला माहीत असण्याचे कारण नव्हते.' त्याच वेळी शेताकडे गेलेल्या मगदूम नावाच्या निवृत्त शाळामास्तराला 'काय मास्तर !' अशी त्याने हाक मारली. तेव्हा ते घाबरून विद्यासागरच्या मोटरसायकलीवर बसले व त्याला तावडतोब गावाकडे चलायला सांगितले. विद्यासागरने मोटरसायकल सुरू केली. तेव्हा तो आवाज म्हणाला, 'थांब, मी ही येतो.' ही वेळ संध्याकाळची होती व अंधार पडू लागल्यामुळे त्याने हेडलाइट लावला. पण तो एकदम डिम् (मंद) झाला असे तो म्हणतो. काही अंतर अशा मंद प्रकाशातच त्याने गाडी चालवली. थोड्या वेळानंतर प्रकाश आपोआपच 'फुल्ल' झाला असे तो म्हणतो.

वरील घटना घडली त्यावेळी प्रस्तुत लेखक त्याच रस्त्याला लागून असलेल्या सुताराच्या घरीच होता. तेथे बरेच लोक जमले होते. त्यावेळी मळ्यातील काही लोकांना त्याने 'भोजेचे सर आले आहेत' असे सांगितल्याचे त्यांनी मला सांगितले. हे त्याला कसे कळले असाही प्रश्न त्यांनी मला केला. तेव्हा पिशाच्चाला सर्व काही कळत असते असे मी त्यांना म्हणालो. आणि हे माझे म्हणणे खरे असल्याचे सिद्ध करण्यासाठीच जणू समोर लटकणारा विजेचा बल्ब फट् अशा आवाजानिशी एकदम फुटला व खाली पडला. या अचानक घडलेल्या घटनेने तेथे जमलेले लोक घाबरले. पण त्यांचे सांत्वन करण्यासाठी याचा पिशाच्चाशी काही संबंध नाही, बल्ब असे आपोआप फुटतात असे त्यांना म्हणालो. पण माझा हा युक्तिवाद सारवासारवीचा आहे असे त्यांना वाटल्याचे मला जाणवल्याशिवाय राहिले नाही. (भानामतीच्या हेरवाडच्या प्रकरणात असे वरचेवर बल्ब फुटत असल्याची नोंद मी केली असून ती 'विज्ञान व अंधश्रद्धानिर्मूलन' या पुस्तकाच्या प्रकरण ४ मध्ये पाहावी.)

या प्रकरणातील मयत सुरेंद्र सुतार याचे श्राद्ध खरोखरच घातले नव्हते, हे त्या आवाजाने सांगितल्यानंतरच सर्वांना कळले. इतर काही गोष्टी मात्र त्या आवाजाने सांगितल्या नसल्या तरी प्रस्तुत लेखकाला (व गावातील इतर लोकांनाही) त्या माहीत असून त्या प्रकट करणे योग्य होणार नाही. महाभारतादी ग्रंथातील आकाशवाणी खोटी नाही एवढेच आपल्याला येथे दाखवून द्यावयाचे आहे.

दुसरी अशा प्रकारची अशरीरी वाणीची घटना खुद्द प्रस्तुत लेखकाच्या गावी (भोज येथे) घडली असून तीही वरील घटनेप्रमाणे मळ्यातच घडली. महादेव रेंदाळे हा सत्तरीतील मनुष्य भगंदर रोगाने (anal fistula) १९९६ साली मे महिन्यात गावातील दवाखान्यात ॲडमिट झाल्यानंतर दोनच दिवसात मेला. हा रोग आपल्याला झाल्याचे लाजून त्याने कोणालाच सांगितले नव्हते. पण तो आटोक्याबाहेर गेल्यामुळे त्याला सांगणे भाग पडले. पण वेळ निघून गेली होती आणि व्हायचे तेच झाले. तो

मेल्यानंतर चौथ्या महिन्यात ऑगस्ट १९९६ मध्ये एके दिवशी संध्याकाळी साडेआठच्या सुमारास तो आपल्या घरात आपल्या लोकांशी अचानक बोलू लागला.

मयत महादेव रेंदाळेला चार मुलगे व एक मुलगी असून सर्वात लहान मुलगा (विशीतील तरुण) हाच फक्त लग्नाचा आहे. इतर मुलांची लग्ने झाली आहेत. दोन मुलगे इचलकरंजीत पॉवर मागावर कामाला असून ते तेथेच राहतात. दोघे शेती करीत असून त्यांचे घर शेतातच आहे. मयताची बायको भोज येथील मतिवाडे कुटुंबातील असून हे मतिवाडे कुटुंबही शेतातच आपली घरे बांधून राहिले आहे. ही मतिवाडे व रेंदाळे यांची घरे एकमेकांच्या शेजारीच आहेत.

ऑगस्ट महिन्यात रात्री साडेआठच्या सुमारास चंदू या मयत महादेवाच्या तिसऱ्या क्रमांकाच्या मुलाला स्वयंपाकघरात कोपऱ्यात एकदम प्रकाश दिसला आणि लगेच तेथूनच त्याच्या आईला, म्हणजे मयताची पत्नी श्रीमंती हिला उद्देशून पुढील शब्द ऐकायला आले, "तू इथून निघून जा. हे घर सोड." चंदूलाही उद्देशून तो आवाज म्हणाला, "चंद्या, हिला बाहेर काढ." घरातील लोक हे ऐकून एकदम घाबरले व घराबाहेर पळून आले. शेजारी राहत असलेला बाळू या नावाचा श्रीमंतीचा थोरला भाऊ (मयताचा मेहुणा) नंतर आवाज जेथून येत होता तेथे आला, तेव्हा "ये बाळू" असे त्याने त्याला उद्देशून हाक मारली. तेव्हा बाळू म्हणाला "तू कोण आहेस?" तो आवाज म्हणाला, "मी महादेव रेंदाळे. ओळखले नाहीस काय?" बाळू म्हणाला "तू इथे का आला आहेस?" या प्रश्नाला त्याने "माझ्या बायकोने मला शिळा भात वाढला" असे उत्तर दिले. यावर बाळूने "हे खोटे आहे" असे म्हणताच आवाज बंद झाला. तो पुन्हा आला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी श्रीमंतीचा अण्णू नावाचा दुसरा भाऊ (मयताचा दुसरा मेहुणा) त्या घरात आला, तेव्हा "ये आण्णू" असे म्हणून त्या आवाजाने त्याचे स्वागत केले, पुन्हा बायकोविषयी तीच तक्रार त्याने केली व पुन्हा तिला घर सोडून जायला सांगितले. हा आवाज नंतर घरातील सर्व ठिकाणांहून येऊ लागला. जनावराच्या गोठ्यात गेले तरी तेथेही यायचा. शेतात गेले तरी तेथेही तो आपल्या सुनांना व मुलांना हाक मारायचा. एकदा एक दीड मैल अंतरावर असलेल्या शेतातही तो आपल्या मुलाला बोलवू लागला. तो भिऊन दुसरीकडे गेला तरी तेथेही तो बोलू लागला. मात्र शेताची हद्द ओलांडल्यानंतर तो बंद झाला. त्याच्या बोलण्यात श्रीमंती (बायको) व चंदू यांना घर सोडण्याचाच आग्रह असे. एकदा तर पत्नीला त्याने "हे घर सोडून गेली नाहीस तर चौघांपैकी एक मुलगा खलास होईल" अशी धमकी घातली. तेव्हा चंदू घाबरून 'आपण इचलकरंजीला जाऊन राहू या' असे आईला म्हणू लागला. त्या दिवशी त्याला एक प्रकारची अनामिक भीती वाटू लागली. आणि म्हणून त्या दिवशी रात्री झोपताना एक खुरपे उशीजवळ ठेवून तो

झोपला. पण त्याला झोप काही लागेना. थोड्या वेळाने खोलीतील बल्ब - जो त्याने मुद्दाम लावून ठेवला होता आपोआप विझला. पुन्हा लागला. असे विझणे-लागणे हा खेळ सारखा सुरूच राहिला. विद्युत् प्रवाहातील दोषामुळे हे होत नव्हते हे बाहेरचे बल्ब असे विझत-लागत नव्हते यावरून स्पष्ट झाले. (शिवाय यापूर्वी व यानंतर असे कधी येथे घडले नाही.) हा प्रकार त्या आवाजाचा आहे, हे चंदूने ओळखले व तो अंथरूणातच उठून बसला. इतक्यात पलीकडच्या खोलीत ठेवलेले एक मोठे (ऊस तोडण्याचे) खुरपे एकदम तेथे आले व प्रथम त्याच्या छातीला व नंतर त्याच्या कपाळाला लागले व मोठी जखम होऊन मोठा रक्तस्राव होऊ लागला. त्याने आरडाओरडा करताच त्याला बुक्क्यांचा मार बसू लागला. त्याची बायकोही एव्हाना उठली होती. तिलाही गालावर इतक्या जोरात मार बसला की तिच्या कानातील मोत्याचे कर्णफूल त्या माराने तुटून पडले. तिच्या लहान मुलालाही मार बसला. या प्रकारामुळे त्या घरांत जो मोठा गोंधळ, आरडाओरड व गलका झाला तो ऐकून शेजारचे सर्व त्याचे नातेवाईक धावून आले. त्यांनी चंदूच्या जखमेवर प्राथमिक उपचार करून - पट्टी बांधून - घरातील सर्व माणसांना आपल्या घरी नेले. त्यानंतर चंदूच्या कुटुंबाने ते घर कायमचे सोडले. मयत महादेवाच्या दुसऱ्या क्रमांकाच्या मुलाच्या (चंदूच्या थोरल्या भावाच्या) जवळच्याच घरात ते जाऊन राहिले. पण नंतर तेथेही तो आवाज येऊ लागला. यावेळी दुसऱ्या क्रमांकाच्या मुलाच्या बायकोने (मयताच्या सुनेने) त्या आवाजाला विचारले की "तू तुझ्या बायकोला व मुलाला (चंदूला) तर त्रास देतोसच, पण सुनेला व लहान मुलाला मारण्याचे कारण काय?" तेव्हा "त्यांना चुकून लागले" असे त्या आवाजाने म्हटले. अशा रीतीने आदल्या दिवशीचा मारण्याचा प्रकार त्या आवाजानेच - म्हणजे मयत महादेवानेच - केला होता हे सिद्ध झाले. त्या खुरप्याच्या प्रकारावरूनही हे सिद्ध होते. चंदू म्हणतो की खुरपे मारत असलेले तर दिसत होते, पण मारणारा माणूस दिसत नव्हता. शिवाय पलीकडच्या खोलीतून त्याच्या झोपण्याच्या खोलीत खुरपे आपोआप कसे येईल, हाही प्रश्न होता. कारण ते पलीकडच्या खोलीत होते हे निश्चित; व उशाजवळ त्याने ठेवलेले खुरपे तर तेथेच होते. म्हणजे आता तेथे दोन खुरपी होती. शिवाय बुक्क्यांचा मार, लाईट बल्बचे लागणे-विझणे हा प्रकार - हेही सर्व अनाकलनीय होते.

मयत महादेवाची पत्नी त्याला म्हणाली, "येथे तू असा त्रास देणार असशील तर आम्ही हे ठिकाण सोडून परगावी जाऊन राहतो." तेव्हा त्याने आपल्या म्हणण्याची पुनरुक्ती करून म्हटले, "तीन महिने ही जागा सोडायला मी अगोदरच तुम्हाला सांगितले आहे, तेच पुन्हा सांगतो. तू तीन महिने येऊ नकोस." त्याची ही निकराची आज्ञा आहे हे ओळखून त्याच्या बायकोने ती पाळायची ठरवली व दुसऱ्याच दिवशी

इचलकरंजीस आपल्या थोरल्या मुलाकडे राहावयास गेली. चंदूही एका नातेवाइकाकडे परगावी जाऊन राहिला. पण इचलकरंजीत करमेना म्हणून मयताची पत्नी एका आठवड्याने परत आली. आलेल्या दिवशीच रात्री पुन्हा तो आवाज आला व त्याने तिला परत तीन महिने जाण्यास फर्मावले. ती घाबरून लगेच दुसऱ्या दिवशी - २३ ऑक्टोबर १९९६ रोजी - पुन्हा इचलकरंजीस गेली. पण चंदू एक महिन्यानंतर परत आला. तो आल्यानंतर पुन्हा आवाज येऊ लागला, आणि चंदू धीटपणे त्याला उत्तर देऊ लागला. तेव्हा त्या आवाजाने "तुला खलास करीन" अशी धमकी दिली. चंदू म्हणाला, "कसा करतोस पाहतो." तो आवाज म्हणाला, "तुला कसले तरी विचित्र रूप दाखवतो." हे ऐकून मयताची थोरली सून म्हणाली, "तू असा का फिरत आहेस?" तेव्हा तो म्हणाला, "मला वर अजून घेतले नाहीत." त्यावर सून म्हणाली, "पण म्हणून तू आम्हाला असा त्रास का देतोस? तुला तुझ्या मुला-बाळांची काही काळजी आहे की नाही? तुझ्या एका मुलाचे अजून लग्न व्हायचे आहे हे माहीत आहे ना? येथे असले प्रकार होतात हे ऐकून त्याला कोण मुलगी देतील?" यावर त्या आवाजाने उत्तर दिले, "मी आता त्रास देणार नाही." सुनेने विचारले, "हे कशावरून?" तेव्हा तो म्हणाला, "मल्लय्याची शपथ, त्रास देणार नाही." (मल्लय्या हे रेंदाळे कुटुंबाचे कुलदैवत आहे.)

हे संभाषण अमावास्येच्या तोंडावर झाले होते. तरीही घाबरून चंदूच्या जिवाला धोका आहे हे ओळखून अमावास्येच्या रात्री त्याचे दोघे मामा (बाळू व अण्णू) त्याच्या अंथरूणाजवळ रात्रभर जागत बसून राहिले, सुदैवाने त्या रात्री कसलाच प्रकार घडला नाही. त्यानंतर आवाजही आला नाही.

तीन महिने उलटल्यानंतर मयताची पत्नी इचलकरंजीहून आपल्या गावी २४ जाने १९९७ रोजी परत आली. दुसऱ्या दिवशी सर्वजण झोपले असता रात्री दहाच्या सुमारास आवाज आला. तो चंदूला म्हणाला, "चंद्या, तुझ्या खिशातले पैसे मी घेतले आहेत. इतर कुणाचा संशय घेशील." तेव्हा मयताची पत्नी म्हणाली, "तुला पैसे कशाला पाहिजेत?" यावर उत्तर आले की, "मला बिडीकाडीला पैसे नकोत काय?" पत्नी म्हणाली, "तुला दररोज एक बिडीचे बंडल देऊ, पण पैसे का घेतोस?" यावर आवाज आला नाही. आणि नंतर पुन्हा कधीच आला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी अंथरूणातून उठल्याबरोबर चंदूने आपल्या पँटच्या खिशात पैसे आहेत का हे पाहिले, तेव्हा त्याला दिसून आले की १३० रुपयापैकी खरोखरच १०० रुपयाची नोट नाहीशी झाली आहे. बाकीचे ३० रुपये मात्र तसेच होते. (दहाच्या तीन नोटा) यापूर्वीही एकदा त्याची ५० रुपयाची नोट नाहीशी झाली होती. पण आपणच कुठेतरी ती हरवली असे समजून तो गप्प होता. त्या ५० रु. च्या नोटेप्रमाणेच १०० रु. ची नोटही परत कधीच मिळाली नाही (भानामतीच्या

हेरवाडच्या प्रकरणातही अशाच प्रकारे पँटच्या खिशातून किंवा गुप्त ठिकाणी ठेवलेले पैसे गायब होण्याच्या प्रकाराची नोंद केली आहे. ('विज्ञान व अंधश्रद्धानिर्मूलन' प्रकरण ४ पाहा.)

भोज येथील अशरीरी आवाज मयताच्या कुटुंबियांनाच प्रामुख्याने ऐकायला आला असला तरी एकदा गावातील एक धनिक गृहस्थ श्री. अप्पासाहेब रामचंद्र चौगुले (मुरतले) हा प्रकार ऐकून शेताला जाताना (त्यांचे शेत मतिवाडे यांच्या शेताजवळच आहे.) चंदूच्या घरी आले असता "ये अप्पासाब" असे त्या आवाजाने त्याला बोलावले होते. तसेच बोरगांववाडी या गावच्या श्री. सुभाष खानूरे या मयत महादेवाच्या तरुण सुशिक्षित नातेवाइकाला हा प्रकार जेव्हा कळला तेव्हा त्याचा या गोष्टीवर विश्वास न बसल्यामुळे प्रत्यक्ष खात्री करून घेण्यासाठी मतिवाडे मळ्यात तो मुद्दाम आला, तेव्हा त्याचेही स्वागत "ये सुभाष" असे म्हणून त्याने केल्याचे ऐकून त्याचाही संशय नाहीसा झाला. इतकेच नव्हे तर इतरांशीही तो आवाज स्पष्ट बोलत होता हे स्वत: आपण ऐकल्यामुळे अशा गोष्टीवर विश्वास न ठेवणाऱ्या मला विश्वास ठेवावा लागला असे तो सुभाष आता ज्याला त्याला सांगत असतो. गळतग्याच्या सुरेंद्र सुताराप्रमाणे मयत महादेव वाटेल त्याच्याशी रानातून बोलत फिरत नव्हता हे खरे असले तरी घरातील लोकांशी तो अगदी खुलेपणाने बोलत असे. त्याच्या कुटुंबात एकदा अडचण निर्माण झाल्यावर 'काय करणे हिताचे आहे' याविषयी त्याने कुटुंबियांना एकदा सल्लाही दिला आहे. (एका विवाहित नातीचा सासरी छळ होत असल्याचे कळल्यावर घरात चाललेल्या चर्चेच्या वेळी त्याने हा सल्ला दिला होता.) एक लहान नात तर त्याच्याशी अगदी मनमोकळेपणाने गप्पा मारीत असे. कधी कधी "अज्जा तुला चहा पाहिजे काय?" असे म्हणून कोपऱ्यात चहाचा पेलाही नेऊन ठेवत असे. (तो प्याला जात नसे हे वेगळे.)

चंदूवर मयत बापाचा राग असण्याचे कारण तो दारू पीत होता हे होते. ज्या दिवशी त्याला खुरप्याने रक्तबंबाळ करण्यात आले त्या दिवशी तो दारू प्याला होता हे त्याच्या बायकोकडून प्रस्तुत लेखकाला कळले. (अर्थात् त्याच्या परोक्ष!) चंदूचे पैसे चोरून त्याने आपला हाच राग व्यक्त केला असे म्हणता येते. आपली पत्नी श्रीमंती हिच्याशी त्याचा कसला दावा होता हे मात्र कळू शकले नाही. शिळा भात आपण कधी चुकूनही नवऱ्याला वाढला नाही असे तिचे म्हणणे आहे.

सुजाण वाचकांच्या लक्षात आलेच असेल की गळतगा व भोज या दोन गावातील वरील दोन घटना-प्रकारामुळे (आत्म्याचे) मरणोत्तर अस्तित्व व अशरीरी वाणी या दोन्ही गोष्टी निर्णायकपणे सिद्ध होतात. मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करण्यासाठी तीन वैज्ञानिक कसोट्या आहेत. (या कसोट्या प्रसिद्ध अमेरिकन मानसशास्त्रज्ञ गार्डनर मर्फी यांनी सांगितल्या आहेत आणि त्या सर्वमान्य झाल्या आहेत.) त्या

अशा : (१) मृत व्यक्तीचे कोणत्या तरी भौतिक स्वरूपात प्रकटीकरण (Physical Manifestation) (उदा. दृक् वा श्राव्य स्वरूपात) (२) त्या व्यक्तीने सहेतुकपणे वागणे, बोलणे इत्यादी (Purposive Behaviour) आणि (३) प्रकटलेली विशिष्ट मृत व्यक्तीच आहे याची मागे जिवंत असलेल्यांना खात्री पटणे, किंवा तसा पुरावा आढळणे. (Proof of Identity) या तिन्ही कसोट्यांना वरील दोन्ही प्रकार शंभर टक्के उतरतात याची वाचकांना कल्पना आलीच असेल.

महाभारतादी ग्रंथातील अशरीरी वाणी वेगळी आहे, ती मृत व्यक्तीची म्हणता येत नाही असा येथे कोणी आक्षेप घेईल. पण असा आक्षेप घेता येत नाही. काही ठिकाणी मृत व्यक्तीच बोलल्याचे स्पष्ट म्हटले आहे. आणि जेथे असे स्पष्ट म्हटलेले नाही, तेथे ती वाणी मृत व्यक्तीची नाही असे म्हणण्यास, आधार नाही. **आदिपर्व** १२०.३३,३४ या ठिकाणी मेलेला नवराच बायकोला मुले कशी होतील हे अशरीरी वाणीने सांगतो. तसेच महाभारत **आदिपर्व** १२९.४८, १६६.४३ आणि **शांतिपर्व** ३३६.५२ इत्यादी ठिकाणी भूत, खेचर (पिशाच) यांची आकाशवाणी झाली असे स्पष्टच म्हटले आहे. तेव्हा हा आक्षेप अनाठायी आहे. तात्पर्य, महाभारतातील आकाशवाणी वैज्ञानिक कसोटीला पूर्णपणे उतरते. कोणालाही तिला भाकडकथा म्हणता येणार नाही.

**टीप :** पिशाच्चे एखाद्या जिवंत तरुण व्यक्तीला (विशेषत: स्त्रीला) 'धरतात' व खाण्यास मागतात असे बऱ्याच ठिकाणी आढळून आले आहे. त्यांनी मागितलेले पदार्थ दिले की ती त्या व्यक्तीला सोडतात असेही आढळून येते. वरील भोजेच्या प्रकरणातील रेंदाळेच्या पिशाच्चाने खाण्यास मागितले नसले तरी पत्नीने शिळा भात वाढल्याची तक्रार केली आहे. गळतग्याच्या सुताराच्या पिशाच्चाने 'दिवस घातले' नाहीत - (म्हणजे श्राद्धाचे अन्न दिले नाही) अशी तक्रार केली आहे. याच ग्रंथातील सहाव्या प्रकरणात कोंबडी, शिंदी इत्यादी मागणाऱ्या पिशाच्चाचे उदाहरण आले आहे. वरील भोजेच्या प्रकरणातील रेंदाळेच्या पिशाच्चाचा आवाज त्या गावच्या आप्पासाहेब चौगुले यांनी ऐकल्याचे कळल्यावरून मी त्यांची मुलाखत घेण्यासाठी त्यांच्याकडे गेलो असता, त्यांनी आपल्याच कुटुंबात आपल्याच पुतणीला धरलेल्या एका पिशाच्चाची माहिती सांगितली. तिला धरलेले पिशाच्च कोंबडीचे मटण मागत असे. चौगुले यांचे कुटुंब जैन असून ते कडक शाकाहारी आहे, त्यामुळे त्या कुटुंबाची मोठीच पंचाईत झाली. ते एका मांत्रिकाकडे गेले असता त्याने एक ताईत, लिंबू इत्यादी मंत्रून दिले व ते मुलीच्या दंडात बांधायला सांगितले. ते बांधल्यानंतर पिशाच्च गेले, म्हणून ते नंतर सोडले. पण ते सोडताच त्याने तिला पुन्हा धरले म्हणून पुन्हा बांधले. असे वरचेवर होऊ लागल्यामुळे त्या मांत्रिकाने पिशाच्च मागत असलेले अन्न देण्यास शेवटी त्यांना सांगितले. पण 'आम्ही जैन असून मटण वगैरे देणार नाही,' मात्र शाकाहारी अन्नपदार्थ वाटेल तितके देऊ' असे त्यांनी

पिशाच्चाला सांगितले त्याला ते कबूल झाले. नंतर भरपूर शाकाहारी अन्न तयार करून ते त्याच्यापुढे ठेवले. हे अन्न एक जनावर खाईल इतके होते असे सांगण्यात आले आहे. पण तेवढे अन्न त्या मुलीने (त्या पिशाच्चाने) फस्त केले! हा प्रकार पाहून सगळे थक्क झाले. तेवढे अन्न खाल्ल्यानंतर त्या मुलीला पिशाच्चाने सोडले. ती मुलगी शुद्धीवर आल्यावर तिला अंघोळ घालण्यात आली. अंघोळ करून ती मुलगी नेहमीप्रमाणे पुन्हा जेवली असेही सांगण्यात आले!

जैन धर्मात कुठल्याही चमत्कारावर विश्वास ठेवू नये अशी शिकवण दिली जाते. पण हे प्रकार स्वत:च्या डोळ्यांनी पाहिल्यामुळे आम्हाला त्यावर विश्वास ठेवल्यावाचून गत्यंतर नाही, असेही श्री. आप्पासाहेब शेवटी मला म्हणाले.*



* गळतग्याच्या सुताराच्या पिशाच्चाचा आवाज ऐकलेले श्री. वसुपाल बोके व त्यांचे वडील हेही जैनच असून त्यांना या संदर्भात मी विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देताना त्यांनीही असेच म्हटले होते.

## प्रकरण दहावे

# आपुले मरण पाहिले म्यां डोळां *

## नचिकेत उपाख्यानाचे वैज्ञानिक संशोधन

*सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥*

*- भगवद्गीता*

---

पाश्चात्य जगात - विशेषत: अमेरिकेत - एक नि:शब्द पण अभूतपूर्व क्रांती घडून येत आहे. या क्रांतीची तुलना आतापर्यंतच्या पाश्चात्य जगातील कोणत्याही सामाजिक, राजकीय, धार्मिक वा वैज्ञानिक क्रांतीशी करता येणार नाही. कारण ती या सर्व क्रांत्यांप्रमाणे मानवाच्या भौतिक जीवनाशी संबंधित नाही. ती त्याच्या आत्म्याशी संबंधित आहे. मानवाला सर्व धर्मांच्याही पलीकडे नेणारी ती क्रांती आहे; आणि म्हणून तिचा तोंडवळा भारतीय आहे. विशेष म्हणजे तिला शास्त्रज्ञांची मान्यता व पुरस्कार मिळाला आहे. कारण तिची बैठक वैज्ञानिक आहे. अशा रीतीने ती क्रांती एकाच वेळी आध्यात्मिकही आहे आणि वैज्ञानिकही आहे. म्हणून ती अभूतपूर्व आहे.

### हे नचिकेत उपाख्यान काय आहे?

कठोपनिषदातील नचिकेत-उपाख्यान प्रसिद्ध आहे. उद्दालकाचा मुलगा नचिकेत

---

* हा लेख पैलतीर (संपादक : मा. कृष्णा गुरव, कोल्हापूर) या दिवाळी १९९४ च्या वार्षिकात प्रसिद्ध झाला.

आपल्या विश्वजित यज्ञात ब्राह्मणांना भाकड व म्हाताऱ्या गायी दान देत असल्याचे पाहून 'बाबा, तुम्ही मला कोणाला दान देणार?' असा उपरोधिक - किंवा भाबडा म्हणा - प्रश्न विचारतो. बापाचे उत्तर न आल्यामुळे तो हा प्रश्न तीन वेळा विचारतो. तिसऱ्या वेळी त्याचा बाप रागाने, 'जा, तुला मृत्यूला दान देतो' असे उत्तर देतो. आणि बापाचा शब्द खरा करण्यासाठी नचिकेत अक्षरश: 'मृत्यू'कडे जातो - म्हणजे मृत्युदेवता सूर्यपुत्र यम याच्या 'घरी' जातो आणि त्याच्याकडून ब्रह्मविद्या संपादन करून परत येतो, अशी ती कथा आहे.

ही कथा ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात प्रथम संक्षेपात आली आहे. तिचा विस्तार नंतरच्या कालातील तैत्तिरीय ब्राह्मण ग्रंथात केलेला आढळतो. तीच कथा पुन्हा कठोपनिषदात आली आहे. पण कठोपनिषदात त्या कथेवर तत्त्वज्ञानाचा बराच साज चढविलेला आहे. (हेच तत्वज्ञान भगवद्‌गीतेत श्रीकृष्णाने 'सांख्ययोग' या नावाने सांगितले आहे.) ऋग्वेद कालापासून उपनिषदे व गीता यांच्या कालापर्यंत, म्हणजे हजारो वर्षे या गीतेचे तत्वज्ञान सांगणाऱ्या कथेने भारतीय मनाची पकड घेतली आहे, असे यावरून स्पष्ट दिसते. म्हणून ही केवळ कथा नसून खरोखर उपाख्यान (वृत्तांत) आहे, म्हणजे घडलेल्या घटनेचे वर्णन आहे, असे मानावे लागते.

## यमभेटीची घटना खरी कशावरून मानायची?

नचिकेत उपाख्यान म्हणजे प्रत्यक्ष घडलेल्या घटनेचे वर्णन असेल तर ते खरे कसे मानायचे, असा येथे साहजिकच प्रश्न निर्माण होतो. काही वर्षांपूर्वी असा प्रश्न उपस्थित करणे स्वाभाविक ठरले असते. पण आता असा प्रश्न उपस्थित करणे तितकेसे समंजस ठरत नाही, असे पाश्चात्य देशात घडून येत असलेल्या घटनांवरून म्हणावे लागते. याचा अर्थ 'मृत्युदेवता' म्हणून कोणी आहे आणि तिच्या 'घरी' जाऊन ज्ञान संपादन करून परत येणे शक्य आहे असा करायचा काय? याचे उत्तर 'होय' असे आता द्यावे लागते! कारण पाश्चात्य देशात बरेच जण 'मृत्युदेवते'च्या 'घरी' जाऊन खरोखरच ज्ञान संपादन करून परत आले आहेत! विशेष म्हणजे या लोकांत नचिकेताप्रमाणे लहान मुलेही आहेत !

येथे पहिला प्रश्न असा, की याला पुरावा काय? आणि दुसरा प्रश्न असा की हे प्रकरण पाश्चात्य देशात आताच-अलीकडेच-कसे घडून आले? पुराव्याचा सविस्तर विचार हाच या लेखाचा मुख्य विषय असल्याने त्याचा विचार आपण करणारच आहोत. पण अलीकडेच हे प्रकरण पाश्चात्य देशात का घडले याचा प्रथम थोडा विचार केला पाहिजे. वस्तुत: हे प्रकरण अलीकडेच घडले आहे असे काही निश्चित म्हणता येत नाही. (मात्र अलीकडे ते वाढत आहे एवढे खरे आणि ते का

वाढत आहे याचा विचार नंतर करू.) पूर्वीपासून ते घडत असलेच पाहिजे यात संशय नाही. पण आपण 'यमा'कडे जाऊन आलो आणि अमुक तमुक शिकलो असे सांगण्याचे धैर्य लोक आपल्याला वेड्यात काढतील या भीतीने, कोणाला यापूर्वी झाले नाही. त्यामुळे ऋग्वेद कालापासून, म्हणजे हजारो वर्षांपूर्वीपासून, जे ज्ञान भारतीयांना झाले होते ते ज्ञान पाश्चात्यांना अगदी अलीकडे म्हणजे केवळ वीस वर्षांपूर्वी झाले आहे. पाश्चात्यांनी या प्रकरणाचे वैज्ञानिक संशोधन करायला सुरुवात केल्याला तर केवळ एक तप लोटले आहे. आणि या शास्त्रीय संशोधनाच्या तपाचे, तपश्चर्येचे फळ म्हणून पाश्चात्य जगात आध्यात्मिक क्रांतीच्या पाऊलखुणा हल्ली जाणत्या लोकांना थोड्याबहुत दिसू लागल्या आहेत.

पण आपण वेडे ठरविले जाऊ, या भीतीने जे धाडस यापूर्वी कोणाला झाले नाही ते आताच आणि कोणी कसे केले बरे?

हे समजण्यासाठी या प्रकरणाचा थोडा इतिहास सांगितला पाहिजे.

## 'यमा'पासून ज्ञान मिळविणारा पहिला ज्ञात पाश्चात्य 'नचिकेत' : डॉ. रित्शी

डिसेंबर १९४३ सालची गोष्ट. अमेरिकेतील टेक्सास प्रांतातील अबीलिन या गावाजवळील अमेरिकन लष्करी तळावर वीस वर्षांचा जॉर्ज रित्शी नावाचा एक 'प्रायव्हेट' सैनिक होता. त्याला २० डिसेंबर रोजी रिचमंड प्रांतातील 'मेडिकल कॉलेज ऑफ व्हर्जीनिया' येथे वैद्यकीय शिक्षणक्रम पूर्ण करण्यासाठी पाठविण्यात येणार होते. पण तिकडे जाण्याच्या काही दिवस अगोदर तो न्युमोनियाने अचानक आजारी पडला आणि त्याला लष्करी इस्पितळात दाखल करण्यात आले. तेथे त्याची प्रकृती एकदम ढासळली. त्याचा ताप १०६.५ डिग्री इतका वाढला व चोवीस तासांनी तो मेल्याचे डॉक्टर्सनी जाहीर केले. यानंतर नऊ मिनिटांनी इस्पितळातील वॉर्ड बॉयला रित्शी किंचित् हालल्याचा भास झाला. म्हणून त्याने डॉक्टर्सना कळविले. त्यांनी पुन्हा रित्शीची तपासणी केली व तो मेला असल्याचे पुन्हा घोषित केले. तथापि, उपचार म्हणून त्यांनी अड्रेनालिनचे एक इंजेक्शन थेट त्याच्या हृदयाच्या स्नायूत दिले; आणि आश्चर्यकारकरित्या त्याचे हृदय पुन्हा कार्य करू लागले. रित्शी जिवंत झाला, पण मग मेलेला रित्शी नऊ मिनिटे कुठे होता, असा प्रश्न निर्माण होतो.

तो म्हणतो, "मी खाटेवर उठून बसलो. मला वैद्यकीय शिक्षणक्रमासाठी रिचमंडला जायचे होते. म्हणून मी माझा गणवेष शोधू लागलो. सहज माझे लक्ष खाटेवर पडलेल्या माझ्या शरीराकडे गेले. पण त्याचा विचार करण्यास मला सवड नव्हती. मी एकदम आकाशमार्गाने निघालो आणि एका शहरात आलो. तेथे रात्रभर

उघडे असणारे एक उपाहारगृह (ऑल नाइट कॅफे) मला दिसले; मी तेथे उतरलो. जवळून एक माणूस चालला होता. त्याला मी हटकले व हे शहर कोणते असे विचारले, पण त्याला माझे ऐकू आले नाही. म्हणून मी त्याला हातांनी धरले. पण मला धरता आले नाही. त्याच्या शरीरातून मी आरपार गेलो. (या घटनेनंतर एक वर्षाने मी त्याच शहरातून जात असता ड्रायव्हरला म्हणालो की आणखी एक ब्लॉक आपण पुढे गेलो की आपल्याला रात्रभर उघडे असणारे उपाहारगृह लागेल; आणि तसे ते खरोखरच आम्हाला लागले. ते शहर होते मिसिसिपी प्रांतातले व्हिक्सबर्ग!) नंतर माझ्या लक्षात आले, की आपण मेलेलो असून आपले शरीर तिकडे खाटेवर पडले आहे. म्हणून मी परत लष्करी तळाकडे वेगाने निघालो. तेथे अनेक सैनिकांची शरीरे चादरीखाली होती. त्यापैकी कोणते शरीर माझे हे मी शोधू लागलो. तेव्हा चादरीबाहेर एक हात दिसला. त्या हाताच्या बोटातील अंगठीवरून मी हेच माझे शरीर हे ओळखले. पण याच वेळी मला एक दिव्य व्यक्ती (प्रकाश-अस्तित्व) भेटली. त्या व्यक्तीपासून मला जो दिलासा, प्रेम, स्वीकृती मिळाली त्याचे वर्णन शब्दात करणे शक्य नाही. त्या व्यक्तीने मला माझ्या जन्मापासून मी अनुभवलेल्या सर्व घटनांचा, मी केलेल्या सर्व कृतींचा धावता देखावा दाखवला. त्यात मी अंधारात केलेल्या सर्व बऱ्यावाईट गोष्टीसुद्धा होत्या, आणि त्या व्यक्तीपासून त्या लपून राहू शकत नव्हत्या. अगदी बारीक सारीक कृतीसुद्धा! त्या व्यक्तीने मला विचारले की, 'जन्माला येऊन तू हेच केलेस काय? आपल्या जन्माचे तू काय सार्थक केलेस बरे?' मी त्या व्यक्तीला मी केलेल्या काही पराक्रमाच्या गोष्टी सांगितल्या. तिने मान हालवली. तिच्या दृष्टीने लौकिक मोठेपणाला काडीचीही किंमत नव्हती आणि मग मला त्या व्यक्तीने (खरे ज्ञान देण्यासाठी) अनेक लोकांतून फिरविले.''

नंतर रित्शीने आपण काय काय पाहिले याचे सविस्तर वर्णन केले. आपण जे काही पाहिले त्याचे वर्णन तो 'ज्ञानदान करणारी केंद्रे' (Centres of Learning) असे करतो. आपण या पृथ्वीवर जे शिकतो ते प्राथमिक शाळेतील ज्ञानासारखे आहे. त्याच्यापुढचे ज्ञान जसे आपल्याला हायस्कूल व कॉलेजमधून मिळते, तसे आहे असे म्हणून रित्शी तीन लोकांतून (Realms) आपल्याला त्या व्यक्तीने कसे कसे फिरवून माहिती दिली हे त्या त्या लोकाचे वर्णन करून सांगतो.

हे सर्व त्याने केवळ नऊ मिनिटात अनुभवले असले पाहिजे हे उघड आहे. कारण नऊ मिनिटांनी इंजेक्शनने त्याच्या हृदयाची क्रिया सुरू झाली व तो परत शरीरात आला. मात्र हा आपला अनुभव त्याने दहा वर्षे आपली पत्नी व सावत्र आई यांच्याखेरीज कुणालाही सांगितला नाही. त्यांचाही त्याच्यावर प्रथम विश्वास बसला नाही. पुढे १९५३ साली रित्शीला 'लाईफ' या मासिकात अणुशक्तीवर चालणाऱ्या

'नॉटिलस' या पाणबुडीचे चित्र सहज पाहावयास मिळाले, आणि तो आश्चर्यचकित झाला. कारण त्या पाणबुडीचे 'कंट्रोल पॅनेल' (पाणबुडीवर नियंत्रण ठेवण्यासाठी असलेली यंत्रचौकट) म्हणजे त्याला त्या प्रकाश-व्यक्तीने 'तिसऱ्या लोकात' दहा वर्षांपूर्वी दाखविलेलेच 'कंट्रोल पॅनेल' होते ! दहा वर्षांपूर्वी (त्याने ते पाहिले त्यावेळी) अणुशक्तीवर पाणबुडी चालवता येते हेसुद्धा पृथ्वीवरील शास्त्रज्ञांना माहीत नव्हते. आणि मग न राहवून त्याने आपला हा अनुभव इतरांना सांगितला. यावेळी तो वैद्यकीय शिक्षणक्रम पूर्ण करून मानसोपचार तज्ज्ञ 'डॉक्टर रित्शी' झाला होता. तरीही आपल्या अनुभवाच्या सत्यतेची प्रचिती आल्यामुळे त्याने आपल्या या जगावेगळ्या अनुभवाचा गौप्यस्फोट केला.

तो त्याचा अनुभव व्हर्जीनिया युनिव्हर्सिटीतील तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक जॉन मार्शल याला कळला. त्याने आपल्या वर्गात व्याख्यानाच्या ओघात एकदा आपल्या तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यांना तो सांगितला. त्या विद्यार्थ्यांत रेमंड मूडी (ज्युनिअर) नावाचा एक विद्यार्थी होता. हा अनुभव ऐकून त्याचे कुतूहल जागृत झाले. त्याने प्रत्यक्ष डॉ. रित्शीची भेट घेऊन सर्व हकीगत त्याच्या तोंडून ऐकली, आणि असे अनुभव इतर कोणाला आले आहेत काय याचा शोध घेण्यास प्रारंभ केला. हे करीत असतानाच त्याने तत्त्वज्ञानाचा शिक्षणक्रम पूर्ण करून त्याविषयात पीएच्. डी. मिळविली, नंतर व्यवसाय सुरू केला. या अवधीत त्याला रित्शीसारखा अनुभव आलेले दीडशे लोक भेटले ! हे सर्व लोक वैद्यकशास्त्राच्या दृष्टीने मेले होते. (clinically dead) म्हणजे वैद्यकीय उपचार त्यांच्यावर वेळीच केले नसते तर ते कायमचे मेले असते. पण तो उपचार तातडीने केल्यामुळे ते परत जिवंत झाले होते. अशा लोकांच्या अनुभवांचे संकलन करून रेमंड मूडीने १९७५ साली 'Life After Life' नावाचे पुस्तक लिहिले, आणि पाश्चात्य जगात एकच खळबळ उडाली. अल्पावधीत या पुस्तकाच्या लाखो प्रती खपल्या. जगातील ३० भाषांतून त्याची भाषांतरे झाली आणि रेमंड मूडी आंतरराष्ट्रीय क्षितिजावरील एक नवा तारा बनला. त्याच्या पुस्तकामुळे पाश्चात्य जगावर एक नव्या ज्ञानाचा स्फोट झाला होता.

## एका जीवनावर दुसरे जीवन (Life After Life)

रेमंड मूडी याने आपल्या पुस्तकाचे नाव Life After Life (एका जीवनानंतर दुसरे जीवन) असे ठेवले, याचे कारण माणूस मेल्यानंतर पूर्णपणे नाहीसा होतो, संपतो अशी जी सार्वत्रिक समजूत प्रचलित होती, त्या समजुतीला या दीडशे लोकांच्या अनुभवाने धक्का दिला होता. माणूस मरतो म्हणजे संपतो असे नाही, तर एक जीवनक्रम संपवून दुसऱ्या जीवनक्रमास तो प्रारंभ करतो. मृत्यूमुळे त्याची जाणीव नष्ट होत नाही, त्याची स्मृती नष्ट होत नाही, त्याचे व्यक्तित्व नष्ट होत

नाही, तर तो फक्त आपल्या शरीरापासून विभक्त होतो, विमुक्त होतो व पृथ्वीवरील जड पातळीवरून निघून जाऊन दुसऱ्या एका अदृश्य लोकांच्या पातळीवर तो आपले जीवन सुरू करतो, असे या दीडशे लोकांच्या अनुभवावरून मूडीला दिसून आले. हे मृत्यूनंतरचे जीवन कसे असते याचा थोडा अनुभव या दीडशे लोकांनी घेतला होता. कारण ते सारे लोक वैद्यकशास्त्राच्या दृष्टीने मेले होते. पण डॉक्टर्सनी अत्याधुनिक वैद्यकीय साधनांनी त्यांची बंद पडलेल्या हृदयाची क्रिया पुन्हा कृत्रिमपणे सुरू केल्यामुळे ते पुन्हा जिवंत झाले होते. परत आपल्या शरीरात आले होते.* ते आपल्या शरीरात परत आले असल्यामुळे त्यांना 'मृतात्मे' म्हणता येत नव्हते. म्हणून त्यांच्या अनुभवांना 'मृतात्म्यांचे अनुभव' न म्हणता 'मृत्युसामिप्य अनुभव' किंवा 'मृत्युसमीपवर्ती अनुभव' (Near Death Experience किंवा NDE ) असे नाव मूडीने दिले. तेच नाव आता अशा अनुभवासाठी रूढ झाले आहे. त्याचे मराठीत सुटसुटीत भाषांतर 'मरणानुभव' असे करता येईल. या दीडशे लोकांना आलेले मरणानुभव रित्शीला आलेल्या अनुभवासारखेच असून ही सारखेपणाची वस्तुस्थिती मूडीने एका वस्तुनिष्ठ शास्त्रीय सत्याचा शोध लावल्याची आहे; आणि त्यामुळेच शास्त्रीय जगात खळबळ उडाली.

डॉ. रित्शीला व या दीडशे लोकांना आलेल्या मरणानुभवाची मुख्य लक्षणे अकरा असून ती पुढीलप्रमाणे स्थूलमानाने सांगता येतील.

## मरणानुभवाची मुख्य लक्षणे

**१. शांतीचा अनुभव :** व्यक्ती असह्य वेदनांनी तळमळत असेल तर त्या सर्व वेदना एकदम नाहीशा होतात. शांतीचा अननुभूत आनंद अनुभवायला मिळतो. या आनंदाचा अनुभव शब्दात वर्णन करता येत नसल्याचे बहुतेकजण सांगतात.

---

* श्वासोच्छ्वास क्रिया व हृदयक्रियेमुळे होणारा रक्त-पुरवठा यांच्यामुळे मेंदूला सतत प्राणवायू मिळतो. या क्रिया बंद पडून मेंदूला होणारा प्राणवायूचा हा पुरवठा पाच मिनिटापर्यंत जर बंद झाला तर मेंदूत अपरिवर्तनीय बदल घडून येऊन मेंदूचा व पर्यायाने त्या व्यक्तीचा मृत्यू होतो, असा वैद्यकशास्त्राचा सिद्धांत आहे. म्हणून मेंदूचा मृत्यू हा त्या व्यक्तीचा मृत्यू मानण्यात येतो. मेंदूचा मृत्यू झाल्याचे मेंदूची विद्युत् प्रक्रिया नोंद करणाऱ्या 'इलेक्ट्रो एन्सेफेलो ग्राफ्' या यंत्रावरील सपाट (flat) आलेखावरून निश्चित करता येते. मेंदूचा वैद्यकशास्त्रदृष्ट्या मृत्यू दर्शविणाऱ्या या सपाट आलेखानंतर सुद्धा म्हणजे प्राणवायूचा पुरवठा बंद झाल्यानंतर जिवंत राहण्याची वैद्यकशास्त्राची निर्धारित पाच मिनिटांची मर्यादा ओलांडल्यानंतरसुद्धा, कित्येक मिनिटांनी माणूस परत जिवंत झाल्याची अनेक उदाहरणे आहेत. त्यामुळे वैद्यकशास्त्राला मृत्यूची प्रक्रिया अजून पूर्ण कळलेली नाही, किंवा जैविक प्रक्रियांचे पूर्ण आकलन त्याला अजून झालेले नाही असे म्हणावे लागते.

**२. देहविमुक्तीचा अनुभव :** आपण आपल्या शरीरापासून सुटे झालो आहो याची त्या व्यक्तीला जाणीव होते. तथापि, आपणाला हातपाय असल्याचे अनेक जण सांगतात. पण ते कसले हे त्यांना सांगता येत नाही. मात्र आपले हे शरीर प्रकाशयुक्त असल्याचे ते म्हणतात. पृथ्वीवर सोडलेल्या भौतिक शरीराबद्दल, ते शरीर अपघातात भयंकर जखमी झाले असेल तर, कीव वाटते, पण वाईट वाटत नाही असे त्यांचे म्हणणे असते.

**३. मेल्याची जाणीव :** आपण मेलो असल्याची यावेळी त्या व्यक्तीला जाणीव होते. आपल्या शरीराला डॉक्टर लोक पुन्हा जिवंत करीत असल्याचे ती व्यक्ती पाहते.

**४. परत शरीरात येण्याची अनिच्छा :** पण त्या व्यक्तीला परत शरीरात येणाची व मिळालेली शांती व आनंद गमावण्याची इच्छा नसते. म्हणून ती व्यक्ती डॉक्टर लोकांना आपले शरीर पुन्हा जिवंत करण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते. पण त्याला यश येत नाही. कारण डॉक्टर, नर्स इत्यादी लोकांचे बोलणे तिला ऐकायला येत असले तरी तिचे बोलणे त्यांना ऐकायला येत नाही, हातानी त्यांचे हात धरायला गेले तर तिचे हात त्यांच्या शरीरातून आरपार जातात, असे त्या व्यक्तीला आढळून येते.

**५. अंधाराचा अनुभव :** आपण काळोखातून किंवा अंधाऱ्या बोगद्यातून जात आहो असे त्या व्यक्तीला दिसते.

**६. प्रकाश-व्यक्तीचा अनुभव** : काळोखाच्या किंवा बोगद्याच्या शेवटी त्या व्यक्तीला एक दिव्य वा तेज:पुंज व्यक्ती भेटते. त्या व्यक्तीचे वर्णन बहुतेकांनी 'परमेश्वर' असे केले आहे. काहींना तो येशू असावा असे वाटले. अनेकांनी तिला 'प्रकाश-व्यक्ती' वा 'अस्तित्व' (Being of Light) असेच फक्त म्हटले आहे. ती व्यक्ती कोण असावी याचा विचार करण्याच्या भानगडीत ते पडले नाहीत. मात्र त्या व्यक्तीच्या सान्निध्यात आपणाला प्रेम व आनंदाचा जो लाभ झाला तो शब्दातीत आहे, असे सर्वांनी म्हटले आहे. (काहींनी तैत्तिरीय उपनिषदातील ब्रह्मानंदाचे वर्णन करताना वापरलेली गणिताची भाषा अक्षरश: या आनंदाचे वर्णन करताना वापरल्याचे आढळून येते.) असे प्रेम पृथ्वीवर कोठेच मिळाले नाही, असे बहुतेकजण म्हणतात.

**७. जीवनाचा चित्रपट :** त्या प्रकाश-व्यक्तीच्या सान्निध्यात आपल्या गत जीवनाचा चित्रपट नजरेसमोरून जात असल्याचे त्या व्यक्तीला दिसते. काहीजण परत संपूर्ण जीवन सर्व तपशीलासह पुन्हा जगल्याचा अनुभव घेतात. ती 'प्रकाश-व्यक्ती' जीवनाचे काय सार्थक केलेस, असे त्या व्यक्तीला विचारते. त्याचे उत्तर देताना आपल्या जीवनात आपण किती व कोणकोणती बरीवाईट कृत्ये केली व त्याचे कुणाकुणावर व काय काय बरे वाईट परिणाम झाले, हे ती व्यक्ती प्रथमच

पाहते; आणि त्यामुळे तिला स्वत:विषयीची खरी जाण (Self-understanding) होते.

**८. दुसऱ्या लोकात जाणे :** आपण एका निराळ्या लोकात नेले जात आहो हे ती व्यक्ती पाहते. हा लोक अत्यंत सुंदर असून तो स्वर्गच असावा असे बऱ्याच जणांचे म्हणणे पडते. (काही तुरळक लोकांना भयानक अंधाऱ्या लोकाचे व विचित्र व भयानक व्यक्तींचेही दर्शन झाले आहे. 'असूर्या नाम ते लोका: अंधेन तमसावृता:' हे ईशोपनिषद्‌चे त्या लोकाचे वर्णन या दृष्टीने अर्थपूर्ण वाटते.)

**९. इतर आप्त व मित्रांच्या भेटी :** या लोकात पूर्वी मेलेले त्या व्यक्तीचे अनेक आप्त व मित्र तिला भेटतात. ते खुणेने 'इकडे येऊ नकोस' किंवा शब्दांनी 'तुझी इकडे येण्याची वेळ अजून आलेली नाही' असे तिला सांगतात. ती 'प्रकाश-व्यक्ती' मात्र परत जाण्यास अथवा तेथे राहण्यास त्या व्यक्तीला स्वातंत्र्य देते.

**१०.** या लोकात नदी, ओढा, कुंपण यासारखी एखादी सीमा त्या व्यक्तीला दिसते. पण काहींना ती दिसत नाही.

**११. परत शरीरात येणे :** ती व्यक्ती आपण आपल्या शरीरात परत ओढलो गेलो हे पाहते. काहीजण आपल्या पृथ्वीवरील आप्तांच्या ओढीने किंवा कर्तव्यभावनेने परत आलो असे सांगतात.

## मरणानुभव्यांच्या दृष्टीने मरणोत्तर जग भौतिक जगापेक्षा जास्त खरे

वरील सर्व लक्षणांना एखाद्या सूत्राप्रमाणे गोवणाऱ्या दोन गोष्टींचा अनुभव मात्र सर्वांना न चुकता येतो. त्या दोन गोष्टी म्हणजे एक, पृथ्वीवरील स्थळकाळाची कल्पना चुकीची असल्याची तीव्र जाणीव व दुसरी, खरे जग मरणानंतरच अनुभवायला मिळते हा शोध. मरणोत्तर जगात भौतिक जगाच्या काळाला अर्थ नसल्याचे सर्व मरणानुभव्यांच्या अनुभवाला येते. त्यामुळे पृथ्वीवरील एक मिनिट मरणोत्तर जगात दहा वर्षांच्या (किंवा आपण समजाल तितक्या वर्षांच्या) बरोबरीने असू शकतो. किंबहुना ही तुलनाच अनाठायी आहे. कारण तेथे कालगणनाच नाही. (नऊ मिनिटात रित्शी तीन लोक कसा फिरून आला याचे यामुळे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.) स्थळाची पृथ्वीवरील कल्पनाही येथे लागू होत नाही, त्यामुळे हे मरणोत्तर जग कुठे आहे या प्रश्नाला अर्थ नाही.

त्यामुळे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे नाही. मनात येण्याचा अवकाश, ती व्यक्ती तेथे हजर. दुसरी गोष्ट, मरणानुभव्यांना आपले मरणोत्तर जगच जास्त खरे वाटते. (त्याच्या उलट आम्हा पृथ्वीवासीयांना हे भौतिक जगच खरे व मरणोत्तर जग खोटे वाटते!) त्यांना मरणोत्तर जग भौतिक जगापेक्षा जास्त वास्तव वाटण्यास मात्र सबळ कारणे आहेत; आणि ती सर्व शास्त्रीय आहेत.

पहिले कारण, त्यांना मिळालेली शांती ही खरी शांती असते. (त्यामुळेच ते परत शरीरात येऊ इच्छित नाहीत. उलट पृथ्वीवरील माणसे जास्त वेळ अशांतच असतात व हे शरीर आत्महत्या करून सोडण्याचे बहुतेकांचे तेच कारण असते. त्याच्या उलट परिस्थिती मरणोत्तर जगात असते. एका डॉक्टरला त्याच्या डॉक्टर मित्राने त्याचे हृदयरोगात हार्ट अॅटॅकने बंद पडलेले हृदय इलेक्ट्रिक शॉक देऊन परत सुरू करून त्याला पुन्हा जिवंत केले, तेव्हा तो आपल्या शरीरात आलेला डॉक्टर आपल्या डॉक्टर मित्रावर आपल्याला जिवंत केल्याबद्दल एकदम खेकसला. 'पुन्हा असला उद्योग करू नकोस' असे त्याला त्याने बजावले. नंतर मात्र त्याने त्याबद्दल त्याची माफी मागितली व 'मरणोत्तर मिळालेली 'शांती' नाहीशी झाल्यामुळे मला तसा राग आला' असा त्याने खुलासा केला.)

दुसरे शास्त्रीय कारण, मेलेली व्यक्ती भौतिक जगातील माणसांच्या शरीरातून वा भिंतीतून सहज आरपार जाऊ शकते. त्यामुळे हे भौतिक जग काही खरे नाही असे तिला वाटते. (आधुनिक भौतिक विज्ञानानेच या कल्पनेला शास्त्रीयदृष्ट्या आता पुष्टी दिली असल्यामुळे मरणोत्तर व्यक्तीच्या या कल्पनेविषयी आता वाद करण्याचे कारणच नाही.)

तिसरे कारण, देह विमुक्तीनंतर त्या व्यक्तीला आपल्या जीवनातील सर्व घटना, प्रत्येक सेकंद कसा घालवला, हे आपल्या 'जीवन चित्रपटाच्या' (Life review) रूपाने दिसते व आठवते. याचा अर्थ 'खरी स्मृती' देह विमुक्तीनंतरच येते असा होतो, या दृष्टीने मेंदू हा स्मृतीला सहाय्यक नसून अडथळा आहे असे ठरते. शरीरात असतानाच मनुष्य विसरतो, शरीर सोडल्यावर विसरलेल्या पण अनुभवलेल्या सर्व गोष्टी तो आठवतो, यावरून 'खरी स्मृती' मेंदूवर अवलंबून नाही हे स्पष्ट होते. म्हणून ज्यामुळे व्यक्तीला 'खरी वा सर्वंकष (total) स्मृती' लाभते ती मरणोत्तर (देह व मेंदूविरहीत) अवस्थाच खरी मानावी लागते. मेंदू हे खोट्या (भौतिक) जगात चालणारे खोटे नाणे आहे. खऱ्या (मरणोत्तर) जगात ते चालत नाही, असा याचा अर्थ होतो. (मरणानुभव्याला भौतिक जग मरणोत्तर जगाच्या तुलनेत 'खोटे' वाटत असेल तर भौतिक मेंदू 'खोटा' म्हणण्यात कसलीच आपत्ती नाही.)

## या अनुभवांची बुद्धिवादी उपपत्ती देता येते काय?

या अनुभवांची बुद्धिवादी दृष्टिकोणातून-रूढ विज्ञान पद्धतीने अनेकांनी उपपत्ती देण्याचा प्रयत्न केला आहे. पण या अनुभवांची उपपत्ती देण्यास रूढ विज्ञानपद्धत (बुद्धिवाद) अत्यंत अपुरा पडला आहे. कोणत्याही रूढ ज्ञात मार्गाने या अनुभवांची उपपत्ती देण्यास आजपर्यंत कोणालाही यश आलेले नाही. तथापि, अशा

काही प्रयत्नांचा येथे थोडक्यात परामर्ष घेणे अप्रस्तुत ठरणार नाही. या सर्व प्रयत्नांचा रोख हे अनुभव खरे नाहीत हे दाखवून देण्याकडे आहे.

रेमंड मूडीचे पुस्तक प्रसिद्ध झाले तेव्हा ते सर्व अनुभव प्रौढांना आलेले असल्यामुळे हा संस्काराचा - माणसाच्या मनावर झालेल्या (धार्मिक इ.) शिकवणुकीचा - परिणाम आहे, लहान मुलांना असे अनुभव आलेले नाहीत, यावरून हे स्पष्ट आहे, असा युक्तिवाद करण्यात आला. पण नंतर मेलव्हिन मोर्स या बालरोगतज्ज्ञ डॉक्टरला पाण्यात बुडून 'मेलेल्या' एका सात वर्षाच्या मुलीला नेमके असेच अनुभव आल्याचे आढळून आले; आणि मग त्याने अशा अनेक मरणानुभव घेतलेल्या लहान मुलांना शोधून त्यांना बोलते केले. त्या सर्वांनाही असेच अनुभव आल्याचे त्याला आढळून आले. (काळोख किंवा बोगदा, प्रकाश-व्यक्ती, जीवन चित्रपट, स्वर्गात प्रवेश, पूर्वी मेलेल्या लोकांच्या भेटी इत्यादी गोष्टी या लहान मुलांच्याही अनुभवाला आल्या होत्या. पण त्यांनी आपला हा अनुभव कुणालाही सांगितला नव्हता. आपल्याजवळच ठेवला होता.) एक - दोन वर्षाच्या मुलांनाही - ज्यांच्यावर कसलेच संस्कार होणे शक्य नाही अशांनाही - असेच अनुभव आल्याचे आढळून आले आहे. यावरून हे अनुभव वस्तुनिष्ठ जगाचे आहेत हे सिद्ध होते. हे अनुभव शिक्षण, व्यवसाय, वय, लिंग, धर्म, वंश, इ. गोष्टींवर अवलंबून नाहीत असे आढळून आले आहे. कुठल्याही धर्मावर किंवा ईश्वरावर श्रद्धा नसलेल्या लोकांनाही हे अनुभव आले आहेत.

कार्ल सॅगन या शास्त्रज्ञाने बोगद्यातून जाण्याचा अनुभव हा जननमार्गातून जन्मल्याची माणसाची आठवण आहे, तो त्याचा पुन:प्रत्यय आहे असा युक्तिवाद केला आहे. पण कार्ल बेक्कर या शास्त्रज्ञाने माणसाला आपण कसे जन्मलो याची आठवण असणे कसे शक्य नाही, हे बालकांवर केलेल्या शरीरशास्त्रीय प्रयोगांच्या अभ्यासाच्या सहाय्याने दाखवून दिले आहे.

काहींनी डेमेरॉल, व्हॅलीयम्, मॉर्फिन यासारख्या वेदनाशामक रासायनिक औषधांमुळे होणारे हे भ्रम (hallucinations) आहेत असे म्हटले आहे. पण या वेदनाशामक औषधांमुळे होणारे भ्रम मरणानुभवाहून अगदी भिन्न असून ते सर्वांना मरणानुभावाप्रमाणे सारखेच होत नाहीत. तसेच ते अगदी क्षणभंगुर असतात. त्यात खरेपणाचा (reality) किंचितही अंश व भावना नसते. उलट मरणानुभवात खरेपणाची, किंबहुना भौत जगापेक्षाही त्यात जास्त खरेपणा असल्याची भावना असते. शिवाय ही वेदनाशामके न दिलेल्या लोकांनाही मरणानुभव येतो त्याचे काय, हा प्रश्न अनुत्तरितच राहतो.

दुसऱ्या काही लोकांच्या मते, हा अनुभव मेंदूतील एंडॉर्फिनचा परिणाम आहे. मेंदूतील एंडॉर्फिनमुळे मनुष्याला उत्साह व आनंद वाटतो हे खरे आहे. पण

त्यामुळे मरणानुभव येतो असे कोणी सिद्ध केलेले नाही. शिवाय हा एंडॉर्फिनमुळे येणारा अनुभव मेंदूपुरता मर्यादित आहे. त्यामुळे देहविमुक्तीनंतर पाहिलेल्या व वर्णिलेल्या घटनांची उपपत्ती कशी देणार, हा प्रश्न आहे.

काहींनी देहविलगतेचा अनुभव संकटकाळी आल्याची उदाहरणे दिली आहेत. पण ही देहविलगता (depersonalisation) मरणानुभवात आलेल्या देह विमुक्तीसारखी नसते. देहविलगतेत मूळ शरीरातून सुटे झाल्याची भावना वा अनुभव नसतो, जो देहविमुक्तीत असतो. देहविलगतेत केवळ आपलेच प्रतिबिंब किंवा प्रतिच्छाया माणसाला दिसते. ती मूळ व्यक्तीचे अनुकरण करते. याच्या उलट देहविमुक्तीत स्वत:चे शरीर वेगळे दिसते.

नाथन स्लेपर या मानसोपचारतज्ज्ञाने रक्तात प्राणवायूचा पुरवठा कमी झाला अथवा त्यातील कार्बन डायक्सॉइडचे ($CO_2$) प्रमाण वाढले तर असे अनुभव येणे शक्य आहे, असे प्रतिपादन केले आहे. मेंदूला कमी प्राणवायू मिळाला तर काय परिणाम होतात, काय अनुभव येतात, याचे संशोधन १९३० च्या दशकात आर. ए. मॅकफर्लंड याने केले असून त्याचे निष्कर्ष मरणानुभवात येणाऱ्या अनुभवाच्या थेट उलट आहेत. तसेच रक्तात $CO_2$ चे प्रमाण वाढले तर गूढानुभवासारखे अनुभव येऊ शकतात हे एल्. जे. मेड्युना या शास्त्रज्ञाने १९५० च्या दशकात दाखवून दिले असले तरी त्यात मरणानुभवाची लक्षणे आढळून येत नाहीत. देहविमुक्तीची व देहविमुक्तीनंतर त्या व्यक्तीने केलेल्या भौतिक घटनांच्या अचूक वर्णनाची उपपत्ती याने लागत नाही हे वेगळेच. शिवाय डॉ. सॅबोम या हृदयरोगतज्ज्ञ डॉक्टरला व्हिएटनामच्या युद्धात भयंकर जखमी झाल्यानंतर मरणानुभव घेतलेल्या एका सैनिकाच्या रक्तातील $CO_2$ चे प्रमाण तपासल्याचा वैद्यकीय पुरावा मिळाला. त्या सैनिकाच्या रक्ताच्या तपासणीत $CO_2$ चे प्रमाण वाढण्याऐवजी उलट कमी झालेले आढळून आले ! अशा रीतीने मरणानुभव हे रक्तातील कार्बन डायॉक्साइडच्या प्रमाणावर अवलंबून नाही हे सिद्ध झाले.

## एकाच प्रकारचे मरणानुभव सर्वांना का येत नाहीत?

एकाच प्रकारचे मरणानुभव सर्वांना का येत नाहीत? त्यात व्यक्तिनिहाय वेगवेगळेपणा का दिसून येतो? मरणोत्तर जग असेल तर ते सर्वांना सारखेच अनुभवायला यायला नको काय? - असा एक प्रश्न विचारण्यात येतो. याला उत्तर सोपे आहे. मरणोत्तर जग हे स्थळकाळाने भौतिक जगाप्रमाणे बांधले गेलेले नाही. ते स्थलकालातीत जग आहे. (याचा विचार वर केलाच आहे.) त्यामुळे ते जग ठराविक साच्याचे असावे अशी कल्पना करणे चुकीचे ठरते. मात्र काही लोकांना वर सांगितलेल्या मरणानुभवाच्या सर्व अकरा लक्षणांचा सारखाच अनुभव येत नाही, काहींना त्यातील

काही लक्षणांचा प्रकर्षाने अनुभव येतो, असे आढळून येते. असे का व्हावे, याचेही उत्तर सोपे आहे. हा त्या त्या व्यक्तीच्या मन:पिंडाचा परिणाम असतो. अशी कल्पना करा की, भारतातील दहा लोक अमेरिकेला जाऊन आले आहेत. त्यांना तुम्ही तेथे काय काय पाहिले असे विचारले तर त्या सर्वांची उत्तरे-अनुभव-सारखेच असतील काय? मन:पिंडाचा जेव्हा प्रश्न येतो तेव्हा व्यक्तीवर झालेल्या सांस्कृतिक प्रभावाचा विचार प्रामुख्याने करावा लागतो. त्यामुळे प्रत्येक व्यक्तीला मरणोत्तर जग कसे दिसेल हे त्या व्यक्तीच्या संस्कृतीवर अवलंबून राहील. उदा. जेथे पाश्चात्यांना 'प्रकाश-व्यक्ती' दिसेल, तेथे भारतीयांना 'यम' दिसेल. जेथे त्यांना 'देवदूत' (angels) दिसतील, तेथे भारतीयांना 'यमदूत' दिसतील किंवा 'चित्रगुप्त' दिसेल. 'कर्मसिद्धांता'चे (ज्याला गैरसमजामुळे पाश्चात्य लोक 'दैववाद' म्हणतात) बाळकडू प्यालेल्या व अध्यात्मवादी पिंडाच्या भारतीयांना life review (जीवन-चित्रपट) दिसणार नाही. कारण कर्मसिद्धांतावर अढळ श्रद्धा असल्यामुळे त्यांना त्याची गरज नाही. याविषयी प्रत्यक्ष घडलेले एक उदाहरण फार बोलके आहे. एकदा एका वन्य जमातीच्या लोकांना आरोग्याचे धडे देणारा एक बोधपट (डॉक्युमेंटरी) दाखवण्यात आला. चित्रपट संपल्यावर अधिकाऱ्यांनी त्या लोकांना 'तुम्ही काय पाहिले?' असे विचारता त्या सर्वांनी एकच उत्तर दिले 'कोंबडा!'

संस्कृतीचा प्रभाव, पगडा किती जबरदस्त असतो याचे हे बोलके उदाहरण आहे. शहरात राहणाऱ्यांना ज्याची गरज आहे अशा आरोग्याच्या धड्यांची वन्य जीवन जगणाऱ्यांना गरज नाही, हे त्या बिचाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांना कसे कळावे? हा संस्कृतीचा पगडा जीवनातच नव्हे तर मरणातही दिसून येतो.

## मरणानुभवाच्या खरेपणाविषयीचे वस्तुनिष्ठ पुरावे

मरणानुभवात देहापासून सुटे झाल्यानंतर त्या व्यक्तीला इस्पितळातील आपल्या खोलीतील घटना दिसतात व ती त्या घटना प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणे बरोबर वर्णन करते असे आढळून येते. या घटना ती व्यक्ती वैद्यकशास्त्राच्या दृष्टीने मेलेली असल्यामुळे, निदान बेशुद्ध असल्यामुळे, निदान तिचे डोळे झाकलेले असल्यामुळे, पाहणे शक्य नाही. या घटनांमध्ये त्या व्यक्तीला जिवंत करण्यासाठी केलेल्या प्रयत्नाचा सर्व तपशील असतो. उदा. किती डॉक्टर व नर्स होते, त्यांनी कसले कपडे घातले होते, कोणत्या डॉक्टरने वा नर्सने काय केले, त्यांच्यात काय काय संभाषण झाले, त्यांनी जिवंत करण्यासाठी कोणती वैद्यकीय उपकरणे वापरली, ती कशी वापरली, कुठे वापरली, किती वेळा वापरली इ. बारीकसारीक गोष्टींचे अचूक वर्णन ती व्यक्ती हे सर्व तटस्थपणे पाहिले असल्याप्रमाणे करते. आपण देह सोडून छताजवळ गेलो व हे सर्व तेथून पाहिले असे ती व्यक्ती म्हणते. ज्यांना शस्त्रक्रिया

करताना 'मृत्यू' आला होता त्यांनी आपल्या शरीरावर डॉक्टर्सनी केलेल्या शस्त्रक्रियेचे तपशीलवार वर्णन केल्याचे व ते सर्व बरोबर असल्याचे आढळून आले आहे. उदा. एका व्यक्तीने डॉक्टरने आपल्या छातीच्या बरगड्या करवतीने कशा कापल्या व हृदय उघडे केले हे तर सांगितलेच, पण आपल्या हृदयाची डावी बाजू जास्त काळसर असल्याची आपल्याला दिसल्याचेही सांगितले. आणि हे अगदी बरोबर होते. कारण त्या व्यक्तीच्या हृदयाची जवनिका काळी पडली होती. (या प्रकाराला वैद्यकशास्त्रात aneurysm हे नाव आहे.) तसेच हृदयात डॉक्टरनी एक इंजेक्शन दिल्याचेही आपण पाहिल्याचे तिने सांगितले. वस्तुत: डॉक्टरने हृदयात सुई टोचून सिरिंजने हृदयातील हवा बाहेर काढली होती; इंजेक्शन दिले नव्हते. पण त्या व्यक्तीला ते इंजेक्शन वाटले. यावरून हे प्रत्यक्षदर्शी वर्णन असल्याचे, म्हणजे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल्यामुळे झालेले हे ज्ञान होते, 'अंतर्ज्ञान' (Clairvoyance नावाचे अतींद्रिय ज्ञान) नव्हते, हे सिद्ध होते. यावरून त्या व्यक्तीचा आत्मा (अथवा आत्मा न मानणाऱ्यांच्या मते जे काही असेल ते) देहापासून सुटा होऊन व वर जाऊन आपल्या देहाकडे प्रत्यक्ष पाहत होता हे सिद्ध होते. तसेच हे पाहण्यासाठी त्या आत्म्याला चर्मचक्षूंची (भौतिक डोळ्यांची) जरूरी नाही हेही सिद्ध होते.

इस्पितळातील त्या व्यक्तीच्या खोलीतील किंवा ऑपरेशन थिएटरमधील घटनांचेच वर्णन ती व्यक्ती करते असे नसून, इस्पितळातील इतर खोल्यांत - उदा. वेटिंग रूम-प्रतिक्षा कक्ष-मध्ये काय चालले आहे, तेथे कोणकोणत्या व्यक्ती आहेत, तेथे काय बोलले जात आहे याचेही अचूक वर्णन ती व्यक्ती अनेकदा करते असे आढळून आले आहे. हे प्रकार इस्पितळातच घडतात असे नसून इतरत्रही घडू शकतात. उदा. व्हिएटनामच्या युद्धात एका अमेरिकन सैनिकाचा एक हात व दोन्ही पाय तुटले. तो मेला असे समजून व्हिएटकाँगच्या सैनिकांनी त्याच्या हातातील घड्याळ व खिशातील वस्तू काढून घेतल्या. पण आपण हे सर्व आकाशातून-वरून-पाहत होतो, असे त्या सैनिकाने नंतर सांगितले. आपले शरीर आपल्या पलटणीतील मेलेल्या बेचाळीस सैनिकांच्या प्रेताबरोबर प्लॅस्टिकच्या पोत्यात घालून ट्रकमधून कसे नेण्यात आले याचेही बरोबर वर्णन त्याने केले आहे. हे मेलेले सर्व चाळीस सैनिक मित्र आपल्याला परलोकात भेटले व ते सर्व मोठ्या आनंदात होते असेही तो म्हणाला.

मरणानुभवी व्यक्तीने परलोकात पाहिलेल्या वस्तूच्या सत्यतेविषयीचे एक उदाहरण डॉ. रित्शीने 'तिसऱ्या लोकात' पाहिलेल्या 'नॉटिलस' पाणबुडीच्या 'कंट्रोल पॅनेल' च्या कथानकात आपण प्रारंभी पाहिले आहे.*

---

* मरणोत्तर जगात मेलेले शास्त्रज्ञ आपापल्या आवडीच्या विषयाचा अभ्यास पुढे

परलोकात भेटलेल्या व्यक्तीच्या सत्यतेविषयीचे एक उदाहरण येथे देता येईल. एका इस्पितळात एका व्यक्तीला जिवंत करण्यात आल्यानंतर त्याच इस्पितळात दुसऱ्या कक्षात आजारी असलेल्या आपल्या बहिणीविषयी म्हणाला, "माझी बहीण मेली आहे." थोड्याच वेळापूर्वी ती खरोखरच मेली होती. पण वेगळ्या कक्षामधील खोलीत मृत्युशय्येवर असलेल्या माणसाला हे माहीत होणे शक्य नव्हते; म्हणून "हे तुला कसे कळले?" असे त्याला विचारले, तेव्हा "मला ती परलोकात भेटली व तुझी अजून इकडे येण्याची वेळ झालेली नाही असे ती म्हणाली. तेव्हा ती मेली आहे हे मला कळले" असे तो म्हणाला. अशा रीतीने जी व्यक्ती देह सोडल्यानंतर इहलोकातील घटना व व्यक्ती पाहून त्यांचे बरोबर वर्णन करू शकते, त्या व्यक्तीने परलोकात पाहिलेल्या घटना व व्यक्ती यांच्या सत्यतेबद्दल किंवा तिने केलेल्या त्याच्या वर्णनाच्या अचूकपणाबद्दल संशय बाळगण्याचे कारण नाही, हे उघड आहे.

## सर्व विज्ञानांचे विज्ञान-अध्यात्म विज्ञान

दगडी पुलावरून पाण्यात अपघाताने पडून डोक्याला जबर मार बसलेला सात वर्षांचा एक मुलगा दहा मिनिटे पाण्याखाली होता. पाण्याबाहेर काढल्यानंतर तो चार दिवस पूर्ण बेशुद्ध (coma) अवस्थेत होता. शुद्धीवर आल्यावर पुलाच्या वर (अंतराळात) आपण फिरत होतो असे त्याने सांगितले. त्याने आपले शरीर पाण्याबाहेर काढण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे व त्यावेळी पुलावर घडलेल्या सर्व घटनांचे इत्थंभूत वर्णन केले आहे. त्या घटना पाण्यात असलेल्या त्या मुलाने पाहणे अर्थातच शक्य नव्हते. मग त्या घटना त्या मुलाला कशा दिसल्या? एका मरणानुभव घेतलेल्या आंधळ्या बाईने देह सोडल्यावर आपल्या शरीरावर शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टरने निळा सूट घातला असल्याचे आपण पाहिले, असे सांगितले. आंधळ्या बाईला दृष्टी नसताना निळा रंग कसा दिसला? इंद्रिये कार्य करीत नसताना इंद्रियज्ञान 'कशा'मुळे होते? इंद्रिये व मेंदू यांच्या अभावी इंद्रियज्ञान अशक्य आहे, असे शरीर व भौतिक विज्ञान सांगते; पण या दोन्ही घटकांच्या अभावी इंद्रियज्ञान शक्य आहे, असे अधात्मविज्ञान सांगते. आणि म्हणून अध्यात्मविज्ञान हे सर्व विज्ञानांचेही विज्ञान

---

चालू ठेवतात, असे मृतात्मे माध्यमांच्या द्वारा सांगतात. बऱ्याच नव्या कल्पना प्रथम परलोकात अंमलात येतात व नंतर त्या पृथ्वीवरील शास्त्रज्ञांच्या बुद्धीत प्रेरित केल्या जातात, असे मृतात्मे म्हणतात, पण याची कल्पना नसल्यामुळे पृथ्वीवरील शास्त्रज्ञ आपल्याला स्फूर्ती (intuition) झाली असे समजतात. अणुशक्तीवर चालणाऱ्या 'नॉटिलस' चे 'कंट्रोल पॅनेल' अशाच रीतीने दहा वर्षे अगोदर परलोकात प्रथम बनविले गेले व नंतर पृथ्वीवर ते अवतरले असा याचा अर्थ होतो.

ठरते. इंद्रियांच्याही आणि मेंदूच्याही अभावी इंद्रियज्ञान 'कशा'मुळे होते हे यमाने नचिकेताला **'येन रूपं रसं गंधं शब्दान् स्पर्शान् एतेनैव विजानाति किमत्र परि शिष्यते । एतद्वै तद् ।।'**[१] (ज्या तत्त्वामुळे रूप, रस, गंध इ. चे -शरीरविरहित- ज्ञान होते व म्हणून जे शरीर नष्ट झाल्यावरही शिल्लक उरते असे ते तत्त्व कोणते बरे? हेच ते आत्म-तत्त्व होय.) या श्लोकात सांगितले आहे. म्हणून उपनिषद्कारांनी त्या तत्त्वाला **'श्रोत्रस्य श्रोत्रं चक्षुषश्चक्षुः'** (ते आत्म-तत्त्व श्रोताचेही श्रोत्र व नेत्राचेही नेत्र आहे) असे म्हटले आहे. तसेच त्या आत्म-तत्त्वाचे वर्णन करताना उपनिषद्कार 'पश्यत्यचक्षुः श्रुणोत्यकर्णः' (डोळे नसतानाही ते पाहते व कान नसतानाही ते ऐकते) असे म्हटले आहे.

Seeing is believing (डोळ्यांनी पाहिल्याशिवाय कशावरही विश्वास ठेवू नये) असे म्हणतात. हेच विज्ञानाचे 'प्रत्यक्ष प्रमाण' होय. या प्रमाणाला विज्ञानात सर्वात जास्त महत्त्व दिलेले दिसून येते. या प्रमाणाला आपण 'चक्षुर्वै सत्यं' प्रमाण असेही म्हणतो. पण 'मेलेल्या' (मरणानुभवी) व्यक्तीला चक्षू नसतानाही दिसते! अशा वेळी कोणते प्रमाण मानायचे? अशा वेळी ज्या आत्मतत्त्वामुळे त्या व्यक्तीला चक्षुशिवाय दिसते ते आत्मतत्त्वच प्रमाण मानले पाहिजे हे स्पष्ट आहे. तेच ज्ञानाचे अंतिम प्रमाण होय. 'जेव्हा सूर्य व चंद्राचा प्रकाश (चक्षु) नसतो, जेव्हा अग्नीचाही प्रकाश (जिवंत शरीर) नसतो तेव्हा कोणता प्रकाश असतो? (तेव्हा कोणते ज्ञानाचे प्रमाण मानायचे?)' या जनकाच्या प्रश्नाला याज्ञवल्क्य बृहदारण्यक उपषिदात 'आत्मा एव अस्य ज्योतिर्भवति' (त्यावेळी आत्मा हाच प्रकाश (ज्ञानाचे प्रमाण) असतो) असे उत्तर देतो. 'येन ज्ञातेन सर्वमिदं ज्ञातं भवति' (याचे ज्ञान झाले तर सर्वांचे ज्ञान होते) असे ते ज्ञानाचे अंतिम प्रमाण आहे. म्हणून 'चक्षुर्वै सत्यं' ऐवजी 'आत्मा वै सत्यं' किंवा 'seeing is believing' ऐवजी 'Spiritually seeing is truly believing' हे ज्ञानाचे खरे प्रमाण ठरते. कारण शेवटी इंद्रिये, मेंदू, व शरीर ही नष्ट होणार असल्यामुळे ती ज्ञानाची खरी प्रमाणे ठरू शकत नाहीत. म्हणून ज्याच्यामुळे इंद्रिये व मेंदू यांना ज्ञान होते तो आत्मा इंद्रियांच्या ज्ञानाचेही प्रमाण आहे असे म्हणावे लागते. म्हणून आत्मा (spirit) हा सर्व प्रमाणांचेही प्रमाण ठरतो. त्याचे विज्ञान (अध्यात्मविज्ञान) हे सर्व विज्ञानांचेही विज्ञान ठरते.

## अध्यात्मविज्ञानाचे प्रमाण - 'परिणामाद्वै सत्यम्'

'चक्षुर्वै सत्यं' हे प्रत्यक्ष प्रमाण भौतविज्ञानाच्याही दृष्टीने नेहमीच सत्य ज्ञान करून देऊ शकते असे नाही. उदा. सूर्य पूर्वेला उगवतो व पश्चिमेला मावळतो, म्हणजे सूर्यच आकाशातून चालतो, असे प्रत्यक्ष दिसते. पण प्रत्यक्ष प्रमाणाने होणारे हे ज्ञान खरे नसते. (ते खरे नाही हे कळायला पाश्चात्यांना दोन हजार वर्षे लागली!)

ते खरे नाही हे कळण्यासाठी अनुमान-प्रमाणाचा आश्रय करावा लागतो. (सूर्याचे आकाशातील चालणे हे पृथ्वी सूर्याभोवती फिरण्याचा परिणाम आहे, हे अनुमानानेच कळते.) म्हणून विज्ञानाचे अनुमान-प्रमाण हेच मुख्य प्रमाण मानले गेले असून विज्ञानाने होणारे ज्ञान हे नेहमीच अनुमानात्मक ज्ञान असते (Inferential Knowledge) असे नेहमी याच कारणासाठी म्हटले जाते. अनुमान ज्ञान हे अर्थात नेहमी परिणाम ज्ञान असते. उदा. भौतिकशास्त्रातील सर्वव्यापक वा सर्वात महत्त्वाचा कण इलेक्ट्रॉन हा कोणत्याही शास्त्रज्ञाने पाहिलेला नाही; मग त्याचे अस्तित्व खरे कसे मानायचे? अर्थात, त्याच्या वैज्ञानिक (यंत्र) उपकरणावरील परिणामावरून. विश्व-विज्ञानातील सर्वात महत्त्वाचा घटक 'कृष्ण विवर' (Black hole) कोणीही दुर्बिणीतून पाहिलेला नाही. (आणि पाहणे शक्य नाही, कारण त्याच्यापासून प्रकाश किरणच निघत नाहीत, म्हणूनच त्याला 'कृष्ण विवर' म्हटले आहे.) मग त्याचे अस्तित्व खरे कशावरून? अर्थात् त्याच्या इतर अवकाशस्थ गोलकांवरील परिणामावरून व शेवटी त्यांच्याही यंत्रोपकरणावरील परिणामावरून. (ह्या यंत्रोपकरणांवरील परिणामांना एडिंग्टन या प्रसिद्ध शास्त्रज्ञाने Pointer Readings हे अन्वर्थक नाव दिले आहे.) पण ज्याचे अस्तित्व हे readings (परिणाम) Point (सूचित) करतात ते खरोखरच अस्तित्वात असल्याचा अनुभवात्मक पुरावा (Empirical Evidence) भौत विज्ञानात मिळत नाही. तो पुरावा अध्यात्मशास्त्रात मिळतो. म्हणून अध्यात्म विज्ञानाने होणारे ज्ञान हे स्वतःप्रमाण (self-certifying) असते. त्याला दुसऱ्या प्रमाणाची गरज नसते. पण त्याचे स्वतःवर परिणाम होत असल्यामुळे, आणि ते परिणाम दृश्य असल्यामुळे त्याचा भौत विज्ञानातील अनुमान-प्रमाणाप्रमाणे इतरांना पडताळाही पाहता येतो. अशा रीतीने अध्यात्मविज्ञानाचे ज्ञान अनुभवात्मक असल्यामुळे एकाच वेळी स्वतःप्रमाणही असते व 'परिणामाद्वै सत्यं' ही असते, म्हणजे परिणामामुळे इतरांना त्याची सत्यता पडताळूनही पाहता येते. दुसऱ्या शब्दात, अध्यात्म विज्ञानाचे ज्ञान खऱ्या अर्थाने 'प्रत्यक्ष-ज्ञान' असते व त्याचवेळी वैज्ञानिक अर्थाने - वैज्ञानिक प्रमाणाच्या दृष्टीने - 'परिणाम-ज्ञान' वा 'परिणामाद्वै सत्यं'-ज्ञानही असते. मरणानुभवात अशाच प्रकारचे ज्ञान होत असल्यामुळे ते एकाच वेळी स्वतःप्रमाण प्रत्यक्षज्ञान व वैज्ञानिक प्रमाण-परिणामज्ञान असल्याचे आढळून येते. मरणानुभवात मरणानुभवी व्यक्तीला प्रत्यक्ष ज्ञान मिळते व त्याचे त्या व्यक्तीवर खोल परिणाम झाल्याचे दिसून येतात. परिणामी तिचे जीवन संपूर्ण बदलून जाते. त्या व्यक्तीचा पुनर्जन्म होतो. त्याचा अनुभव स्वतः त्या व्यक्तीला येतोच, पण त्याचे दृश्य परिणाम इतरांना पाहावयास मिळतात. मरणानुभवाच्या खरेपणाच्या आत्मनिष्ठ व वस्तुनिष्ठ कसोट्या अशा रीतीने येथे एकत्र मिळतात व दोन्ही तऱ्हेच्या पुराव्यांमुळे मरणानुभवाचा खरेपणा वादातीतपणे प्रस्थापित होतो.

## मरणानुभव्यांचे संपूर्ण जीवन बदलणारी ही 'प्रकाश-व्यक्ती' कोण?

मरणानुभव्यांच्या जीवनावर झालेले हे परिणाम कोणते हे पाहण्यापूर्वी मरणानुभवात प्रत्यक्ष ज्ञानाने हे परिणाम करणारी 'प्रकाश-व्यक्ती' कोण हे पाहिले पाहिजे. या प्रकाश-व्यक्तीपासून मिळणाऱ्या अननुभूत प्रेमामुळे व ज्ञानामुळे तिला अनेकांनी 'परमेश्वर' म्हटले आहे. काहींनी तिला येशू म्हटले आहे. लहान मुलांनी तिला देवदूत (Angel) म्हटले आहे. बहुसंख्य लोकांनी तिला केवळ 'प्रकाश-अस्तित्व' (Being of Light) किंवा केवळ 'प्रकाश' (Light) असेच म्हटले आहे, आणि तेच त्या अनुभवाचे वस्तुनिष्ठ वर्णन आहे. त्या प्रकाशाचे वर्णन करताना काहींनी म्हटले आहे की, हा प्रकाश अत्यंत प्रखर वा तेजस्वी असला तरी तो डोळ्यांना खुपत नाही. तो शांत आहे. हा प्रकाश पृथ्वीवरील प्रकाशासारखा नाही. पृथ्वीवरील प्रकाशात सावली पडते. तसे या प्रकाशाचे नाही.* या प्रकाशाचे वैशिष्ट्य असे की देह सोडल्यानंतर बोगद्यातून वा काळोखातून गेल्यानंतर बोगद्याच्या शेवटी तो त्या व्यक्तीला नेहमी भेटतो.

जनक याज्ञवल्क्याला विचारतो की सूर्य, चंद्र, अग्नी आणि वाणी या सर्वांचा प्रकाश नाहीसा झाल्यावर - म्हणजे ज्यामुळे चक्षु इत्यादीद्वारा इंद्रिय ज्ञान होते तो मेंदू किंवा शरीर नाहीसे झाल्यावर - कोणत्या प्रकाशात माणसाला ज्ञान होते? त्यावेळी आत्म-प्रकाशात माणसाला ज्ञान होते (**आत्मा एव अस्य ज्योतिर्भवति**) असे यासवल्क्य उत्तर देतो. दुसऱ्या शब्दात, मृत्यूनंतर-म्हणजे देह सोडल्यानंतर-सर्वत्र पसरलेल्या काळोखात (बोगद्याच्या शेवटी) माणसाला (जीवात्म्याला) त्याचा स्वत:चाच आत्मा प्रकाश बनतो. (ज्ञान व प्रेम देतो.) या आत्मप्रकाशात त्या जीवात्म्याला पृथ्वीवरील शरीरजन्मात केलेल्या सर्व बऱ्यावाईट कर्मांचे दर्शन होते. (जीवन चित्रपट - Life review दिसतो.) हा चित्रपट पाश्चात्यांना दिसतो. भारतीयांच्या दृष्टीने मात्र त्यांच्या कर्मसिद्धांतामुळे जीवात्म्याला 'यमा'पुढे नेले जाते व तेथे 'चित्रगुप्त' याच्या सर्व बऱ्यावाईट कर्मांचा पाढा वाचतो व त्यांची फळे भोगावी लागणार याची कल्पना देतो. पाश्चात्य मरणानुभव्यांना मात्र त्यांच्या न्यायदान पद्धतीनुसार आपणच आपले न्यायाधीश (One's own judge) असे Life review मध्ये वाटत असल्याचे आढळून येते. न्यायदान पद्धती संस्कृतीभिन्नतेमुळे वेगळी असली तरी परिणाम एकच. आपल्या कर्मांची फळे सर्व जीवात्म्यांना भोगावी

---

* दमयंतीला वरण्यासाठी पाच 'देव' नळाचे रूप घेऊन येतात तेव्हा खरा नळ कोणता हे तिला कळत नाही. ते ओळखण्याची खूण म्हणून 'ज्यांची सावली पडत नाही ते देव (प्रकाश) होत, नळ नव्हे' असे समजावे ही महाभारतातील कथा येथे परलोकातील (स्वर्गातील) संकेताची आठवण करून देते. (महाभारत, वनपर्व ५७.२५)

लागतात. त्यामुळे त्यांना 'धडा' मिळतो व ते सुधारतात. मरणानुभवानंतर माणूस पूर्ण बदलून जाण्याचे हेच कारण आहे. (रमण महर्षींमध्ये जीवनात जे परिवर्तन झाले - वेंकटरमणाचे जे रमण महर्षींमध्ये रूपांतर झाले - ते मरणानुभवामुळेच होय असे ते स्वत:च सांगतात, फरक इतकाच की मृत्यूची भीती घालविण्यासाठी हा अनुभव त्यांनी स्वत:हून घेतला. कुठल्या इस्पितळात तो त्यांना मरून घ्यावा लागला नाही.)

प्रकाश-व्यक्ती ही देह सोडल्यानंतर सर्व मरणानुभव्यांचे मरणोत्तर जगात प्रथम स्वागत करणारी वा भेटणारी व्यक्ती आहे. त्या व्यक्तीबरोबर मरणानुभवी संभाषणही करतात, त्यांच्यात प्रश्नोत्तरेही होतात, असे आढळून येते. तेव्हा तिला वस्तुनिष्ठ अस्तित्व असावे असेही म्हणता येईल. प्रकाश-व्यक्ती वस्तुनिष्ठ असेल, म्हणजे तिला मरणानुभवी व्यक्तीहून स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असेल तर ती स्वतंत्र व्यक्ती कोण, असा साहजिकच प्रश्न निर्माण होतो. वैदिक कल्पनेनुसार यम हा मृत्यू पत्करणारा पहिला मानव आहे. (हा मृत्यू लोककल्याणासाठी त्याने पत्करला असे ऋग्वेदात म्हटले आहे.) म्हणून तो मृत्युदेवता व पितृ लोकांचा (मरणोत्तर जगाचा) अधिपती झाला. म्हणून सर्व मृतांचे (पितरांचे) त्याने स्वागत करावे हे स्वाभाविकच आहे. या कल्पनेचा अर्थ इतकाच की, मरणोत्तर जगातील सर्व व्यवहार एका विशिष्ट नियमानुसार (यम याचा अर्थ नियम) चालतात. या नियमांची अंमल-बजावणी करणारी देवता (तत्त्व) म्हणजे 'यम'. सर्व मृतात्मे या नियमांनी बांधले गेले आहेत (Governed). त्या नियमांचा अधिपती (Governor) 'यम'. यमाने मर्त्य मानवासाठी, त्यांच्या कल्याणासाठी, अमरत्व नाकारले या ऋग्वेदातील कथेचा अर्थ मेल्याशिवाय-मरणानुभव घेतल्याशिवाय-मानवाचे कल्याण होत नाही असा होतो. या कल्याणकारी मरणोत्तर जगाचे अधिपत्य, मरणारा पहिला मानव म्हणून या कल्याणकारी यमाकडे आले. हा एक हुद्दा असावा. (पृथ्वीवरील 'गव्हर्नर' हुद्द्याप्रमाणे) कोणत्याही श्रेष्ठ मृतात्म्याला तो मिळत असावा. तो एखादा मृतात्मा नसेल तर मरणोत्तर जगातील 'नियम' च (नियंत्रण व्यवस्थाच) 'यमा' चे (प्रकाश-अस्तित्वाचे) मूर्त रूप धारण करीत असावी. ते कसेही असले तरी या 'नियमा'मुळे मरणानुभवी व्यक्तीला अलौकिक प्रेम व जीवन बदलणारे ज्ञान मिळते, ही वस्तुस्थिती असून **'भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्व संशयाः .. तस्मिन् दृष्टे परावरे ।'** या उपनिषद वचनाप्रमाणे त्याच्या केवळ सान्निध्याने सर्व ज्ञान मिळते, सर्व संशय फिटतो, आत्मकल्याणाचा मार्ग सापडतो व माणूस पूर्ण बदलतो, यात संशय नाही. त्यासाठी त्या व्यक्तीशी प्रत्यक्ष संभाषणच केले पाहिजे किंवा प्रश्नच विचारले पाहिजेत असे नाही, असे काही मरणानुभवी म्हणतात. 'गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यस्तु छिन्नसंशय:' या भारतीय ज्ञान-दान पद्धतीचे, (मौन दीक्षेचे) प्रत्यंतर 'गुरूपदेश' न मानणाऱ्या

पाश्चात्यांनाही या मरणानुभवामुळे अशा रीतीने येत आहे. (रमण महर्षींसारख्या सत्पुरुषांच्या सान्निध्यात अनेकांचे- यात पाश्चात्यही आहेत- संशय फिटले आहेत. तसेच शक्तिपात दीक्षेचीही अनेक उदाहरणे आहेत, रामकृष्णांच्या केवळ स्पर्शाने नरेंद्राची दृष्टी बदलली हे सर्वज्ञातच आहे. 'यमा'मुळे मरणानुभव्यामध्ये शक्तीचे कसे प्रक्षेपण झाले हे आपण पुढे पाहणारच आहो. मुद्दा हा की, भारतीयांची ज्ञानदानाची पद्धत अनुभवाधिष्ठित असून ज्ञानाचे इंद्रियनिरपेक्ष 'प्रत्यक्ष प्रमाण' काल्पनिक नाही हे मरणानुभवामुळे आता पाश्चात्य शास्त्रज्ञांनाही पटत आहे.)

## मरणानुभवामुळे मरणानुभव्यांच्या जीवनावर झालेले परिणाम

**१. मृत्यूची भीती नाहीशी झाली :** सर्व मरणानुभवी या अनुभवामुळे आपली मृत्यूची भीती नाहीशी झाली असे सांगतात. एका चोराने घरात शिरून आपल्याला मारण्यासाठी बंदूक काढली तेव्हा त्याला आपण किंचितही न भिता तोंड दिले असे एका मरणानुभव्याने सांगितले.

**२. आत्महत्या करणाऱ्या मरणानुभव्यांनी पुन्हा तो प्रयत्न कधीच केला नाही :** मरणानुभव अत्यंत आनंददायक असल्यामुळे सर्व मरणानुभवी आत्महत्येस प्रवृत्त होतील अशी एक भीती प्रारंभी काहींना वाटत होती. पण ही भीती निराधार ठरली. किंबहुना ज्यांना आत्महत्येत मरणानुभव आला ते पुन्हा तसा प्रयत्न कधीच करीत नाहीत, असे आढळून आले आहे. याचे कारण जीवन ही परमेश्वराची देणगी आहे, हे मरणानुभवात उमगल्याचे किंवा जीवनाचा खरा अर्थ मरणानुभवात कळल्याचे अनेकांनी सांगितले. ज्यांना आत्महत्येत मरणानुभव आला नाही अशा लोकांनी मात्र पुन: पुन्हा आत्महत्येचा प्रयत्न केलेला आढळून आला आहे. जीवनाचा अर्थ केवळ 'मेल्याने', कळत नाही, त्यासाठी 'मरणानुभव' च घेतला पाहिजे, हे यावरून स्पष्ट होते.

**३. गुन्हेगार सत्प्रवृत्त बनले :** गुन्हेगारांना मरणानुभव आल्यानंतर ते पुन्हा गुन्हे करीत नसल्याचे आढळून आले आहे. मरणानुभवात पाहिलेल्या जीवन चित्रपटाचा हा परिणाम असल्याचे ते म्हणतात. आपल्या जीवनाचा गुन्हेगारीचा चित्रपट पाहून ते अस्वस्थ झाल्याचे दिसले.

**४. नास्तिक लोक आस्तिक बनले :** देवावर विश्वास नसलेले, अज्ञेयवादी तत्त्वज्ञान बाळगणारे लोक या अनुभवानंतर परमेश्वर आहे असे मानू लागले.

**५. इहलोकवादी परलोकवादी झाले :** प्रत्यक्ष परलोकाचे दर्शन झाल्याचा हा परिणाम होय असे ते म्हणतात.

**६. जडवादी अध्यात्मवादी बनले :** हा मरणानुभवाचा पाश्चात्यांवर झालेला सर्वात मोठा परिणाम होय. बाकीचे परिणाम या परिणामांचेच अंग आहेत.

केवळ यमाच्या दर्शनाचाच हा परिणाम आहे हे नचिकेतावर यमभेटीमुळे झालेल्या परिणामावरून स्पष्ट होते. सर्व भौतिक सुखाची आमिषे यमाने दाखवली तरी **'वर्णरतिप्रमोदान् अभिध्यायन् को रमेत?'** स्त्री इत्यादी सौंदर्य व क्रीडासुखात, तुझे दर्शन झाल्यावर कुणाला सुख वाटेल, असे म्हणून तो ती सर्व सुखे लाथाडतो. पाश्चात्यांचीही यमदर्शनाने हीच अवस्था झाली आहे. याचाच परिणाम म्हणून पुढील गोष्टी आढळतात.

**७. व्यक्तीसुखवादी असलेल्या लोकांनी समाजकल्याणाच्या कार्याला मरणानुभवानंतर वाहून घेतल्याचे आढळते :** हा अनुभव स्त्रियांना आला तर त्या इस्पितळात रुग्णांची विनामोबदला सेवा-शुश्रूषा करू लागतात असे आढळून येते. आपल्या जीवनात मरणानुभवामुळे झालेल्या बदलाचे एक नमुनेदार उदाहरण एका बाईने दिले. ती म्हणाली, "पूर्वी मला लिंकन कॉंटिनेंटल (मोटर) गाडीतून फिरण्याची फार हौस होती. आता निराधार लोकांना वृद्धाश्रमाला वाहून नेणारे एक 'वाहन' म्हणून केवळ तिचा मी उपयोग करते."

**८. प्रस्थापित धर्म ओलांडणारा मानवतावाद मरणानुभवी स्वीकारतात :** एका मरणानुभव्याचे पुढील अनुभवाचे बोल मननीय आहेत. "माझ्या ख्रिश्चन धर्मीय मित्रांना हे ऐकून आश्चर्य वाटेल की, मरणानुभवात मला भेटलेल्या परमेश्वराने मी कोणत्या धर्माचा आहे हे विचारले नाही. त्यात त्याला रस नव्हता. माझ्या डोक्यापेक्षा माझे हृदय त्याने पाहिले." एका मरणानुभव घेतलेल्या ख्रिश्चन बाईने मरणानुभवानंतर चर्चला जाणे सोडून दिले. चर्चला न येणारे नरकात जातात असे म्हणणाऱ्या आपल्या चर्चमधील धर्मगुरूंबद्दल मला कीव वाटली, असे ती नंतर म्हणाली.

**९. अतींद्रिय शक्ती प्राप्त होते :** बऱ्याच मरणानुभव्यांना या अनुभवानंतर भविष्यातील घटना कळणे, हस्तस्पर्शाने व्याधी बऱ्या करणे, दुसऱ्यांच्या वेदनांचा अनुभव येणे यासारखी शक्ती प्राप्त झाली.

**१०. ज्ञानलालसा वाढली :** मरणानुभवानंतर अनेकांनी पुन्हा शाळेत नाव दाखल केले व विज्ञान, तत्त्वज्ञान, अध्यात्म, योग, सत्ताशास्त्र (Metaphysics) अशा विषयांवरील ग्रंथांचे ते वाचन करू लागले.

**११. विश्वात्मक दृष्टी प्राप्त झाली :** विश्वातील सर्व सजीव निर्जीव वस्तू एकमेकांशी आंतरिक धाग्याने बांधल्या गेल्या असल्याचा, आध्यात्मिक एकात्मतेचा अनुभव बऱ्याच मरणानुभव्यांना प्राप्त झाला.

**१२. सत्ता-संपत्तीची लालसा कमी झाली :** सर्व गोष्टी पैशात मोजणारे मरणानुभवानंतर पैसा मिळविणे कमीपणाचे मानू लागले.

**१३. प्रापंचिक आसक्ती कमी झाली :** याचा अर्थ, घरच्या लोकांबद्दलचे

प्रेम कमी झाले असा नसून, इतर लोकांबद्दलही घरच्या लोकांसारखेच प्रेम व जिव्हाळा वाटू लागला असा करावयाचा. मात्र कुटुंबातील लोकांचा दृष्टिकोण बदललेला नसल्यामुळे व मरणानुभवानंतर बदललेल्या मरणानुभवी व्यक्तीला त्यांनी समजून न घेतल्यामुळे मरणानुभव्यांचे संसार बहुतेक वेळा मोडलेले आढळून येतात. बायकोला हा अनुभव आला असेल तर नवरा तिला सोडतो व नवऱ्याला आला असेल तर बायको त्याला सोडते असे आढळून येते! हे अनुभव सर्वज्ञात होण्यापूर्वी मरणानुभव आलेल्या व्यक्ती भौतिक सुखाकडे, स्वत:च्या फायद्याकडे दुर्लक्ष करीत असल्याचे पाहून त्यांच्या कुटुंबियांनी त्यांना मनोरुग्ण समजून मानसोपचार इस्पितळात ठेवल्याचीही उदाहरणे आहेत! आणि हे स्वाभाविक नाही काय? आपल्या समाजात तुकारामांची काय संभावना झाली? त्यांना व्यवहारज्ञान नाही असे खुद्द त्यांची पत्नीच म्हणत नव्हती काय? रामकृष्ण परमहंसांना अनेकांनी वेडे म्हटलेले नाही काय? सर्व गोष्टी पैशात मोजणाऱ्या भौतिक दृष्टिकोणाच्या समाजात अध्यात्मवादी नेहमीच वेडे व मिस्फिट (नालायक) ठरतात.

मरणानुभवाचे वरील सर्व परिणाम एका वाक्यात सांगायचे झाले तर 'मरणानुभवामुळे व्यक्तीचा आध्यात्मिक पुनर्जन्म होतो' असे म्हणता येईल.

## मरणानुभवामुळे संपूर्ण जीवन बदललेल्या काही पाश्चात्य मरणानुभव्यांची उदाहरणे

### १. यमापासून भौतविज्ञान शिकून आलेला टॉम सॉयर

न्यूयॉर्कजवळील रॉचेस्टर येथील हा रहिवासी. शिक्षण जेमतेम हायस्कूलपर्यंत. तेही पुस्तके न वाचता झालेले. स्वत:ला पुस्तकांचा द्वेषी म्हणवून घेणारा टॉम सॉयर प्रौढपणी श्रमाची कामे व मोटार मेकॅनिक म्हणून कामे करून उदरनिर्वाह करीत असे. एकदा ट्रकखाली काम करीत असता जॅक निसटला व त्याची छाती ट्रकखाली दडपली गेली. श्वासोच्छ्वास वीस मिनिटे पूर्ण बंद झाला होता. शेजाऱ्यांनी कसेबसे त्याला ट्रकखालून काढले व इस्पितळाला नेले. तेथे त्याच्यावर तातडीचे उपचार करण्यात आले. पण हे सर्व तो स्वत:च्या शरीरापासून सुटा होऊन पाहात होता. (नंतर त्याने त्याचे वर्णन केले आहे.) त्याचबरोबर तो बोगद्यातून गेला व 'प्रकाश-
-व्यक्ती'ला भेटला. त्या प्रकाश-व्यक्तीत त्याला सर्व भौतिक ज्ञानाचे 'दर्शन' झाले. 'It was absolute, total knowledge' असे त्या व्यक्तीचे वर्णन तो करतो. तो म्हणतो, "तो परमेश्वरच होता यात संशय नाही. मी त्याला अनेक प्रश्न विचारले. त्यापैकी एक महत्त्वाचा प्रश्न होता की मृत्यूनंतर जीवन आहे काय? त्याचे उत्तर मला त्याने अनुभवानेच दिले, "It was answered through the experience

itself." (हा प्रश्न त्याने विचारण्याचे कारण मेल्यानंतर माणसाचे काहीच शिल्लक राहात नाही असे तो मानत होता. देवावरही त्याचा विश्वास नव्हता. नचिकेतानेही यमाला नेमका हाच प्रश्न विचारला होता, याचे येथे स्मरण करावे.) टॉम सॉयरने आपल्या जीवनाचा चित्रपटही पाहिला.

या अनुभवानंतर एके दिवशी सकाळी अंथरुणातून टॉम सॉयर 'क्वॉंटम' म्हणत उठला, त्याच्या बायकोने "काय म्हणत आहात?" असे त्याला विचारले, "मलाही माहीत नाही" असे तो म्हणाला. काही दिवसांनी टी. व्ही. पाहत असताना तो बायकोला म्हणाला, "मॅक्स प्लँक ! तुला मॅक्स प्लँक माहीत आहे काय?" त्या बिचारीला ते काम माहीत असणार? तो असे वरचेवर काही तरी अगम्य बोलू लागल्यामुळे "हे सर्व तुम्ही लिहून काढा," असा सल्ला तिने त्याला दिला. तो मग आपल्याला सुचेल ते सर्व लिहून काढू लागला. त्याच्या लिखाणाचे एक 'जर्नल'च तयार झाले. नंतर मरणानुभव घेतलेल्या व्यक्तींचा अभ्यास करणाऱ्या केनेथ रिंग या शास्त्रज्ञाने त्याचे ते जर्नल पाहिले, तेव्हा तो थक्क झाला. त्यात त्याला 'मॅक्स प्लँक' या प्रसिद्ध भौतशास्त्रज्ञाची 'क्वॉंटम सिद्धांता'वरील गणिते आढळून आली! (मॅक्स प्लँक हा भौतविज्ञानातील प्रसिद्ध क्वॉंटम सिद्धांताचा जनक असून तो सिद्धांत अध्यात्मशास्त्रातील विचारांना बळकटी आणणारा भौतशास्त्रीय सिद्धांत म्हणून प्रसिद्ध आहे.) तसेच Scientific Autobiography या मॅक्स प्लँकच्या आत्मचरित्रातील काही उतारेही त्यात रिंगला आढळून आले! तेहतीस वर्षे कोणत्याही पुस्तकाशी कसलाही संबंध नसलेल्या टॉम सॉयरने हे सर्व मेकॅनिक व कामगार म्हणून एकीकडे काम करीत असताना लिहून काढले होते! नंतर त्याने शाळेत नाव घातले व रोचेस्टरच्या वाचनालयातून पुस्तके आणून वाचू लागला. पूर्वी धर्म ही अंधश्रद्धा आहे असे म्हणणारा तो अस्तिक बनला. तसेच परामानसशास्त्र, सत्ता शास्त्र (metaphysics) विश्वशास्त्र (cosmology), अध्यात्मशास्त्र, प्राचीन इतिहास या विषयावर तो अचूक माहितीने भरलेली जाहीर व्याख्याने देऊ लागला. हे सर्व ज्ञान मी त्या 'प्रकाश-व्यक्ती'पासून मिळविले असे तो म्हणतो. हे करीत असताना आपली श्रमाची कामे त्याने कधी सोडली नाहीत.

## २. यमभेटीत कुंडलिनी जागृत झालेली बार्बारा हॅरीस

बार्बारा हॅरीस ही एका श्रीमंत उद्योगपतीची पत्नी. त्यांच्या श्रीमंतीची कल्पना, त्यांचे स्वतःचे एक खासगी विमान होते, या वस्तुस्थितीवरून येईल. ह्या बाईच्या मणक्यावर एका अपघातामुळे शस्त्रक्रिया करावी लागली. पण इस्पितळातील लोकांच्या हलगर्जीपणामुळे हिच्यावर मृत्यू ओढवला व त्यात तिने मरणानुभव घेतला. या अनुभवात मरणानुभवाची सर्व लक्षणे तिने अनुभवली. मात्र तिला टॉम सॉयरप्रमाणे

विश्वाच्या कार्याचे ज्ञान झाले नाही. तथापि, तिला विश्वाच्या एकात्मतेचा (Cosmic-unity) अनुभव आला. सर्व सजीव व निर्जीव वस्तूंशी आपण बांधले गेलो आहो असे तिला तीव्रतेने जाणवू लागले. तिला प्रत्येक वस्तूत परमेश्वराचे अस्तित्व जाणवू लागले. (या भावनेने तिच्या डोळ्यात अश्रू येत.) आणि त्यामुळे तिचे संपूर्ण व्यक्तिमत्त्व व जीवन पालटून गेले. तिला सर्व माणसांबद्दल विलक्षण प्रेम व आपुलकी वाटू लागली. त्यांना मदत करावी असे वाटू लागले. शारीरिक त्रास असतानाही ती इस्पितळात स्वयंसेविका म्हणून रुग्णांची सेवा-शुश्रूषा करू लागली. पूर्वीच्या आपल्या विलासी जीवनाचा तिला वीट आला. टी. व्ही. वरील सर्व कार्यक्रम तिच्या दृष्टीने एकदम 'गोंगाट' बनले. वर्तमानपत्रे तिला हातात धरवेनाशी झाली. तिने एका शाळेत नव्याने नाव दाखल केले व ती क्वॉंटम फिजिक्स, बौद्ध धर्म, मानसशास्त्र, अध्यात्म यासारख्या विषयांवरील पुस्तके वाचू लागली. पुढे ती श्वसन-उपचार पद्धतीचे तांत्रिक शिक्षण घेऊन त्या क्षेत्रात रुग्णसेवा करू लागली. या सर्वामुळे तिचे व नवऱ्याचे बिनसले व शेवटी नवऱ्याने तिला सोडून दिले. तिने नंतर केनेथ रिंग, ब्रूस ग्रेसन यासारख्या मरणानुभवाच्या संशोधकांच्या या विषयावरील अभ्यासाला सहाय्य केले व आत्महत्या करून मरणानुभव घेतलेल्या व्यक्तींच्या मुलाखती घेऊन त्या विषयावरील अभ्यासाचा एक प्रकल्प पूर्ण केला. 'आंतरराष्ट्रीय मरणानुभव अभ्यास संस्थे'ची (International Association for Near Death Studies) ती कायमची सभासद बनली व तिने याच कार्याला स्वत:ला पूर्ण वाहून घेतले. आपल्या अनुभवावर आधारित **Full Circle** नावाचे एक पुस्तकही तिने नंतर लिहिले.

मरणानुभवामुळे बार्बारामध्ये एक विलक्षण शक्ती जागृत झाली. रात्री तिला एकदम लख्ख प्रकाश दिसायचा. प्रथम आकाशात वीज चमकत असावी असे तिला वाटले. पण बाहेर येऊन पाहिल्यानंतर हा आकाशातील विजेचा प्रकार नव्हता याची तिला खात्री झाली. कधी कधी रात्री तिला निळा प्रकाशही दिसायचा. एके दिवशी तिने अचानक पद्मासन घातले (हे भारतीय योग्यांचे आसन आहे याची तिला त्यावेळी कल्पना नव्हती. नंतर तिला ते कळले.) आणि आपोआप तिला ध्यानावस्था प्राप्त झाली. श्वास कुंभकात जाऊन पूर्ण बंद झाला. तो किती वेळ बंद होता याची वेळेच्या जाणिवेच्या अभावी तिला कल्पना आली नाही. पहाटे दोन वाजता रोज तिला हलवून कोणीतरी जागे करीत असल्याची स्पष्ट जाणीव होई. (हे ध्यानासाठी-शक्ती-संचयासाठी -असल्याचेही तिला कळे.) एकदा शक्तीचा अनुभव सहन न होऊन तिने ध्यान मध्येच सोडून दिले.

तिला अतींद्रिय शक्तीही प्राप्त झाली. इतरांच्या वेदना तिला जाणवत. त्यांच्या भावना व विचार कळत. भविष्यात भेटणाऱ्या व्यक्ती व घडणाऱ्या घटना

अगोदर स्वप्नात भेटत व घडलेल्या दिसत. तिच्या हातातून एक प्रकारच्या शक्तीचा उद्रेक होत असल्याचे इतरांना जाणवे. तिच्या केवळ हस्तस्पर्शाने इतरांच्या शारीरिक वेदना नाहीशा होत. या शक्तीमुळे तिला स्वत:ला डोकेदुखीचा त्रास होऊ लागला. पण दुसऱ्यांच्या, विशेषत: रुग्णांच्या शारीरिक वेदना हस्तस्पर्शाने तिने नाहीशा केल्या की तिची स्वत:ची डोकेदुखी थांबे! म्हणून रुग्णांच्या वेदना कमी करण्यासाठी ती सतत आपल्या शक्तीचा उपयोग करी. (लोककल्याणासाठी ज्या यमाने मृत्यू पत्करला असे ऋग्वेद म्हणतो, त्या यमाने लोककल्याणासाठीच तिचा उपयोग व्हावा म्हणून बार्बाराला शक्ती दिली होती, हे यावरून स्पष्ट आहे.)

या शक्तीला यांत्रिक संस्कृती पसंत नव्हती असे दिसते. कारण बार्बाराच्या सान्निध्यात गणकयंत्रे (कॉम्पुटर्स) निकामी बनत. म्हणून तिने बँकेत जाणे सोडून दिले. (अमेरिकेत सर्व बँका गणकयंत्रे वापरतात) फोटो कॉपी मशीनही निकामी बने. एकदा टी. व्ही. वर तिची मुलाखत टेप करण्यासाठी कॅमेरा सज्ज केला असता तो एकदम बिघडला. मोटारीच्या बॅटरीच्या जवळ ती गेली तर बॅटरी गळून जाई. पेटलेले विजेचे बल्बही उडत. ती रस्त्याने चालताना रस्त्याकडेचे बल्ब उडत. (आश्चर्य असे की घरात उडालेले बल्ब मात्र काही वेळाने आपोआप पुन्हा पेटत!)

बार्बाराला आपल्या पायाकडून, पाठीतून डोक्याकडे शक्तिसंचार झाल्याची जाणीव होई. शरीराचा एखादा भाग गरम, तर जवळचा भाग थंड झाल्याचे जाणवे. एकदम दु:ख व्हायचे. दुसऱ्याच क्षणी आनंद वाटायचा. डॉ. केनेथ रिंगने बार्बाराच्या शरीरात झालेल्या शक्तींचा उद्रेक ही तिची कुंडलिनी जागृत झाल्याचा परिणाम आहे, असे तिला सांगितले. ही कुंडलिनी तिच्या मरणानुभवामुळे जागृत झाली असून तिला होणाऱ्या भावना ही त्याची लक्षणे आहेत, असे मत त्याने व्यक्त केले. बार्बाराने 'कुंडलिनी' हे नाव यापूर्वी कधी ऐकले नव्हते. अशी काही शक्ती आहे हेही तिला माहीत नव्हते. तिला नंतर याविषयावरील **Kundalini Evolution and Enlightenment** हे पुस्तक वाचावयास मिळाले. ते वाचून योग्यांना येणाऱ्या अनुभवासारखेच अनुभव आपल्यालाही येतात याची तिला खात्री झाली व तिने केनेथ रिंगला पत्राने कळविले की "योग्यांप्रमाणे मला होणाऱ्या गूढ (Mystic) व वैश्विक जाणिवेविषयी मला तुमच्याशी चर्चा करावयाची आहे." पुढे रिंगने तिची कित्येक दिवस मुलाखत घेऊन **"Heading Toward Omega"** (पूर्णत्वाकडे वाटचाल) हे पुस्तक लिहिले, या पुस्तकात कुंडलिनी शक्ती ही मानवी उत्क्रांतीचे निदर्शक असून ती योगमार्गातील ध्यान-धारणादी साधनांप्रमाणेच मरणानुभवानेही माणसाला प्राप्त होऊ शकते व परिणामी मरणानुभव हासुद्धा मानवी उत्क्रांतीसाठी एक सहाय्यभूत घटक (catalyst) ठरू शकतो, असे रिंगने प्रतिपादिले आहे. मरणानुभव्यांची वाढती संख्या ही मानवाच्या पूर्णत्वाकडे होत असलेल्या वाटचालीचे

प्रसादचिन्ह आहे असे रिंगला वाटते. मरणानुभवामुळे मनुष्य एकदम योगी किंवा साक्षात्कारी (mystic) बनतो असा याचा अर्थ नाही. मरणानुभव म्हणजे मानवी बुद्धीत पेरलेले अध्यात्म वृत्तीचे बीज (seed experience) आहे. त्या बीजापासून, त्याला खत-पाणी घालून रोपटे तयार करणे व त्यापासून साक्षात्काराचे फळ मिळविणे हे ज्या त्या व्यक्तीच्या प्रयत्नांवर अवलंबून आहे, असे रिंगचे म्हणणे आहे. हेच कठोपनिषदाच्या भाषेत सांगायचे तर, मरणानुभव म्हणजे **'उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्य वरान् निबोधत'** ही मानवाला यमाने मरणानुभवाच्या द्वारा दिलेली चेतावणी आहे. जागे व्हायचे की नाही हे त्या मरणानुभव्याने ठरवायचे आहे. (बार्बाराला दररोज पहाटे दोन वाजता नेमाने जागे करणारी हीच ती यमप्रेरित चेतावणी होती असे म्हटले पाहिजे. आश्चर्य असे की शरॉन् ग्रँट या आणखी एका मरणानुभव घेतलेल्या बाईला 'ऊठ, जागी हो' असे स्पष्ट शब्द ऐकायला आल्याचे ती सांगते. पुढे योगायोगाने तिची बार्बाराशी गाठ पडली आणि तिच्याबरोबर एकाच घरात राहून तिने तिच्याप्रमाणे लोककार्य केले. तिनेही नवऱ्याशी न पटल्यामुळे घर सोडलेले होते.)

## ३. यमभेटीमुळे युद्धविरोधी (शांततावादी) बनलेला सैनिक स्टीव प्राइस

स्टीव प्राइस या सहा फूट दोन इंच उंच असलेल्या सैनिकाला व्हिएटनामच्या युद्धात मरणानुभव आला. त्या अनुभवात भेटलेल्या प्रकाश-व्यक्तीच्या सान्निध्यात त्याला आपल्या जीवनाचा जो संपूर्ण चित्रपट दिसला, त्यात लहानपणी आपल्या आजोबांचे, ते नेहमी झोपून असलेल्या खाटेजवळचे पैसे चोरल्याचे दृश्य त्याने पाहिले आणि त्याला फार वाईट वाटले. तो नंतर ज्याला स्वर्ग किंवा नंदनवन म्हणता येईल अशा सुंदर प्रदेशात गेला. तेथे एक ओढा होता. ओढ्याच्या पलीकडे त्याला त्याचे मेलेले आजोबा दिसले. त्यांच्या प्रेमाचा त्याला आताही पूर्वीप्रमाणेच उत्कट अनुभव आला. ते म्हणत होते, "अरे, परत जा. तुझी इकडे येण्याची वेळ अजून आलेली नाही." स्टीव म्हणाला, "मी परत जाणार नाही, मी ओढा उडी मारून पार करीन." पण तो उडी मारण्यापूर्वीच आपल्या शरीरात परत आला. कारण त्याच्यावरील शस्त्रक्रिया पूर्ण झाली होती.

तो पूर्ण बरा झाल्यावर त्याला पुन्हा युद्धावर पाठविण्यात आले. त्याच्या हातात पुन्हा रायफल देण्यात आली. हातात रायफल घेऊन सैनिक म्हणून तो परत युद्धभूमीवर हजर झाला, तरी तो आता मनाने व वृत्तीने पूर्वीप्रमाणे सैनिक राहिलेला नव्हता. त्याची वृत्ती पूर्ण पालटली होती. तो आता शांततावादी (pacifist) व युद्धविरोधी झाला होता. मेलो तरी चालेल, पण शत्रूवर एकही गोळी झाडायची नाही अशी त्याने मनानेच प्रतिज्ञा केली होती; आणि ती प्रतिज्ञा युद्धात भाग घेऊनही त्याने

शेवटपर्यंत पाळली. प्रत्येक क्षणाला समोर मृत्यू आला असतानाही गोळी न झाडण्याच्या निश्चयापासून तो किंचितही ढळला नाही. मृत्यूला भ्यालाही नाही. कारण मरणानुभवामुळे त्याची मृत्यूची भीतीच नाहीशी झाली होती. सुदैवाने युद्धात आपल्या रायफलीमधून एकही गोळी न झाडता तो सुरक्षितपणे मायदेशी परतला. इतर सैनिकांना 'ट्रेनिंग' देण्याचे कामच त्याने जास्त केले.

अमेरिकत परत आल्यावर युद्धातील त्याच्या शांततावादाने रचनात्मक स्वरूप धारण केले. मरणानुभवात त्याला प्राप्त झालेली विश्वात्मक दृष्टी-मानवप्रेम-त्याला स्वस्थ बसू देणे शक्य नव्हते. तो लोकांसाठी पडेल ती कामे करू लागला. प्रेते पुरण्यासाठी खड्डे खणण्याचे कामही त्याने एकदा बरेच दिवस केले. एकदा अमेरिकेत पुराने हाहा:कार माजवला, तेव्हा त्याने पुरात सापडलेल्या आपल्या घराकडे दुर्लक्ष करून लोकांची घरे वाचविण्याचा, त्यांची पडलेली घरे बांधून देण्याचा उद्योग केला. स्वत:च्या वैयक्तिक सुखाकडे त्याने पूर्णपणे पाठ फिरवली होती. स्वत:च्या प्रपंचाकडेही त्याचे पूर्ण दुर्लक्ष झाले होते. याचा परिणाम म्हणून त्याच्या बायकोने त्याला जवळ जवळ सोडूनच दिले.

अमेरिकेत परत आल्यावर लहानपणी आजोबांचे पैसे चोरल्याच्या टोचणीमुळे व या गुन्ह्यासाठी शिक्षा म्हणूनच आपल्याला स्वर्गात प्रवेश मिळाला नाही अशी त्याची समजूत झाल्यामुळे त्याने 'पिणे' सुरू केले होते. ती प्रकाश-व्यक्ती त्याला दररोज दिसायची व तिला पाहून त्याची बोचणी तीव्र व्हायची. पण 'पिणे' हा त्यावर उपाय नव्हता हे त्याला कळायला बरेच दिवस जावे लागले. शेवटी तो दिवस उजाडला आणि त्याने पिणे एकदम बंद केले.

मध्यंतरी त्याला कोणीतरी त्याच्यासारख्या मरणानुभव आलेल्या लोकांवर रेमंड मूडी याने एक पुस्तक लिहिल्याचे सांगितले. ते पुस्तक विकत घेण्यासाठी तो एका पुस्तकांच्या दुकानात गेला, पण कितीही शोध केला तरी ते पुस्तक काही तेथे त्याला सापडले नाही. म्हणून निराश होऊन तो परतला. दुकानातून बाहेर पडताना वरच्या फळीवरून एक पुस्तक अचानक त्याच्या डोक्यावरच नेमके पडले. ते उचलून त्याने उघडून पाहिले. ते तो शोधत असलेले रेमंड मूडीचे पुस्तक होते!*

---

* अशा घटनांना बुद्धिवादी योगायोग म्हणतात, पण युंग या मानसशास्त्रज्ञाने व पॉली या क्वॉंटम भौत-शास्त्रज्ञाने अशा घटनांसंबंधी 'Synchronicity' (अर्थपूर्ण घटनात्मकता) या नावाने एक शास्त्रीय सिद्धांत बऱ्याच संशोधनाअंती मांडला असून अशा घटना मरणानुभव्यांच्या जीवनात नेहमी व वरचेवर घडतात असे आढळून आले आहे. विस्तार भयास्तव अशा घटनांचा उल्लेख या लेखात मुद्दाम टाळला आहे. हा प्रकार शास्त्रीय दृष्ट्या महत्त्वाचा असल्यामुळे त्याचा स्वतंत्रपणे विचार करणेच युक्त होय.

पुढे त्याची केनेथ रिंग, ब्रूस ग्रेसन इ. मरणानुभवाच्या संशोधकांशी भेट झाली व तो अमेरिकेत आपल्या अनुभवांवर जाहीर व्याख्याने देऊ लागला.

## 'मरणात खरोखर जग जगते'

मरणानुभव घेणाऱ्यांची संख्या अलीकडे अमेरिकेत फार वाढल्याची दिसून येते. मृत्यूच्या घरात जाऊन आलेल्या १०० लोकांपैकी ४० लोकांना असे अनुभव येतात, असे आढळून आले आहे. अगदी अलीकडे घेतलेल्या गॅलप पोल (चाचणी मतनोंदणी) वरून अमेरिकन समाजात मरणानुभव घेतलेल्या लोकांची एकूण संख्या २ कोटी ३० लक्ष इतकी प्रचंड असल्याची आढळून आली आहे. याचे एक कारण, वाढलेले अपघात, हृद्रोग, कॅन्सर यासारखे वाढलेले दुर्धर (मरणांतक) रोग (बरेच मरणानुभवी हृद्रोगी असल्याचे आढळून येतात.) व त्यामुळे इस्पितळात मरणाऱ्या लोकांच्या संख्येत झालेली वाढ हे आहे. कारण इस्पितळात जे मरतात त्यांनाच अत्याधुनिक वैद्यकीय साधनांनी जिवंत करण्याची शक्यता असते. (अमेरिकेसारख्या प्रगत देशातसुद्धा काही दशकांपूर्वी इस्पितळात मरणाऱ्यांची संख्या नगण्य होती.)

पण वरील कारणांनी इस्पितळात मरणाऱ्यांची संख्या वाढली असली तरी मरणानुभव घेणाऱ्या लोकांचे प्रमाण वाढण्याचे तेच एकमेव कारण आहे काय? या संदर्भात ब्रूस ग्रेसन या संशोधकाचे एक विधान अर्थपूर्ण ठरते. तो म्हणतो, की मरणानुभवाला मरणाच्या दृष्टीने नव्हे तर जगण्याच्या दृष्टीने अर्थ आहे. मरणानुभवाचा व जगण्याचा घनिष्ठ संबंध आहे असा याचा अर्थ होतो. मरणानुभवाचा जगण्याशी असलेला हा घनिष्ठ संबंध कोणता बरे? मायकेल ग्रोसो या मरणानुभवाच्या संशोधक तत्त्ववेत्त्याने हा घनिष्ठ संबंध आपल्या **Final Choice** या ग्रंथात स्पष्ट केला आहे. त्याच्या दृष्टीने हल्ली फार मोठ्या प्रमाणात लोकांना मरणानुभव येत आहे याला अर्थ आहे. अण्वस्त्रांच्या प्रचंड निर्मितीमुळे मानव आज विनाशाच्या उंबरठ्यावर उभा आहे, मानवाचे आत्मनाशाचे तंत्रज्ञान एका विशिष्ट पातळीला पोचले तर त्याची प्रतिक्रिया म्हणून मानवाचे आध्यात्मिक परिवर्तन घडून येणे अपरिहार्य आहे. मानवाचे आध्यात्मिक परिवर्तन मरणानुभवाने घडून येत असल्यामुळे मरणानुभव हे अशा रीतीने आत्मविनाशी तंत्रविज्ञानाला दिलेले प्रत्युत्तर आहे, असे ग्रोसोचे म्हणणे आहे. दुसऱ्या शब्दात, तंत्रविज्ञान मरणानुभवातून मानवाची आध्यात्मिक उत्क्रांती घडवून आणत आहे असे म्हणता येईल.

## मरणानुभवामुळे पाश्चात्य जगात आध्यात्मिक क्रांती

मरणानुभवात कुंडलिनी शक्ती जागृत होत असल्याचे केनेथ रिंगने बार्बाराच्या उदाहरणाने दाखवून दिल्याचे आपण यापूर्वी पाहिले आहे. कुंडलिनी शक्तीचे

जागरण हे आध्यात्मिक उत्क्रांतीचे चिन्ह असल्याने व ती शक्ती मरणानुभवामुळेही प्राप्त होऊ शकत असल्यामुळे, मरणानुभव हा आध्यात्मिक उत्क्रांतीचा एक सहायभूत घटक (catalyst) ठरू शकतो असे रिंगचे म्हणणे आहे. मरणानुभवात ही आध्यात्मिक शक्ती कमी-जास्त प्रमाणात सर्वांनाच प्राप्त होत असल्यामुळे मरणानुभवाला रिंगने 'अध्यात्म प्रवृत्तीचा बीजानुभव' (Seed Experience) असे म्हटले आहे. या आध्यात्मिक बीजानुभवाचे रोपटे बनवून त्यापासून फलानुभव घेणे हे ज्या त्या व्यक्तीच्या प्रयत्नावर अवलंबून राहील हे उघड आहे. अशा रीतीने पाश्चात्य जगात मरणानुभवामुळे आध्यात्मिक क्रांतीचे बीज पेरले जात असून ही क्रांती पाश्चात्य देशांच्या आत्मघातक भौतवादाच्या अतिरेकामुळेच अटळ बनली आहे. ती क्रांती आध्यात्मिक आहे आणि अटळही आहे असे म्हणूनच अनेकांनी प्रतिपादिले आहे. उदा. तीन वेळा मरणानुभव घेतलेली फिलिस ॲटवाटर ही बाई आपल्या **Coming Back to Life** (परत जिवंत होणे) या पुस्तकात म्हणते, "It is revolution. Make no mistake about that. It is a revolution of consciousness. And it is truly global... It is happening with or without anyone's permission. Some see this revolution as the re-emergence of divinity." (ही क्रांती आहे या विषयी कोणीही शंका बाळगण्याचे कारण नाही. ही क्रांती जाणिवेची आहे, म्हणून ती सर्वव्यापी आहे आणि ती अटळपणे घडत आहे. मग तिची कोणी दखल घेवो अगर न घेवो. काही जणांच्या मते, या क्रांतीमधून दिव्यत्व प्रकट होत आहे. माणसाची अध्यात्म प्रवृत्ती वर येत आहे.") ही क्रांती अर्थात भौतवादी पाश्चात्य जगात घडत आहे, कारण त्यांनाच त्याची गरज आहे. भारतात ती घडत असल्याची दिसून येत नाही, कारण भारतीयांचा पिंड आध्यात्मिक असल्यामुळे त्यांना त्याची गरज नाही. (भारत हा जगाचा आध्यात्मिक गुरू नाही काय?)

## 'आपुले मरण पाहिले म्यां डोळां' या लेखावरील एक प्रतिक्रिया * नी. र. वऱ्हाडपांडे

'पैलतीर'च्या १९९४ च्या दिवाळी अंकात प्रा. अद्वयानंद गळतगे यांचा वरील शीर्षकाचा लेख प्रकाशित झाला आहे. या लेखात, आधुनिक विज्ञानाने मरणोत्तर जीवन सिद्ध केले आहे, मरणोत्तर मेंदूविरहित अवस्थाच खरी असते, मेंदू हे खोट्या जगात चालणारे खोटे नाणे आहे वगैरे सिद्धांत सिद्ध करणारा पुरावा सापडलेला आहे, असा दावा मांडला आहे.

---

* ही प्रतिक्रिया **'पैलतीर'** दिवाळी १९९५ या वार्षिकात झाली.

वस्तुत: प्रा. गळतगे यांनी मांडलेल्या पुराव्यांवरून त्यांचा एकही दावा सिद्ध होत नाही. उलट मेंदू व शरीर यांच्याशिवाय ज्ञान व स्मृती संभवत नाहीत, हेच सामान्य मत अधिक स्पष्टपणे सिद्ध झाले आहे. या लेखात वर्णिलेल्या उदाहरणांचा सारभूत अंश असा की काही लोक मेले आहेत असे डॉक्टरांनी ठरविले. पण काही उपचार केल्यानंतर ते पुन: सचेतन झाले. सचेतन झाल्यावर त्यांनी आपल्याला मरणासन्न अवस्थेत काही अनुभव आल्याचे निवेदन केले.

या साऱ्या उदाहरणांवरून मरणोत्तर जीवन कसे काय सिद्ध होते? डॉक्टरांना मरणाचे अचूक निदान करणारी उपकरणे अजून सापडलेली नाहीत, एवढेच त्यावरून सिद्ध होते. अशी उपकरणे सापडली नसल्यामुळे डॉक्टरांनी केलेले मरणाचे निदान चूक होते. हे लोक वस्तुत: मेलेच नव्हते. तेव्हा त्यांचे अनुभव हे मरणोत्तर स्थितीतले अनुभव आहेत, असे म्हणण्यास आधार काय?

बरे, खऱ्या मरणानंतर आलेले हे अनुभव होते असे म्हणता न आले तरी, आयुर्विज्ञान ज्याला आजकाल मरण समजते त्या अवस्थेत आलेले ते अनुभव होते, असे तरी म्हणता येईल काय?

मुळीच नाही! झोपेतून उठलेल्या माणसाला झोपेत असताना पडलेली स्वप्ने आठवतात. पण ती स्वप्ने झोप उघडण्याच्या किती तास आधी पडली होती हे सांगता येत नाही. या व्यक्तींनी आपले अनुभव सांगितले ते खडखडीत बरे झाल्यावर. ते अनुभव त्यांना 'आयुर्वैज्ञानिक मरणाच्या' अवस्थेत आले होते असे त्यांच्या निवेदनावरून ठरत नाही. ते अनुभव स्पष्टपणेच उपचारामुळे त्यांची शुद्ध परत येऊ लागल्यावर आलेले आहेत. म्हणजे हे अनुभव येण्यास मेंदू कार्यरत असावा लागतो. मेंदूविरहित आत्म्याचे ते अनुभव आहेत, हे गळतग्यांचे व त्यांच्या पंथाच्या लोकांचे कल्पनाजाल आहे.

हे अनुभव मरणोत्तर अनुभव नव्हते, त्याचप्रमाणे ते सत्यानुभव नसून स्वप्नासारखे भ्रमरूप होते हेही स्पष्ट आहे. या अवस्थेतून गेलेल्या बहुतेकांना तसेच अनुभव आले, हे त्या अनुभवांच्या सत्यतेचे प्रमाण होऊ शकत नाही. डोळ्यात बोट गेले की बहुतेक लोकांना दोन चंद्र दिसतात. पाण्यात बुडलेली काठी सगळ्यांनाच वाकडी दिसते, ही दोन चंद्रांच्या अस्तित्वाची व काठीच्या वाकडेपणाची प्रमाणे नाहीत. अनुभव खरे आहेत हे ठरविण्यासाठी किती लोकांना ते अनुभव आले हे पाहणे बरोबर नाही. एका माणसाला आलेला अनुभव हा भास व दहा जणांना आलेला अनुभव हा भास नाही असे थोडेच आहे? भ्रम दहा जणांचा असला म्हणून तो सत्य होत नाही. अनुभव सत्य ठरण्यासाठी तो सत्यापनाच्या कसोट्यांवर उतरला पाहिजे. या कसोट्या कोणत्या याची ज्ञानशास्त्रात (Epistemology) विस्तृत चर्चा केलेली आहे.

पुष्कळशी स्वप्ने देखील सार्वत्रिक असतात. उदाहरणार्थ, आपण आकाशात उडत असल्याचे वा एखाद्या लांब बोगद्यातून जात असल्याचे स्वप्न बरेच सार्वत्रिक आहे. पण म्हणून ते स्वप्न नसून तो मृत्योनुभव आहे असे ठरत नाही.

स्वप्ने पडण्याचे एक कारण आपल्या खऱ्या जगात तृप्त न होणाऱ्या इच्छा स्वप्नात पुऱ्या करून घेण्याची मानवाची प्रवृत्ती. आकाशात आपण पक्ष्यासारखे उडावे ही इच्छा स्वाभाविक आहे. ते खऱ्या जगात शक्य नाही. म्हणून आपण स्वप्नामध्ये ही हौस भागवून घेत असतो.

बोगद्यातून जाण्याचे स्वप्न हे बहुधा बंद जागेमध्ये ज्यांना अस्वस्थ वाटते अशा लोकांना पडते. ते एक चिंताजन्य स्वप्न आहे.

## अतींद्रिय प्रत्यक्षाचा अध्यात्माशी संबंध नाही

'पुनरुज्जीवितांच्या' म्हणून ज्या बाबींची गळतगे यांनी उदाहरणे दिली आहेत, त्यावरून मरणोत्तर अनुभवाने अतींद्रिय प्रत्यक्षाची शक्ती प्राप्त होते असा दावा मांडला आहे. एका 'पुनरुज्जीवित' माणसाला म्हणे मृतावस्थेतून परत आल्यानंतर आपल्याच शरीरावर डॉक्टर काय उपचार करीत होते हे स्पष्ट दिसले. गळतगे यांच्या हे लक्षात आले नाही, की हे उदाहरण त्यांच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध अनुमाने दृढ करते. डॉक्टरांनी उपचार सुरू केले होते त्याअर्थी आपले मरणाचे निदान चुकले व मरणासन्न परत शुद्धीवर येऊ शकेल अशी त्यांना आशा वाटली. म्हणजे मुळात ते अनुभव मरणोत्तर आहेत हे मुळी खोटे.

आता राहिला मुद्दा जिवंतपणीच्या अतींद्रिय प्रत्यक्षाचा. असे प्रत्यक्ष होते असे काही मानसशास्त्रज्ञांचे मत आहे. हे मत खरे मानून आपण चालू या. पण अतींद्रिय प्रत्यक्षाने शरीरविरहित आत्मा मुळीच सिद्ध होत नाही. डोळ्यांवाचून दिसू शकते कारण दिसणे ही क्रिया मेंदूची आहे. डोळे फक्त बाहेरचे उद्दीपन मेंदूपर्यंत पोचवीत असतात. गळतगे यांनी उद्धृत केलेल्या व्याधितांना मेंदू होता व तो पुनर्जागृतीचा मार्ग चोखाळीत होता. डॉक्टर त्यांच्यावर याच हेतूने उपचार करीत होते. प्रत्यक्षाचा अनुभव इंद्रियांची मदत न घेता थेट मेंदूचे उद्दीपन केल्याने येऊ शकतो हे अनेक प्रयोगांनी सिद्ध केले आहे. मेंदूतील दृष्टिकेन्द्रांना विजेने उद्दीपित केले की समोर वस्तू नसतानाही वस्तू दिसल्याचा भास होतो. तेव्हा मेंदूला इंद्रियांच्या मदतीशिवाय झालेले प्रत्यक्ष ज्ञान अतींद्रिय असले तरी 'आध्यात्मिक' वगैरे काही नाही. त्याची उपपत्ती शुद्ध भौतिकीच्या साहाय्याने लागू शकते.

आता प्रश्न असा उद्भवतो की, गळतगे यांनी उल्लेखिलेल्या व्याधितांना खरोखरच असे ज्ञान झाले होते काय? झाले होते असे म्हणण्यासाठी खालील गोष्टी सिद्ध होणे आवश्यक आहे -

(१) या व्याधितांनी अशा पुनरुज्जीवित केलेल्या लोकांवर काय उपचार केले जातात याचे मरणासन्न होण्याच्या पूर्वी ज्ञान संपादन केले नव्हते.

(२) त्यांनी दिलेले निवेदन हे शुद्धीवर आल्यावर लगेच केलेले होते.

गळतगे यांनी या दोन बाबतीत काहीच पुरावा दिलेला नाही.

पुनरुज्जीवित केलेल्या एका अज्ञ माणसाने पुंजभौतिकीचे ज्ञान प्रकट केले. हे ज्ञान त्याला अतींद्रिय प्रत्यक्षाने प्राप्त झाले असा गळतगे यांचा दावा आहे. पण आजकाल दूरदर्शन, नभोवाणी, वर्तमानपत्रे वगैरे माध्यमांतून विज्ञानाची इतकी चर्चा होत असते, की या माणसाला पुंजभौतिकाची ऐकीव देखील माहिती नव्हतीच असे गळतगे प्रतिज्ञापूर्वक कसे सांगू शकतात?

दुसरे असे की, काही निरीक्षकांना या व्याधिताने लिहिलेल्या मजकुरामध्ये पुंजभौतिकी आढळली, यावरून खरोखरच त्यात पुंजभौतिकी होती असे ठरत नाही. गळतगे यांच्या पंथाच्या लोकांना वेदांच्या ऋचांतही पुंजभौतिकी दिसते. ती सायणाचार्यांना व जगभर पसरलेल्या इतर वेदाभ्यासकांना कधी दिसली नाही.

मरणानुभव घेणाऱ्यांच्या जीवनात क्रांतिकारी व इष्ट असे बदल होतात असा गळतगे यांचा आणखी एक मुद्दा आहे. त्यांचा अनुभव आनंदाचा असतो व पुढील जीवन आनंदमय होते असे त्यांचे म्हणणे. पण असा अनुभव भांग व गांजा यांच्या सेवनाने देखील येतो असे कोलमनच्या 'ॲबनॉर्मल सायकॉलॉजी' मध्ये विस्ताराने दाखवून दिले आहे. मेंदूवर परिणाम करणाऱ्या मादक व स्वापक द्रव्यांनी केलेले परिणाम व 'अध्यात्माचे' परिणाम यात काही फरक नसतो. नैतिक उन्नयन आपल्याला आलेला अनुभव हा आध्यात्मिक अनुभव आहे या श्रद्धेने होऊ शकते.

## मरणानुभव हा स्वप्नाचा प्रकार

"शेजारच्या खोलीत उपचार घेत असलेली आपली बहीण मेली" असे ज्ञान एका मरणानुभव घेतलेल्या व्याधिताला झाले, अशा अर्थाचे उदाहरण गळतगे यांनी दिले आहे. बहीण असाध्य रोगाने पछाडलेली असताना तिचा मृत्यू केव्हाही अपेक्षित होता. तो त्याच इस्पितळात असल्यामुळे त्याने डॉक्टरांच्या तोंडी तिचे निदान ऐकले असल्याचाही संभव आहे. अशा तऱ्हेची उदाहरणे अतींद्रिय ज्ञानाचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी देणे हे कसेतरी करून आपल्या अंधश्रद्धांना कुरवाळणे होय.

वस्तुतः पृथ्वीच चालत असताना प्रत्यक्षाला सूर्य चालताना दिसतो; यावरून प्रत्यक्षाने होणारे ज्ञान खरे नसते असा अजब निष्कर्ष गळतगे यांनी काढला आहे. ज्ञानशास्त्रात वा 'प्रामाण्यवादा'त या मुद्याची सविस्तर चर्चा आहे, हे गळतग्यांच्या कानी पडलेले दिसत नाही. सूर्याची गती भ्रमरूप नाही, ती सापेक्ष गती आहे एवढेच. गाडीतून प्रवास करताना झाडे मागे धावत आहेत असे आपल्याला वाटते.

हे उदाहरण सूर्याच्या गतीसाठी नेहमी दिले जाते. निरीक्षक हा स्वत:ला स्थिर मानून बाकीच्या पदार्थांना गतिमान मानत असतो. पण निरीक्षक व त्याला दिसणाऱ्या वस्तू या एकमेकांच्यापासून अंतर बदलीत असल्यामुळे दोघेही गतिमान आहेत वा कोणताही एक गतिमान आहे हे विधान चूक नाही.

प्रत्यक्षाला होणारे ज्ञान चूक असते याचे सूर्याची गती हे उदाहरण बरोबर नाही. पाण्यात काठी वाकडी दिसते हे याचे बरोबर उदाहरण आहे. पण प्रत्यक्षाच्या या चुका इतर प्रत्यक्षे व अनुमान यांच्या साहाय्याने सुधारता येतात. अशा चुका होतात म्हणून प्रत्यक्ष हे प्रमाण नाही असे ठरत नाही. साऱ्या प्रत्यक्षांची संगती लावण्याचे काम अनुमानाचे आहे व अशी सुसंगत प्रत्यक्षे हे फक्त प्रमाण आहे. पण दीर्घकालीन घटना अगदी थोड्या वेळात दिसणे हे केवळ मरणानुभूतीचेच लक्षण नाही. साध्या स्वप्नात देखील अशा घटना दिसतात की ज्या घडायला वर्षानुवर्षे लागू शकतात. पण ज्या स्वप्नात त्या दिसतात ती स्वप्ने एखाद्या मिनिटात देखील पडलेली असू शकतात. झोपी जाताना घड्याळ पाहिले व स्वप्नातून जागृत झाल्यावर पाहिले तर पुष्कळ वेळा काही मिनिटांचाच काळ गेल्याचे दिसते. पण या काही मिनिटात पडलेले स्वप्न वर्षोगणती चालणाऱ्या घटनांचे असू शकते. तेव्हा मरणानुभव हा एक स्वप्नाचा प्रकार आहे. या विधानाला बाधा येत नाही.

गळतगे पाश्चात्य लोक साधारणपणे नास्तिक असतात, असे गृहीत धरून पाश्चात्यांच्या साक्षीला फार महत्त्व देत असतात. पण अंधश्रद्धा ही काही भारतीयांचीच मिरास नाही. अंधश्रद्धेची प्रवृत्ती भारताइतकीच पाश्चात्यांत देखील प्रबल आहे. तेव्हा अध्यात्माच्या बाजूने दिलेली साक्ष पाश्चात्यांची आहे, की भारतीयांची याला काहीही महत्त्व नाही.

## श्री. वऱ्हाडपांडे यांच्या प्रतिक्रियेला उत्तर *

श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांची माझ्या 'आपुले मरण पाहिले म्यां डोळां' या लेखावरील प्रतिक्रिया वाचून माझा लेख त्यांना 'Red rag' ठरला असल्याचे स्पष्टपणे जाणवले. (बैल तांबडे फडके दिसले की बिथरून एकदम हल्ला करतो, या इंग्रजी अर्थाने हा इंग्रजी शब्दप्रयोग करतात.) आता त्यांचे पहिलेच वाक्य पाहा, "वस्तुत: प्रा. गळतगे यांनी मांडलेल्या पुराव्यांवरून त्यांचा एकही दावा सिद्ध होत नाही."

"एकही दावा सिद्ध होत नाही" हे वाक्य वापरून असा आंधळा हल्ला

---

* हे उत्तर पैलतीर दिवाळी १९९५ या वार्षिकात प्रसिद्ध झाले.

करण्यापूर्वी वऱ्हाडपांड्यांनी थोडे लेखाच्या मथळ्याकडे लक्ष दिले असते तर बरे झाले असते. त्यांच्या मग लक्षात आले असते की, हे 'वैज्ञानिक संशोधन' आहे आणि ते गळतगे यांचे नाही, तर पाश्चात्य शास्त्रज्ञांचे आहे. त्यात काही 'दावे' केले असतील तर ते गळतग्यांनी केलेले नाहीत, तर पाश्चात्य शास्त्रज्ञांनी मरणानुभव्यांवरील शास्त्रीय संशोधनात मिळालेल्या वस्तुनिष्ठ पुराव्यांच्या आधारे केले आहेत. गळतग्यांचा संबंध फक्त त्या संशोधनाचा प्राचीन भारतीय ग्रंथातील काही कथानकांच्या संदर्भात अर्थ लावण्यापुरताच आहे. तो अर्थ चुकला असेल तर त्याबद्दल फक्त गळतगे जबाबदार आहेत. बाकीचे सर्व पाश्चात्य शास्त्रज्ञांचे आहे. तेव्हा वऱ्हाडपांड्यांनी गळतग्यांच्या नावाने 'साप साप' म्हणून भुई बडवण्याचे कारण नाही. हा शास्त्रीय सत्य सांगणारा लेख त्यांना Red rag ठरला असला तर गळतग्यांवर हल्ला का?

बरे, हा हल्ला करताना वऱ्हाडपांड्यांनी काही शास्त्रीय दृष्टी, निदान तर्कशुद्ध तरी दृष्टी बाळगली आहे काय? नाव नको ! हा शुद्ध आंधळा हल्ला आहे. तो कसा आंधळा आहे हे दाखवून देण्याची जबाबदारी त्या लेखाचा लेखक या नात्याने माझ्यावर येऊन पडली असून ती मला नाइलाजाने येथे विस्ताराने त्यांच्या प्रतिक्रियेचा विचार करून पार पाडावी लागत आहे. तेव्हा त्यांचे एकेक वाक्य वा मुद्दा घेऊ.

लेखात सांगितलेले अनुभव हे मरणानुभव नव्हेत हे दाखवून देण्यासाठी वऱ्हाडपांडे म्हणतात, "डॉक्टरांना मरणाचे अचूक निदान करणारी उपकरणे अजून सापडलेली नाहीत. अशी उपकरणे सापडली नसल्यामुळे डॉक्टरांनी केलेले मरणाचे निदान चूक होते. हे लोक वस्तुत: मेलेच नव्हते. तेव्हा त्यांचे अनुभव मरणोत्तर स्थितीतले अनुभव आहेत असे म्हणण्यास आधार काय?"

## मृत्यू खऱ्या अर्थाने केव्हा येतो ?

श्री. वऱ्हाडपांडे यांनी मरणाचे अचूक निदान करणारी उपकरणे डॉक्टरांना सापडलेली नाहीत हे विधान माझा लेख काळजीपूर्वक न वाचताच केले आहे. टीप -१ मध्ये मी या उपकरणांचा उल्लेख केला असून वैद्यकशास्त्रज्ञांनी मेंदूला पाच मिनिटांपर्यंत प्राणवायू मिळाला नाही तर त्या व्यक्तीचा मृत्यू होतो असे निश्चित केले आहे, अशी माहिती मी तेथे दिली आहे. तेव्हा वऱ्हाडपांड्यांचे मृत्यूच्या अचूक निदानाविषयीचे म्हणणे खरे नाही. शक्यता अशी आहे, की मी स्वत:च "वैद्यकशास्त्राला मृत्यूची प्रक्रिया अजून पूर्ण कळलेली नाही," असे विधान केले आहे. त्यामुळे त्यांनी असे म्हटले असावे. पण माझ्या विधानाच्या पाठीमागचा संदर्भ असा आहे, "प्राणवायूचा पुरवठा बंद झाल्यानंतर जिवंत राहाण्याची वैद्यकशास्त्राची निर्धारित पाच मिनिटांची मर्यादा ओलांडल्यानंतरसुद्धा कित्येक मिनिटांनी माणूस परत जिवंत झाल्याची उदाहरणे आहेत." याचा अर्थ वैद्यकशास्त्रज्ञांनी ठरवलेला 'मृत्यू' खोटा

आहे, म्हणजे ती व्यक्ती मेलीच नव्हती असा नसून, शारीरिक (मेंदूचे) मरण हे मरण नव्हे, तर वैद्यकशास्त्रीय दृष्ट्या मेंदूचा मृत्यू झाला तरी ती व्यक्ती मेली असे ठरत नसून 'मानसिक'दृष्ट्या ती मेली तरच खऱ्या अर्थाने मरते - म्हणजे परत जिवंत होऊ शकत नाही; आणि हे अजून वैद्यकशास्त्राला उमगलेले नाही असा माझ्या त्या विधानाचा अर्थ आहे. मनाचे शरीरावर विलक्षण परिणाम होतात, ही वस्तुस्थिती माझ्या या विधानाच्या पाठीमागे आहे. उदा. शरीरात नसलेले रोग मनाने निर्माण होतात, असलेले दुर्धर रोग अचानक नाहीसे होतात. (Spontaneous remission असे या प्रकाराला वैद्यकशास्त्र नाव देते) काही वेळा विस्तवाने शरीर भाजत नाही व संमोहनावस्थेत केवळ सूचनेने शरीरावर भाजल्याचे फोड उठतात इत्यादी गोष्टी मन हे शरीर व मेंदू यात बदल घडवून आणू शकते हे सिद्ध करतात. (याविषयीची अनेक उदाहरणे मी पैलतीर १९८६, ९१, ९२ * इत्यादी अंकांतील लेखांत साधार दिली आहेत) म्हणून मेंदूचा मृत्यू हा त्या व्यक्तीचा अंतिम मृत्यू मानता येत नाही, असा माझ्या त्या विधानाचा अर्थ आहे. वैद्यकशास्त्र जोपर्यंत मनाचे हे कारकत्व (agency) मान्य करत नाही, तोपर्यंत 'मेलेली' व्यक्ती परत कशी 'जिवंत' होऊ शकते हे कोडे त्याला सुटणार नाही. तोपर्यंत व्यक्ती 'मेली' तरी परत 'जिवंत' होते का, हे डीफिब्रिलेटरसारखी वैद्यक उपकरणे वापरून 'खडा टाकून' पाहण्याचे ('अंधारात चाचपडण्या'चे) डॉक्टर लोकांचे प्रयत्न चालू राहणारच! (वऱ्हाडपांडे म्हणतात तसे डॉक्टर त्या व्यक्तीला जिवंत करण्याचा प्रयत्न करीत होते, त्याअर्थी ती मेलीच नव्हती म्हणून नव्हे ! जी व्यक्ती 'मेली'च नाही तिला 'जिवंत' कसे करणार?) (कोणी म्हणेल की 'मेलेली' व्यक्ती 'जिवंत' होण्यास 'मन' कारणीभूत असेल तर त्या व्यक्तीला डॉक्टरांनी जिवंत करण्याचा प्रयत्न करण्याचे प्रयोजनच काय? आणि ती व्यक्ती डॉक्टरांच्या अशा प्रयत्नानंतर जिवंत होते हे कसे? हेच तर गूढ आहे! मनाचा व मेंदूचा कुठे, कसा संपर्क होतो याचे कोडे सुटले की काही लोक 'इच्छामरणी' कसे असतात हे कोडेही सुटेल. पण काही लोक इच्छामरणी असतात म्हणून मेलेल्या व्यक्तीला जिवंत करण्याचा डॉक्टरांनी प्रयत्नच करू नये असे ठरत नाही.)

## वऱ्हाडपांड्यांचे खोटे विधान

पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, "या व्यक्तींनी आपले अनुभव सांगितले ते खडखडीत बरे झाल्यावर." 'आपण वेडे ठरविले जाऊ' या भीतीने प्रारंभी काही मरणानुभव्यांनी आपले अनुभव इतरांना लगेच सांगितले नाहीत हे खरे असले, तरी

---

* पाहा : **विज्ञान आणि बुद्धिवाद** या ग्रंथातील प्रकरण २, ८, ९ इत्यादी

सर्व मरणानुभव्यांनी आपले अनुभव बरे झाल्यानंतर सांगितलेले नाहीत. बरे, त्यांनी आपले अनुभव नंतर सांगितले म्हणून ते मरणानुभव नव्हते असा निष्कर्ष वऱ्हाडपांडे कसा काढतात? हे स्पष्ट न करता पुढील धडधडीत खोटे विधान त्यांनी केले आहे, ''ते अनुभव स्पष्टपणेच उपचारामुळे त्यांची शुद्ध परत येऊ लागल्यावर आलेले आहेत.'' हे विधान त्यांनी कशाच्या आधारावर केले आहे? आणि तेही लेखात दिलेल्या मरणानुभवासंबंधीच्या सर्व माहितीकडे व पुराव्यांकडे दुर्लक्ष करून? शस्त्रक्रिया करताना काही लोकांना मृत्यू (Cardiac arrest) आलेला होता आणि हे त्यांनी शरीर सोडून छताजवळ जाऊन तेथून आपल्या शरीराकडे पाहिल्यामुळे ओळखले व आपले शरीर डॉक्टर लोक परत जिवंत करण्याचा कसा प्रयत्न करीत होते हे पाहिल्याचे डॉक्टरांना शुद्धीवर आल्यावर लगेच त्या प्रयत्नांचे इत्थंभूत वर्णन करून सांगितले आहे आणि ते सर्व वर्णन बरोबर असल्याचे आढळून आले आहे. अशा पुराव्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून ''उपचारामुळे त्यांची शुद्ध परत येऊ लागल्यावर'' हे अनुभव आले असे वऱ्हाडपांडे कसे म्हणतात? अपघातात वा युद्धभूमीवर 'मेलेल्या' व्यक्तीबाबत तर त्यांना मुळीच असे म्हणता येणार नाही. (अशा व्यक्तींची उदाहरणेही दिलेली आहेत.) तरीही ते असे म्हणण्याचे कारण मेंदूशिवाय हे अनुभव कसे येणे शक्य आहे हे त्यांच्यापुढे कोडे आहे! म्हणून हे सर्व (मेंदूशिवाय आलेले अनुभव) ''गळतग्यांचे व त्यांच्या पंथाच्या लोकांचे कल्पनाजाल आहे'' असे ते म्हणतात ! वऱ्हाडपांड्यांना हे माहीत नाही की, रेमंड मूडीचे **Life After Life** हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर ''हे सर्व मूडीचे कल्पनाजाल आहे'' असे अनेक शास्त्रज्ञही म्हणत होते. असे म्हणणाऱ्या शास्त्रज्ञांपैकी मायकेल सॅबोम या हृदयचिकित्सक शस्त्रवैद्याला शंभरावर रुग्णांचे अनुभव शास्त्रीय निकषावर तपासून पाहिल्यानंतर मूडीचे म्हणणे कल्पनाजाल नसून सत्य आहे हे स्वानुभवाने पटले व तो मूडीचा प्रचारक बनला! (त्याचा **Recollections of Death** हा ग्रंथ पाहा.) ब्रूस ग्रेसन या नास्तिक शास्त्रज्ञाचेही असेच झाले. या सर्व शास्त्रज्ञांना स्वत:च्या संशोधनातून जे शास्त्रीय पुरावे मिळाले ते वस्तुनिष्ठ असल्यामुळे आजपर्यंत ते कोणालाही नाकारता आलेले नाहीत. अशा रीतीने वऱ्हाडपांडे ज्याला 'गळतग्यांचा पंथ' म्हणतात, तो वस्तुत: कुठल्याही प्रकारचा पंथ नसून रोखठोक प्रयोगनिष्ठ वैज्ञानिक पुराव्यांनिशी सिद्ध झालेले शास्त्रीय सत्य आहे व बिनबुडाची विधाने करणाऱ्या वऱ्हाडपांड्यांचा 'विवेकवाद' हाच एक पंथ आहे. जो केवळ 'मते' मांडतो त्याला 'पंथ' म्हणतात. वऱ्हाडपांडे येथे आपली केवळ 'मते' मांडत आहेत. त्यांना आधुनिक पाश्चात्य वैद्यक व मानसशास्त्रज्ञांनी केलेल्या मरणानुभवासंबंधीच्या प्रयोगाधिष्ठित पुराव्यांविषयी काहीही माहिती नाही. पण हे आपले अज्ञान प्रांजळपणे मान्य करण्याऐवजी ते हेकटपणे पुराव्यांनाच 'कल्पनाजाल' म्हणत आहेत ! कारण उघड आहे. त्यांच्या 'विवेकवादी' दृष्टीला हे

पुरावे Red rag ठरले आहेत! म्हणून त्यांचे त्या पुराव्यांनाच बुलडोझिंग सुरू आहे!

## वऱ्हाडपांड्यांचे 'स्वप्न'रंजन !

पुढे वऱ्हाडपांडे म्हणतात, "हे अनुभव मरणोत्तर अनुभव नव्हते, त्याचप्रमाणे ते सत्यानुभव नसून स्वप्नासारखे भ्रमरूप होते हे स्पष्ट आहे. या अवस्थेतून गेलेल्या बहुतेकांना तसेच अनुभव आले हे त्या अनुभवाच्या सत्यतेचे प्रमाण होऊ शकत नाही. डोळ्यात बोट गेले की बहुतेक लोकांना दोन चंद्र दिसतात. पाण्यात बुडालेली काठी सगळ्यांनाच वाकडी दिसते."

येथे वऱ्हाडपांडे भौतिक घटना व मानसिक घटना यांची फार मोठी गल्लत करीत आहेत. ते भौतिक पातळीवरचे अनुभव मानसिक पातळीला लागू करीत आहेत ! त्यांनी दिलेली उदाहरणे भौतिक असल्यामुळे त्या पातळीवरचा तो अनुभव (दोन चंद्र दिसणे व काठी वाकडी दिसणे) सर्वांनाच येतो. उलट मरणानुभव सर्वांना येत नाही. कारण तो अनुभव येण्यासाठी माणसाला विशिष्ट मानसिक अवस्था प्राप्त व्हावी लागते. म्हणून हा अनुभव जर जास्त लोकांना येऊ लागला, तर ती विशिष्ट मानसिक अवस्था भ्रमरूप मानता येत नाही. वऱ्हाडपांडे 'मरणानुभव येणे' म्हणजे 'डोळ्यात बोट घातले की दोन चंद्र दिसणे' वा 'पाण्यात बुडालेली काठी वाकडी दिसणे' असे समजत असतील तर त्याच्या बुद्धिमत्तेचे कौतुक करावे तितके थोडेच!

पुढे ते म्हणतात, "अनुभव सत्य ठरण्यासाठी तो सत्यापनाच्या कसोटीवर उतरला पाहिजे." पण एवढेच म्हणून ते गप्प का बसले? मरणानुभव सत्यापनाच्या कसोट्यांवर कसा उतरत नाही हे त्यांनी दाखवून का दिले नाही? कारण उघड आहे. ते त्यांना दाखवून देताच येत नाही!

मरणानुभव स्वप्नवत् खोटा असल्याबद्दलचा पुरावा म्हणून "पुष्कळशी स्वप्नेदेखील सार्वत्रिक असतात" असे वऱ्हाडपांडे म्हणतात. मरणानुभवाची जी अकरा लक्षणे मी दिली आहेत त्यातील एकही लक्षण स्वप्नाचे नाही - मग ती सार्वत्रिक असणे दूरच ! ("पुष्कळशी स्वप्ने देखील सार्वत्रिक असतात" असे केवळ म्हटल्याने स्वप्नाविषयीचे देखील वऱ्हाडपांड्यांचे म्हणणे सिद्ध होत नाही. कोणती 'पुष्कळशी' स्वप्ने सार्वत्रिक असतात हे सुद्धा वऱ्हाडपांड्यांना सांगता आलेले नाही! त्यांनी फक्त दोन उदाहरणे दिली आहेत. एक बोगद्यातून जाणे व दुसरे आकाशात उडणे, पण ही स्वप्ने सार्वत्रिक म्हणायला किती वाचकांना पडतात?)

"आपल्या अतृप्त इच्छा स्वप्नात तृप्त करून घेण्याची मानवाची प्रवृत्ती" हे एक कारण ते पुढे करतात. पण मरणानुभवातील एकही लक्षण हे मानवाची अतृप्त इच्छा कसे तृप्त करते हे ते सांगू शकलेले नाहीत.

मरणानुभव स्वप्नवत् खोटा म्हणण्यापूर्वी मरणानुभवाच्या सत्यतेचे जे वस्तुनिष्ठ

पुरावे दिले आहेत त्यांचा त्यांनी का विचार केला नाही? शास्त्रीय दृष्टी असणारा कोणीही मनुष्य असे करणार नाही. तेव्हा मरणानुभवाची स्वप्नाशी तुलना करणाऱ्या वऱ्हाडपांड्यांजवळ शास्त्रीय दृष्टी नाही हे सिद्ध होते. पण शास्त्रीय दृष्टीबरोबर तर्कशुद्ध दृष्टीही त्यांच्याजवळ नाही हेही त्यामुळे सिद्ध होते; कारण ते म्हणतात त्याप्रमाणे मरणानुभव जर स्वप्नासारखा खोटा असेल तर स्वप्नातून जागे झाल्यावर ते स्वप्न होते, म्हणजे तो अनुभव खोटा होता, याची जशी जागे झालेल्या माणसाला लगेच जाणीव होते तशी मरणानुभवातून बाहेर आल्यानंतर मरणानुभव येणाऱ्यालाही तो अनुभव खोटा होता याची लगेच जाणीव व्हायला पाहिजे! तशी जाणीव होणे तर दूरच, उलट तो अनुभव जागृतीतील अनुभवापेक्षा त्या व्यक्तीला जास्त खरा वाटतो! आणि हा अनुभव क्षणिक नसतो, तर तो आयुष्यात कायमचा टिकतो. या गोष्टीची उपपत्ती कुठल्याही रूढ अनुभवाने देता येत नसल्यामुळे या मुद्यावर वऱ्हाडपांडे गप्प आहेत! अशा रीतीने मरणानुभव स्वप्न तर नाहीच, पण सामान्य अनुभवही नाही, हे मान्य करावे लागते.

## वऱ्हाडपांड्यांची आणखी खोटी विधाने

पुढे ते म्हणतात, ''एका 'पुनरुज्जीवित' माणसाला म्हणे **मृतावस्थेतून परत आल्यानंतर** आपल्याच शरीरावर डॉक्टर काय उपचार करीत होते हे स्पष्ट दिसले.'' (अक्षरांचा ठळकपणा माझा.) या लेखात असे मी कोठेच म्हटलेले नाही. हे निव्वळ खोटे विधान करून वऱ्हाडपांडे पुढे म्हणतात, ''गळतगे यांच्या हे लक्षात आले नाही, की हे उदाहरण त्यांच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध अनुमाने दृढ करते.'' गळतग्यांनी जे म्हटलेच नाही ते 'त्यांच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध अनुमाने' कसे 'दृढ' करील? आणि जे मी म्हटलेच नाही त्याच्या आधारे ते असा 'दृढ' अनुमान काढतात की ''म्हणजे मुळात ते अनुभव मरणोत्तर आहेत हेच मुळी खोटे.'' प्रतिपक्षाच्या तोंडी न केलेले विधान घालायचे, त्या न केलेल्या विधानाच्या आधारे खोटा निष्कर्ष काढून तो वाचकांच्या माथी 'खरा' म्हणून मारायचा आणि प्रतिपक्षाला बदनाम करायचे हा 'पराक्रम' केवळ वऱ्हाडपांड्यांचा पंथच ('विवेकवाद'च) करू शकतो!

पण या पंथाचा खरा 'पराक्रम' अजून पुढेच आहे. त्यांची पुढील विधाने पाहा, ''**डोळ्यांवाचून दिसू शकते. कारण दिसण्याची क्रिया मेंदूची आहे....** प्रत्यक्षाचा अनुभव इंद्रियांची मदत न घेता थेट मेंदूचे उद्दीपन केल्याने होऊ शकतो हे अनेक प्रयोगांनी सिद्ध केले आहे. मेंदूतील दृष्टिकेंद्रांना विजेने उद्दीपित केले की समोर वस्तू नसताही वस्तू दिसल्याचा भास होतो. तेव्हा **मेंदूला इंद्रियांच्या मदतीशिवाय झालेले प्रत्यक्ष ज्ञान अतींद्रिय असले** तरी 'आध्यात्मिक' वगैरे काही नाही.'' (अक्षरांचा ठळकपणा माझा.)

वरील अवतरणात मेंदू असेल तर डोळ्यांच्या वाचून माणसाला दिसू शकते असे स्पष्ट प्रतिपादन वऱ्हाडपांड्यांनी केले आहे. फक्त मेंदूच्या दृष्टिकेंद्रांना विजेने उद्दीपित केले की झाले! वऱ्हाडपांड्यांचा हा 'क्रांतिकारक' शोध वैद्यकशास्त्रज्ञांना माहीत नाही, हे त्यांचे किती मोठे दुर्दैव! कारण या शोधामुळे जगातील सर्व आंधळ्यांना दृष्टी मिळेल ! इतकेच नव्हे तर कोणालाही 'अतींद्रिय ज्ञान' हुकुमाने होईल!

पण वऱ्हाडपांड्यांच्या दृष्टीने या शोधाला आंधळ्यांना दृष्टी मिळणे, किंवा अतींद्रिय ज्ञान हुकुमाने होणे या दृष्टीने महत्त्व नसून "आध्यात्मिक वगैरे काही नाही" या दृष्टीने महत्त्व आहे ! म्हणजे 'अध्यात्म' खोटे ठरविण्यापुरताच हा त्यांचा शोध 'क्रांतिकारक' आहे!

**अध्यात्म खोटे ठरविण्यासाठी वऱ्हाडपांडे विज्ञानाच्या नावावर किती खोटे लिहू शकतात,** याचा त्यांचा वरील उतारा हा एक उत्कृष्ट नमुना आहे.

ज्या मेंदूच्या विद्युत उद्दीपनामुळे अतींद्रिय ज्ञान होते, डोळ्यांवाचून दिसू शकते यासारखी खोटी विधाने वऱ्हाडपांडे करतात, ती मेंदूच्या विद्युत उद्दीपनाची पद्धत विल्डर पेनफिल्ड या कॅनडाच्या मज्जाशास्त्रज्ञाने प्रथम शोधून काढली. या विद्युत उद्दीपन पद्धतीने प्रत्यक्ष दिसणे किंवा अतींद्रिय ज्ञान होणे असे वस्तुत: काहीच घडत नाही. फक्त त्या व्यक्तीच्या भूतकाळातील स्मृती जागृत होतात. (Flash-back) (त्याचे **The Mystery of the Mind** हे पुस्तक पाहा.) त्या स्मृती स्वत: त्या रुग्णाच्याच असतात. स्वत:च्या स्मृतीला अतींद्रिय ज्ञान म्हणणे हा 'अतींद्रिय ज्ञान' या शब्दांचा दुरुपयोग आहे. प्रत्यक्ष ज्ञान तर कशाचेच होत नाही. स्मृतीला कोणत्याही प्रकारे 'प्रत्यक्ष ज्ञान' म्हणता येत नाही. या पद्धतीने पेनफिल्डने जर काही सिद्ध केले असेल तर ते वऱ्हाडपांडे म्हणतात त्याच्या उलट ! म्हणजे अध्यात्म खरे आहे हेच त्याने सिद्ध केले आहे ! कारण या पद्धतीने मिळालेल्या पुराव्यामुळे मन हे मेंदूहून स्वतंत्र तत्त्व आहे हे पेनफिल्डला मान्य करावे लागले. (याच्यापूर्वी तोही इतर शास्त्रज्ञांप्रमाणे मेंदू हेच मनाचे अधिष्ठान आहे असे समजत होता. आता मात्र तो 'मेंदू हे कॉम्प्युटर व मन हे प्रोग्रॅमर' (कॉम्प्युटरमध्ये माहिती भरणारा) म्हणू लागला. वस्तुत: त्याच्या पुस्तकातील एका प्रकरणाचा हाच मथळा आहे.) अशा रीतीने मनाचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करून पेनफिल्डने मरणोत्तर अस्तित्वाला मज्जाशास्त्रीय पुरावा मिळवून दिला आहे.

हे स्वतंत्र मनच देहापासून सुटे झाल्यावर 'जीवात्मा' म्हणवून घेते. देहापासून सुटे होऊन मरणानुभवात ते स्वत:चे शरीर पाहते तेव्हा त्याचे ते प्रत्यक्ष ज्ञान असते; अतींद्रिय ज्ञान नसते. हे कशावरून हे मी पृ. ११४ वर सोदाहरण स्पष्ट केले आहे. वऱ्हाडपांडे ते अतींद्रिय ज्ञान समजतात, कारण त्यांना अतींद्रिय ज्ञानासाठी मेंदूची

आवश्यकता आहे असे वाटते. एरव्ही ते बुद्धिवादी असल्यामुळे अतींद्रिय ज्ञानसुद्धा त्यांनी मान्य केले नसते ! पण ते मान्य केले नाही तर मरणानुभवात जे ज्ञान होते त्याची कसलीच उपपत्ती त्यांना देता येत नाही ! पण अतींद्रिय ज्ञान मान्य करूनही मरणानुभवाची उपपत्ती देता येत नाही ! ती देता येत नसल्यामुळेच त्यांनी वरीलसारखी खोटी विधाने केली आहेत ! अतींद्रिय ज्ञान मान्य करून हा मरणानुभवाचा सौदा पटवण्याचा त्यांचा प्रयत्न अशा रीतीने अध्यात्म सिद्ध करणाऱ्या मुर्दाड शास्त्रीय पुराव्यामुळे फोल ठरला आहे ! " 'अध्यात्म' वगैरे काही नाही " हे सिद्ध करण्यासाठी त्यांनी दिलेले उदाहरणच अशा रीतीने अध्यात्म सिद्ध करीत असल्यामुळे शेवटी ते त्यांना बुमरँग ठरले आहे ! आणि यातील गंमत अशी की हे त्यांना स्वत:ला माहीत नाही.

## वऱ्हाडपांड्यांनी हे संशोधन अशास्त्रीय असल्याचे सप्रमाण दाखवून द्यावे

पुढील दोन्ही गोष्टीबाबत मी काहीच पुरावा दिलेला नाही असे वऱ्हाडपांडे म्हणतात : (१) या व्याधितांनी पुनरुज्जीवित केलेल्या लोकांवर काय उपचार केले जातात याचे मरणासन्न होण्यापूर्वी ज्ञान संपादन केले नव्हते. (२) त्यांनी दिलेले निवेदन हे शुद्धीवर आल्यावर लगेच केले होते.

वस्तुत: हे पुरावे नसून शास्त्रीय संशोधन करताना पाळावयाची पथ्ये किंवा वापरावयाचे निकष आहेत. माझा लेख पुराव्यापुरताच मर्यादित आहे. शास्त्रीय संशोधन करताना शास्त्रज्ञांनी आवश्यक ती पथ्ये कितपत पाळली, योग्य निकष वापरले आहेत की नाहीत हे तपासणारा तो टीकालेख (Critique) नाही, पण माझ्या या लेखात मी ज्या ग्रंथांचे संदर्भ दिले आहेत, त्यांचे लेखक व ज्या शास्त्रज्ञांचे संदर्भ दिले आहेत ते शास्त्रज्ञ एक तर स्वत: मरणानुभवी आहेत किंवा मरणानुभव्यांवरील शास्त्रीय संशोधक आहेत. त्यांनी वरील दोनच नव्हे तर इतरही अनेक निकष लावून हे संशोधन केले आहे. हे त्या शास्त्रज्ञांचे मूळ ग्रंथ वाचून खात्री करून घेता येईल. वऱ्हाडपांड्यांना या संशोधनात अशास्त्रीयतेचा संशय येत असेल तर त्या शास्त्रज्ञांचे मूळ ग्रंथ वाचून हे संशोधन अशास्त्रीय असल्याचे दाखवून द्यावे.

वऱ्हाडपांड्यांनी पुंजभौतिकीसंबंधी 'गळतगे यांचा दावा' (अर्थात 'केनेथ रिंग यांचा दावा' असे म्हणावयास हवे होते.) असे म्हणून जे लिहिले आहे ते पूर्ण गैरलागू आहे. केनेथ रिंगसारख्या शास्त्रज्ञाला आपल्याला जे कळते ते कळत नाही असे वऱ्हाडपांडे समजतात काय? तसेच 'गळतगे यांच्या पंथाच्या लोकांना' असे म्हणून ते जे काही लिहितात तेही सर्व गैरलागू आहे. वेदातील ऋचांत पुंजभौतिकी आहे असे कोण म्हणतो? आणि त्याचा वऱ्हाडपांडे येथे कशासाठी उल्लेख करतात? सायणाचार्यांना वेदात पुंजभौतिकी दिसली नाही अशी प्रौढी मिरवण्यापूर्वी पुंजभौतिकी

म्हणजे काय हे सायणाचार्यांना माहीत असेल तर ती त्यांना वेदात दिसेल ! ही साधी गोष्ट वऱ्हाडपांड्यांना कशी कळली नाही?

मेंदूवर परिणाम करणाऱ्या मादक व स्वापक द्रव्यांनी केलेले परिणाम व अध्यात्माचे परिणाम यात काही फरक नाही असे म्हणणारे वऱ्हाडपांडे, मी उदाहरणादाखल दिलेल्या व्यक्तींच्या जीवनात मरणानुभवामुळे जसे परिणाम व बदल घडून आले तसे परिणाम व बदल मादक द्रव्याने घडून आल्याचे एक तरी उदाहरण देऊन सिद्ध करतील काय? बार्बारा हॅरिस या बाईच्या जीवनात व व्यक्तिमत्वात झालेला बदल, तिला प्राप्त झालेली अतींद्रिय शक्ती या गोष्टी भांग व गांजा यामुळे प्राप्त होऊ शकतात व घडून येऊ शकतात, असे वऱ्हाडपांडे पूर्ण जबाबदारीने म्हणू शकतात काय?

## कोण स्वत:ची अंधश्रद्धा कुरवाळतो ?

शेजारच्या खोलीत उपचार घेत असलेली बहीण मेली याचे ज्ञान एका मरणानुभव घेतलेल्या व्यक्तीला झाल्याबद्दल जे उदाहरण मी दिले आहे, त्याला उद्देशून "हे कसे तरी करून आपल्या अंधश्रद्धांना कुरवाळणे होय" अशी मल्लीनाथी 'गळतगे' हे नाव वापरून वऱ्हाडपांड्यांनी केली आहे. ज्या शास्त्रज्ञाच्या निरीक्षणाचे हे उदाहरण मी दिले आहे, त्या शास्त्रज्ञाला वऱ्हाडपांड्यांइतकेही कळत नाही असे ही मल्लनाथी करून त्यांना सुचवायचे आहे काय? डॉक्टर व शास्त्रज्ञसुद्धा अंधश्रद्ध असू शकतात. पण ते आपल्या खासगी जीवनात. ज्या क्षेत्रात शास्त्रीय संशोधन करायचे त्या क्षेत्रात जर त्यांनी अंधश्रद्धा बाळगली तर त्यांच्या शास्त्रीय संशोधनाचा फज्जा उडायला वेळ लागणार नाही. मी उल्लेख केलेल्या शास्त्रज्ञांच्या मरणानुभवावरील शास्त्रीय संशोधनाचा प्रतिवाद पुराव्यानिशी अजून वऱ्हाडपांड्यांच्या पंथातील एकही बुद्धिवादी करू शकलेला नाही हे महत्त्वाचे आहे. वस्तुत: आपल्या बुद्धिवादात जे बसत नाही ते सर्व शास्त्रीय पुरावे असतानाही खोटे मानणे, हेच एक प्रकारे आपली 'बुद्धिवादी अंधश्रद्धा' कुरवाळणे आहे.

"वस्तुत: पृथ्वीच चालत असताना प्रत्यक्षाला सूर्य चालताना दिसतो यावरून प्रत्यक्षाने होणारे ज्ञान खरे नसते असा अजब निष्कर्ष गळतगे यांनी काढला आहे," असे वऱ्हाडपांडे म्हणतात. "भौतविज्ञानाच्याही दृष्टीने प्रत्यक्ष प्रमाण नेहमीच सत्य ज्ञान करून देऊ शकते असे नाही." असे मी म्हटले असून, हे कसे ते दाखवून देण्यासाठी सूर्याच्या गतीचे उदाहरण मी दिले आहे आणि मी दिलेले उदाहरण चुकीचे नाही हे दाखवून देण्यासाठी "म्हणून विज्ञानाचे अनुमान प्रमाण हेच मुख्य प्रमाण मानले गेले आहे" असे मी पुढे म्हटले आहे. आणि वऱ्हाडपांडेही "अशा चुका होतात (म्हणजे प्रत्यक्षाने नेहमीच सत्यज्ञान होऊ शकत नाही) म्हणून. साऱ्या

प्रत्यक्षांची संगती लावण्याचे काम अनुमानाचे आहे'' असे म्हणून माझ्या विधानाला पुष्टीच देतात! मग मी 'अजब निष्कर्ष' काढला आहे असे ते कसे म्हणतात? मी तसा निष्कर्ष काढला नसून स्वत: वऱ्हाडपांडेच तसा तो काढतात व माझ्यावर लादतात. वर मला ज्ञानशास्त्राची माहिती नसल्याचा जावईशोध लावतात!

वऱ्हाडपांड्यांचे बाकीचे मुद्दे किरकोळ व विचार करण्यासारखे नाहीत.

**टीप :** रूढ श्रद्धांना धक्का देणाऱ्या कोणत्याही नव्या संशोधनाची ताकद संशयवाद्यांच्या टीकेमुळेच वाढते. अशी टीका करणाऱ्या वऱ्हाडपांड्यांसारख्या लोकांची म्हणूनच नितांत गरज आहे. जे संशोधन वैज्ञानिक म्हणवून घेते ते सर्व प्रकारच्या टीकेला तोंड दिल्याशिवाय खरे ठरून विज्ञान जगात स्वीकृत होत नाही.

## 'आपुले मरण पाहिले म्यां डोळां' या लेखाविषयीचे एक निवेदन *

**आपुले मरण पाहिले म्यां डोळां ।**
**तो झाला सोहळा अनुपम ।।**

हा तुकारामांचा एक प्रसिद्ध अभंग आहे. या अभंगाचा पहिला चरण पैलतीर ९४ च्या अंकातील माझ्या एका लेखाचा मथळा आहे. (प्रस्तुत ग्रंथातील १० वे प्रकरण) जे लोक मेले आहेत असे डॉक्टरांनी अधिकृतपणे जाहीर केले, पण नंतर वैद्यकीय उपचारामुळे पुन्हा जिवंत झाले, अशा लोकांना आपल्या मृत्यूनंतर आलेल्या अनुभवाचे वर्णन मी त्या लेखात केले असून त्यांच्या अनुभवांवर वैद्यक व मानस शास्त्रज्ञांनी केलेल्या सखोल शास्त्रीय संशोधनाची माहितीही त्यात साधार दिली आहे. तो लेख ज्यांनी वाचला आहे त्यांना त्यात मरून जिवंत झालेल्या लोकांच्या अनुभवांना तुकारामांचा वरील अभंग कसा चपखल लागू होतो याची यथायोग्य कल्पना येईल.

पहिली गोष्ट म्हणजे स्वत:चे मरण स्वत:च्या डोळ्यांनी पाहणे शक्य नाही. पण तुकारामांनी आपण ते पाहिल्याचे म्हटले आहे आणि मरून जिवंत झालेल्या लोकांनी देखील आपले मरण आपल्या डोळ्यांनी पाहिल्याचे म्हटले आहे आणि त्यांचे ते म्हणणे खरे असल्याचे शास्त्रीय संशोधकांनी वस्तुनिष्ठ पुराव्यांनिशी सिद्ध केल्याचे त्या लेखात दाखवून दिले आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे मृत्यू आणि वेदना (किंवा मृत्यू आणि दु:ख) यांचे

---

* हे निवेदन पैलतीर १९९४ च्या अंकात प्रसिद्ध झाले.

समीकरण प्रसिद्ध व सर्वमान्य आहे. पण तुकारामांनी आपल्या मृत्यूचा सोहळा झाला असे म्हटले आहे; आणि त्या लेखातही आपले मरण पाहिलेल्या सर्व लोकांना तो एक प्रकारचा सोहळा वाटला व त्यांनी तो सोहळा - त्या सोहळ्याचा आनंद - शब्दांनी वर्णन करण्यापलीकडचा असल्याचे म्हणजे तो 'अनुपम' असल्याचे म्हटले आहे. तात्पर्य, तुकारामांनी तो अभंग कल्पनेने लिहिलेला नसून त्यांच्या स्वानुभवावर तो आधारलेला आहे असे म्हणावे लागते. तुकारामांचा मरणानुभव शास्त्रीयदृष्ट्या सत्य असल्याचे आता आधुनिक शास्त्रीय संशोधनाने सिद्ध झाल्याचे तो लेख वाचलेल्या कोणत्याही वाचकाला पटल्याशिवाय राहणार नाही असे वाटते.

याचा अर्थ तुकाराम मेले, पुन्हा जिवंत झाले आणि मग त्यांनी हा अभंग लिहिला असा अर्थातच नाही. याचा अर्थ इतकाच की, ज्या लोकांचा मरणानुभव त्या लेखात वर्णिलेला आहे त्यांनी तो मरणानुभव घेतल्यामुळे त्यांच्या जीवनात जसे आध्यात्मिक परिवर्तन घडून आले तसे परिवर्तन घडून येण्यासाठी प्रत्यक्ष मेले पाहिजे व पुन्हा जिवंत झाले पाहिजे असे काही नाही, तर न मरता सुद्धा हा आध्यात्मिक परिवर्तनाचा अनुभव घेता येतो किंवा तसा परिणाम घडून येतो हे तुकारामांच्या अनुभवावरून दिसून येते. पण त्यासाठी तुकारामांच्यासारखी योग्य मनोभूमी पाहिजे व त्यात शुद्ध आध्यात्मिक बीजारोपण झाले पाहिजे. हे अर्थात सर्वांच्या बाबतीत शक्य नाही. एखाद्या तुकारामांच्यासारख्या किंवा लेखात वर्णिलेल्या व्यंकटरमण नावाच्या मुलासारख्यांच्या बाबतीतच (हेच पुढे रमण महर्षी झाले.) असे घडणे शक्य आहे. मग ज्यांना हे शक्य नाही त्या सर्व लोकांना अशा आध्यात्मिक परिवर्तनाला किंवा प्रगतीला कायमचेच मुकावे लागणार असे समजायचे काय? असे समजण्याचे कारण नाही हेच माझ्या त्या लेखातील शास्त्रीय संशोधनाधिष्ठित प्रतिपादन आहे.

पण हे आध्यात्मिक परिवर्तन व प्रगती अत्यंत खडतर मार्गानेच घडून येणे शक्य आहे, असे या विषयावरील शास्त्रीय संशोधनाने दिसून आले आहे एवढे मात्र खरे. पाश्चात्य जगात अपघात, हृदयरोग यासारख्या प्रसंगातून येणाऱ्या अचानक मृत्यूमुळे मरणानुभव येणाऱ्या लोकांची वाढती संख्या पाहता असे वाटते की, भौतवादी तत्त्वज्ञान जगणाऱ्या म्हणजे मानवी जीवनात अध्यात्म वगैरे काही नाही असे तत्त्वज्ञान प्रतिपादणाऱ्या पाश्चात्य संस्कृतीतील लोकांचे 'डोळे' आध्यात्मिकदृष्ट्या उघडण्यासाठी 'मरणानुभव' ही वैयक्तिक पातळीवरची एक निसर्गाची मूलभूत मानसशास्त्रीय योजना आहे असे दिसते. दुसरी सामूहिक पातळीवरची, मूलभूत नसली तरी, वैकल्पिक 'नैसर्गिक' योजना म्हणजे याच भौतवादातून जन्मलेल्या भयानक अण्वस्त्रांच्या शोधामुळे (हा शोधही पाश्चात्यांचाच!) संभाव्य ठरलेल्या तिसऱ्या महायुद्धातील प्रचंड मानवसंहार ! मरणानुभवासारखी वैयक्तिक पातळीवरची

योजना असो अगर अण्वस्त्रामुळे होणारा सामूहिक मानव संहार असो, दोन्हीही निसर्गाच्या योजना मरणांतकच, यात मात्र संशय नाही. आध्यात्मिक प्रगतीसाठी त्या कोणी स्वेच्छेने पसंत करतील असे वाटत नाही.

पण हजारो वर्षापूर्वी म्हणजे ऋग्वेद काली आपल्या ऋषीमुनींनी मृत्यूच्या (मग तो मृत्यू वैयक्तिक पातळीवरील असो अगर सामूहिक पातळीवरील असो) भयानक अंधाऱ्या बोगद्यातून गेल्याशिवाय आध्यात्मिक प्रकाश दिसणारच नाही ही, (आधुनिक मरणानुभवावरील शास्त्रीय संशोधनातून स्पष्ट झालेली) कल्पना नचिकेतासारख्या कथानकाद्वारे खोडून काढली आहे आणि हा संदर्भ उघड करून दाखवून देण्यापुरताच त्या लेखात माझा स्वत:चा सहभाग आहे. एरव्ही लेखातील बाकीचे सर्व प्रतिपादन पाश्चात्य शास्त्रज्ञांचे आहे. मी उघड करून दाखविलेला संदर्भ स्वीकारायचा की नाही, हे ठरविण्यास वाचक स्वतंत्र आहेत. पण पाश्चात्य शास्त्रज्ञांचे शास्त्रीय संशोधन स्वीकारायचे की नाही हा प्रश्नच नाही.

माझा लेख 'पैलतीर' मध्ये प्रसिद्ध करतेवेळी संपादक वाचकांच्या प्रतिक्रिया मागवणार आहेत, याची मला कल्पना नव्हती. अर्थात, त्यांनी त्या मागवल्या हे योग्यच केले. तथापि, ज्या अनेक शास्त्रज्ञांनी स्वत:चे आयुष्य या विषयाच्या शास्त्रीय संशोधनाला वाहून घेतले व हजारो मरणानुभव्यावरील संशोधनाने अनेक वर्षांच्या परिश्रमाने वस्तुनिष्ठ पुरावे काळजीपूर्वक गोळा केले, ते सर्व पुरावे ठोकरून स्वत:ची 'बुद्धिवादी अंधश्रद्धा' कुरवाळणारे वऱ्हाडपांड्यांसारखे बुद्धिवादी आपली 'अशी' (या अंकात प्रसिद्ध झालेली) प्रतिक्रिया पाठवतील असे मात्र मला मुळीच वाटले नव्हते. ज्यांच्या प्रकृतीला अध्यात्म मानवत नाही अशा लोकांना त्या विषयीचे कितीही विज्ञानसिद्ध पुरावे दिले तरी काहीही उपयोग नाही. जन्मजात किंपुरुष असलेल्या शिखंडीपुढे मेनका उभी केली तर तिचा त्याच्यावर काही परिणाम होईल काय? पण जे प्रामाणिक (वैज्ञानिक दृष्टी बाळगणारे) बुद्धिवादी असतील त्यांच्यासाठी खालील ग्रंथ वाचण्याची मी येथे शिफारस करीत आहे. हे सर्व ग्रंथ वाचणे ज्यांना शक्य नाही त्यांनी निदान ग्रंथ क्रमांक ३, ४ आणि ५ हे ग्रंथ अवश्य वाचावेत. ग्रंथ क्रमांक ४ हा मरणानुभवाचे शास्त्रीय संशोधन कसे करावे याचा वस्तुपाठच आहे. क्रमांक ५ हा ग्रंथ मरणानुभव्यावर या अनुभवाचे जे परिणाम होतात, त्यांचे शास्त्रीय मूल्यमापन कसे करावे हे दाखवून देतो. ज्यांना स्वत: मरणानुभव घेणाऱ्यांचे अनुभव व विचार त्यांच्याच शब्दात वाचावयाचे असतील त्यांनी क्रमांक १० व १२ हे ग्रंथ वाचावेत. त्या ग्रंथाच्या लेखिका विदुषी असून या अनुभवामुळे त्या स्वत:च या विषयाच्या संशोधक बनल्या आहेत.

1. **Life After Life**, by Raymond A. Moody, Jr. 1975 (New-York, Bantam Books)

2. **Reflection on Life After Life**, by Raymond A. Moody, Jr. 1977 (New-York, Bantam Books)

3. **Life at Death**, by Kenneth Ring, 1980 (New-York Coward, Mecann & Geoghegan)

4. **Recollections of Death**, by Michael Sabom, 1982 (New-York, Harper & Row)

5. **Heading Toward Omega**, by Kenneth Ring, 1984 (New-York, William Morrow)

6. **The Near-Death Experience**, edited by Bruce Greyson and Charles Flynn, 1984 (Springfield, IL: Charles C. Thomas)

7. **The Final Choice**, by Michael Grosso 1985 (Walpole, NH: Stillpoint press)

8. **Otherworld Journeys**, by Carol Zaleski, 1987 (New-York, Oxford University press)

9. **The Light Beyond**, by Raymond A. Moody Jr. 1988 (New-York Bantam Books)

10. **Coming Back to Life**, by P. M. H. Atwater 1988 (New-York, Ballantine Books)

11. **The Return From Silence**, by D Scott Rogo, 1989 (Welingborough, England Aquarian press)

12. **Full Circle**, by Barbara Harris and Lionele Bascom Pocket-Book, 1990 (New-York).

■■■

### प्रकरण अकरावे

# शून्यातून वस्तुनिर्मिती - अर्थात सूर्यविज्ञान

*पाहिजे कवण हे आघवे विये ।*
*तेंच मूळ ते शून्य ।।*

*- ज्ञानेश्वर*

---

**श्री.** सर्जेराव रामचंद्र पाटील हे ममदापूर, ता. चिकोडी, जि. बेळगांव येथील माझ्या परिचयाचे पन्नाशीतील गृहस्थ असून त्यांचे मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाले आहे. त्यांना आलेला एक अनुभव त्यांच्याच शब्दात खाली देत आहे.

"१९६५ साली जानेवारी महिन्यात मी निपाणी येथील आंबले यांच्याकडे दुरुस्तीला टाकलेला गुऱ्हाळाचा चरखा (घाण्याचे दिंड) आणण्यासाठी बैलगाडी घेऊन चाललो होतो. मी व श्री. भाऊसाहेब दादू पाटील (वय ६७) हा अशिक्षित गाडीवान असे दोघेच गाडीत होतो. निपाणीच्या रस्त्यावर अक्कोळ हे गाव लागते. त्या गावातून जात असताना आमच्या गाडीच्या पाठीमागून एक माणूस चालत येत असलेला दिसला. तो धोतर, सदरा, व पांढरी टोपी अशा साध्या कपड्यात होता. गावाबाहेर गाडी गेल्यानंतर त्या माणसाने मला विचारले, "मी गाडीत बसू का?" मी म्हटले, "बसा." गाडीत बसल्यावर तो म्हणाला, "मी निपाणीला चाललो आहे" मी म्हटले, "आमचे बैल सावकाश जाणार. तुम्हाला चालेल काय?" तो माणूस म्हणाला, "चालेल. शेवटी निपाणीला पोहोचतील ना?"

"थोड्या वेळाने ते गृहस्थ म्हणाले, "आपला वेळ कशी जाणार? काही तरी

करमणूक करू.'' असे म्हणून त्यांनी माझे नाव विचारले. मी नाव सांगितले. त्यावरून त्यांनी लगेच माझी रास (मीन), घात-वार, घात-तिथी इत्यादी सांगितले. आणि हे सर्व बरोबर होते. हे त्यांनी पंचांग न बघता सांगितले होते, नंतर त्यांनी माझे भविष्य सांगितले. ते असे - मी ऊस लावला असला तरी माझ्या हातात खोडवीच उरणार. म्हणजे अतिशय नुकसान होणार. हे भविष्य नंतर खरे ठरले. कारण गुळाला मंदी आली. ३० पैसे किलोप्रमाणे गूळ विकला, व केलेले सर्व श्रम फुकट गेले. फायदा तर झाला नाहीच. उलट नुकसान झाले. नंतर त्यांनी दुसरे एक भविष्य सांगितले. ते असे - ''तुमच्या घरी एक मंगल कार्य होणार आहे.'' मी म्हटले, ''ते कसे काय?'' ते म्हणाले, ''तुमचे आजोळ कोणते? तुमचे मामा आहेत ना?'' मी म्हटले, ''आहेत.'' ते म्हणाले, ''तुमच्या मामांना एकच मुलगी आहे ना?'' मी म्हटले, ''होय.'' ते म्हणाले, ''तुमच्याकडे ते मुलगी देण्यास येणार आहेत.'' मी म्हटले, ''शक्य नाही. कारण त्यांच्यात आमच्यात वितुष्ट आहे.'' पण नंतर हे भविष्य खरे ठरले. ते खरोखरच आले व आमच्या मधल्या (धाकट्या) भावाला त्यांनी मुलगी दिली.

''नंतर लखनापूर हे गाव आले. त्यांनी बिडी काढली व ती ओढू लागले. मला ''ओढता काय?'' म्हणून त्यांनी विचारल्यानंतर मी ''नाही'' म्हटले, व ''मी पान खात असतो'' असे म्हणालो. ''पण आता निपाणीशिवाय पान मिळणार नाही'' असेही म्हणालो. नंतर आम्ही गाडीतील जागा सहज बदलली व मी सहज म्हणालो, ''दोन वाजले असतील.'' तेव्हा ते म्हणाले, ''तुम्हाला खरोखरच पान हवंय काय?'' मी म्हटले, ''होय.'' लगेच त्यांनी मला पुढे हात करायला सांगितले. मी हात पुढे केला. ''ही करमणूक म्हणून करू,'' असे म्हणून त्यांनी बिडी बंडलच्या कागदाचा लहानसा तुकडा काढून तो माझ्या हातावर ठेवला व म्हणाले, ''हे पान व 'हे पान' असे म्हणा.'' नंतर पानाच्या विड्याला लागणाऱ्या सर्व वस्तूंची नावे घेऊन प्रत्येक वेळी गाडीतीलच एखादा कसला तरी कचऱ्याचा तुकडा घेऊन ते सर्व माझ्या हातावर ठेवून दिले. नंतर त्यांनी मला सूर्याकडे पाहायला सांगितले व त्या सर्व वस्तू आपल्या चिमटीत घेतल्या व चिमटीतून माझ्या तोंडात सोडल्या. मी तोंड मिटून गप्प बसलो. थोड्या वेळाने ते म्हणाले, ''पाटील, तुम्ही पान खाल्लं आहे. पण तुम्ही पान खाल्ल्याप्रमाणे तोंड हलवत नाही.'' नंतर मी उगीचच तोंड हालवले. तोंड हालवताच पानाच्या विड्याचा नेहमीप्रमाणे तोंडात चोथा तयार झाला, व मी एकदम घाबरलो. मला घाम फुटला. त्यांनी माझी भीती घालवण्यासाठी म्हटले, ''ही काही भोंदूगिरी नाही व जादूही नाही. तुम्ही खरोखरच पानाचा विडा खाल्लेला असून हा सूर्यविज्ञानाच्या प्रक्रियेचा परिणाम आहे. तुम्हाला सूर्याकडे पाहण्यास मी त्याच कारणासाठी सांगितले.''

"त्यानंतर त्यांनी सूर्यविज्ञानाची बरीच माहिती दिली. ती सर्व मला नवीन होती. नंतर मी स्वत:ची खात्री करण्यासाठी पानाचा चोथा थोडा हाताने बाहेर काढून प्रत्यक्ष पाहिला, तर ते खरोखरच पान होते. नंतर निपाणीला पोचेपर्यंत तोंड हालवावे तसे पान तयार होतच होते. निपाणीला पोहोचल्यानंतर एका पानपट्टीच्या दुकानाच्या आरशात मी स्वत:चे तोंड पाहिले, तेव्हा तोंड (ओठ) लाल रंगलेले होते. नंतर ते म्हणाले, "तुम्ही सर्व थुंका." त्याप्रमाणे थुंकताच सर्व पान संपले. पुन्हा ते तयार झाले नाही.

"दुसरी एक गोष्ट त्यांनी आम्हाला सांगितली, ती अशी की पाठीमागून एस. टी. बस येणार नाही. आणि खरोखरच निपाणीला पोहोचेपर्यंत एकही बस आली नाही. गाडीवानाचे एक भविष्य त्यांनी सांगितले. ते असे की, हा रखडतच आयुष्य घालवणार आणि तसेच झाले. तसेच, "बैल चालत असलेले दिसतील. पण गाडी जागची हालणार नाही, असा प्रयोग करू का?" असे त्यांनी आम्हाला विचारले. आम्ही "नको" म्हटले.

"निपाणीत पोहोचल्यावर त्यांनी आम्हाला दोन रुपयांची नोट काढून आम्हाला 'चहा प्या' असे म्हणून देऊ केली. आम्ही ती घेतली नाही. ते म्हणाले, "मी परान्न खात नाही, तेव्हा मी तुमच्याबरोबर येऊ शकत नाही. मी आता जातो." आम्ही त्यांचे नाव व पत्ता विचारला. पण त्यांनी काही सांगितले नाही. पण ते शुद्ध मराठीत बोलत होते. त्यावरून ते महाराष्ट्रीय असावेत असे वाटले."

सही (इंग्रजीत)<br>
(सर्जेराव पाटील)<br>
मु. पो. ममदापूर,<br>
ता. चिक्कोडी, जि. बेळगाव.<br>
ता. ५-८-१९८०

वरील घटना काही वाचकांना कपोलकल्पित वाटेल. पण नेमकी अशीच घटना प्रसिद्ध इंग्रजी लेखक पॉल ब्रंटन याने आपल्या **A Search In Secret India** (अज्ञात भारताचा शोध) या ग्रंथात वर्णिली आहे. काशी येथे राहणारे प्रसिद्ध स्वामी विशुद्धानंदजी यांच्या सूर्यविज्ञानाच्या साहाय्याने विशुद्धानंदानी पॉल ब्रंटनसमोर एक मेलेली चिमणीही जिवंत करून दाखवली असल्याचे त्याने लिहिले आहे.

प्रसिद्ध उत्तर भारतातील तत्त्ववेत्ते पं. गोपीनाथ कविराज यांचे योगी विशुद्धानंद हे आध्यात्मिक गुरू. त्यांनी आपल्या गुरूच्या या सूर्यविज्ञानाविषयी क्वीन्स कॉलेजमधील भौतविज्ञानाचे प्राध्यापक अभय संन्याल यांना एकदा सांगितले. तेव्हा ते म्हणाले,

"असे काही विज्ञान नाही. ज्याना सायन्सचा गंध नाही अशा अडाणी लोकांपुढे असे चमत्कार दाखवून बाबाजी त्यांना मुग्ध करून टाकतात. पण आम्ही शास्त्रज्ञ त्यांच्या सूर्यविज्ञानावर विश्वास ठेवत नाही. सूर्याच्या किरणापासून कोणत्याही स्थितीत जड वस्तू निर्माण करता येणे शक्य नाही."

कविराजांनी फार आग्रह केल्यामुळे प्रोफेसर संन्याल विशुद्धानंदांच्या आश्रमात यायला व हा प्रयोग पाहायला तयार झाले. तेथे गेल्यावर त्यांनी बाबाजींना सांगितले, "तुमच्या पसंतीने नव्हे, तर आम्ही सांगू ती वस्तू सूर्यकिरणातून तुम्ही उत्पन्न करून दाखवली तर आपला सिद्धांत बरोबर आहे असे आम्ही मानू." बाबाजींनी विचारले, "कोणती वस्तू उत्पन्न करू?" प्रा. संन्याल म्हणाले, "रेड ग्रॅनाईट स्टोन." बाबाजींनी मनुका ठेवलेल्या डबीतून कापराचा एक तुकडा घेतला व थोड्या अंतरावर ठेवून त्याच्यावर लेन्सने प्रकाश पाडण्यास सुरुवात केली. कापराचा पांढरा रंग हळूहळू बदलत जाऊन लाल होत गेला व दोन-तीन मिनिटात तो खड्यासारखा कठीण होत गेला. काही वेळाने तो लाल ग्रॅनाईटचा दगड बनला. प्रा. संन्यालनी शंका काढली, "स्वामीजी आपल्याला तर विज्ञान माहीत नाही. आपण हा दगड योगबलाने उत्पन्न केला असावा. थोड्या वेळाने तो अदृश होईल." स्वामीजी म्हणाले, "नाही. हा दगड सूर्य किरणांच्या प्रभावाने बनला आहे. तो नाहीसा होणार नाही. आपण घेऊन जा आपल्या बरोबर. जिंदगीभर पाहात राहा. यात रतीमात्र फरक होणार नाही."

त्यानंतर बाबाजींनी प्रोफेसरांच्या देखत एक फूल उचलले व त्याच्या प्रत्येक पाकळीतून वेगवेगळे फूल करून दाखवले व म्हणाले, "तुम्ही लोक भौतिकशास्त्राचा बाह्य मुखवटा घेऊन अत्यंत किंमती उपकरणांचा उपयोग करून काही सिद्धांत शोधून काढता व त्याचा गर्व बाळगता. परंतु हे सर्व प्रकृति-विज्ञान आहे. प्रकृतीच्या प्रक्रिया ओळखण्यास बाह्य उपकरणांची जरुरी नसते. अधिकारी पुरुषाच्या समोर प्रकृती आपले रहस्य स्वतःच उघड करून दाखवते. ते समजण्यास पात्रता मात्र पाहिजे." प्रा. संन्याल यांनी त्यांचे म्हणणे मान्य केले.

अशाच प्रकारे प्रा. अन्नदा सरकार यांच्या समोरही बाबाजींनी खजुराच्या पानाचे दगडात रूपांतर केले होते. हे सूर्यविज्ञान ते तिबेटमध्ये शिकून आले असले तरी आपल्या भारतातीलच ही विद्या आहे असे ते म्हणत. सूर्यकिरणात वाटेल ती वस्तू निर्माण करण्याचे सामर्थ्य आहे असे ते म्हणत. सर्जेराव पाटलांच्या वरील अनुभवामुळे सूर्यविज्ञान खरे असल्याचे सिद्ध होते असे म्हणण्यापेक्षा, भारतात हे सूर्यविज्ञान जाणणारे अगदी सामान्यासारखे दिसणारे लोकसुद्धा समाजात वावरत असतात, पण आम्हाला ते माहीत नसतात हे सिद्ध होते असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल.

वर प्रा. संन्याल यांनी योगबलाने दगड उत्पन्न केला असावा असे म्हटले आहे. याचा अर्थ संन्याल विज्ञानवादी असूनही व सूर्यविज्ञान खोटे म्हणत असूनही योगबलाने शून्यातून वस्तू निर्माण करता येते यावर विश्वास ठेवत होते असा होतो. तो विश्वास खरा असल्याचे खालील माझे मित्र श्री. ल. चि. फडके B.A. B.Ed. (निवृत्त हायस्कूल शिक्षक) यांच्या अनुभवावरून वाचकांना कळून येईल. श्री. फडके यांनी माझ्या विनंतीवरून हा वृत्तांत पत्राने लिहून कळवला आहे. तो खाली जसाच्या तसा देत आहे.

*प्रभा निवास*
*आर. एम. हायस्कूलजवळ*
*मिरज ४१६४१०*
*दि. ६ - २ - ९७.*

*श्री. गळतगे सर यांना*
*स. न.*

*आपले पत्र पोहोचले. खूप दिवसांनी पत्ररूपाने भेट झाली. मी या महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात खडकलाटला येण्याची शक्यता आहे. तेथे आलो की आपल्याकडे येऊन जाईन. आपणाला हवी असलेली माहिती खालीलप्रमाणे -*

*सुमारे १९५० सालची गोष्ट. मी तेव्हा १७ वर्षांचा असेन. मिरजेत समर्थ रामदासांची शिष्या वेणाबाई यांचा मठ आहे. या मठातील कल्याण महाराज यांच्याकडे मी वरचेवर जात असे. त्यांच्या मठातून दरवर्षी वेणाबाईंची पालखी सज्जनगडला जात असे. पालखी पायी जात असे. एक वर्षी मी व माझे मित्र कल्याण महाराजांच्या पालखीबरोबर पायी निघालो. आमचा मुक्काम इस्लामपूर येथे होता. या इस्लामपूरपासून ७, ८ कि. मी. वर बहे बोरगाव नावाचे खेडे आहे. माझी आई या खेड्यातील, तिचा वाडा या खेड्यात होता. याच बहे बोरगावात समर्थ रामदासांनी स्थापन केलेला एक मारुती आहे. या खेड्याजवळून नदी वाहते. या नदीत एका खडकाळ बेटावर मारुतीचे देऊळ आहे. श्री. कल्याण महाराज व माझे मित्र मुद्दाम इस्लामपूरहून बहे बोरगावी मारुतीच्या दर्शनासाठी गेलो.*

*याच बहे बोरगावात त्यावेळी तुकारामबुवा नावाचे एक नाथपंथी महाराज राहात होते. हे महाराज प्रापंचिक असून शिंपीकाम व शेती करून राहात असत. या महाराजांना सिद्धी प्राप्त झालेली होती. त्यांचे कायमचे मौन व्रत असे. ते खुणा करून, हावभाव करून इतरांशी बोलत असत. एखाद्या*

*भक्ताने प्रसादाची मागणी केली आणि महाराजांची लहर असली तर तुकारामबुवा भक्ताला हवेतून एखादा पदार्थ प्रसाद म्हणून काढून देत असत. मिठाई, खडीसाखर, एखादे फळ असा कोणताही पदार्थ ते काढून देत असत. कल्याणमहाराजांना तुकारामबुवांना भेटावयाचे होते. आम्हा मित्रमंडळींनाही तुकारामबुवांची सिद्धी पाहावयाची होती. आम्ही जेव्हा बहे बोरगावी माझ्या आईचे वाड्यावर पोहोचलो, तेव्हा दुपारचे ११ वाजले होते. जेवणापूर्वी नदीवर अंघोळ करावी म्हणून आम्ही सर्वजण टॉवेल वगैरे घेऊन बाहेर पडलो. वाटेतच तुकारामबुवांचे घर होते. आम्ही सर्वजण तुकारामबुवांच्या घरात गेलो. तुकारामबुवांनी आमचे छान स्वागत केले. कल्याणमहाराजांना त्यांनी नमस्कार केला. कल्याण महाराजांनी तुकारामबुवांना 'प्रसाद' मागितला. तुकारामबुवांना कल्याणमहाराजांना नकार देता येईना. थोडा वेळ ते डोळे मिटून गप्प बसले. नंतर माझ्या मित्राच्या खांद्यावर टाकलेला टॉवेल त्यांनी ओढून घेतला व माझ्या मित्राला ते खुणेने म्हणाले, "या टॉवेलात काय आहे?" तो "काही नाही" असे म्हणाला. त्यावेळी त्यांनी तो टॉवेल कल्याणमहाराजांकडे दिला व त्यांना उघडून बघण्यास सांगितले. आश्चर्याची गोष्ट अशी, की त्या टॉवेलातून एक मोठा खव्याचा लाडू बाहेर पडला. हा लाडू आम्ही सर्वांनी फोडून खाल्ला. तुकाराम महाराजांना सिद्धी प्राप्त होती याचे प्रात्यक्षिक मी स्वत: माझ्या नजरेने अनुभवले.*

*माझी आई याच गावची. ती लहानपणी आपल्या मैत्रिणीसह नदीवर पाणी भरण्यास जात असे. त्यावेळी हे तुकाराम महाराज आंघोळीला नदीवर येत असत. माझी आई व तिच्या मैत्रिणी महाराजांकडे प्रसाद मागत असत. महाराज नदीत बुडी मारून नदीतील वाळू काठावर फेकत असत. या वाळूचे खडीसाखरेत रूपांतर होत असे. आमची आई या गोष्टी आम्हा मुलांना सांगत असे. त्यावेळी आमचा विश्वास बसत नसे. पण त्या दिवशी दुपारी कल्याण महाराजांचे साक्षीने मी तुकाराम महाराजांच्या सिद्धीचे प्रात्यक्षिक पाहिले.*

*कळावे,*

*आपला स्नेहांकित*
*( सही )*
*ल. चि. फडके*

सूर्यविज्ञान जाणणाऱ्यांप्रमाणे काही योगीही सामान्य माणसांप्रमाणे समाजात आपल्याकडे जीवन जगत आहेत, ही गोष्ट वरील अनुभवाने सिद्ध होते. प्रस्तुत

लेखकाच्या गावी (भोज येथे) भोज-निपाणी रस्त्यावर 'बावाचा मठ' असून त्या मठात १९४० साली एक 'महाराज' काही दिवस राहत होते. त्यांनी वरील तुकाराममहाराजाप्रमाणेच खडे, वाळू या सारखे पदार्थ खडीसाखरेत रूपांतर करून दाखवत असल्याचे व ते खाऊन प्रत्यक्ष अनुभव घेतलेले त्या मठाचे शेतमालक (मठ शेतात आहे) श्री. भैरू आणापा संकपाळ (हल्ली वय ७५) यांनी प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. (ते खडे रस्त्यातील असत व ते भैरूनेच गोळा केलेले असत. त्यांना महाराज हातही लावत नसत.)

■■■

## प्रकरण बारावे

# पैशांना जेव्हा पाय फुटतात

*सत्ता स्फूर्ति आलिया । विद्या इयेच्या केलिया ।*
*इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ।।*

*- ज्ञानेश्वर*

---

१९८२ सालच्या दिवाळीतली गोष्ट आहे. सांगली येथील विश्रामबाग येथे 'गजानन हौसिंग सोसायटी' असून त्या सोसायटीच्या गल्लीतील काही तरुण मंडळी श्री. निशिकांत मगदूम यांच्या घरातील समोरच्या खोलीत दिवाळीचा फराळ करीत बसली होती. वेळ सकाळची होती. अशा वेळी भगवे कपडे घातलेले व दाढी वाढवलेले दोन बैरागी दारात आले व त्या तरुणांचे 'भविष्य' सांगतो असे म्हणू लागले. पण फराळ करण्यात मग्न असलेल्या त्या तरुणांना त्यात रस नसल्यामुळे त्यांनी थोडे फराळाचे पदार्थ देऊन त्यांना वाटेला लावले, नंतर लगतच्या १४ नंबरच्या फ्लॅटमधील श्री. विद्याधर रायनाडे यांच्या घराकडे त्यांनी आपला मोर्चा वळवला. त्यावेळी श्री. रायनाडे हे समोरच्या खोलीत बसले होते, व त्यांच्या पत्नी स्वयंपाक घरात स्वयंपाक करीत होत्या. (श्री. रायनाडे हे बी. ए. असून सांगलीच्या डिस्ट्रिक्ट लँड रेकॉर्ड ऑफिसमध्ये नोकरी करतात. हल्ली त्यांचे वय ४५ आहे.) हे दोन बैरागी त्यांच्या खोलीच्या दारात येऊन त्यांना बरेच काही सांगू लागले. त्यांची ब्याद घालविण्यासाठी त्यांनी त्यांना दोन रुपये देऊ केले., पण ते त्यांनी घेतले नाहीत व आणखी जास्तच 'भविष्य' सांगू लागले. विशेष म्हणजे त्यांनी रायनाडे यांच्या कपाटात किती पैसे आहेत हे सांगितले. श्री. रायनाडे यांनी आदल्याच

दिवशी आपला पगार कपाटात आणून ठेवला होता. तेवढीच रक्कम कपाटात होती. आणि ती रक्कम त्यांनी बरोबर सांगितली. या प्रकारामुळे त्यांच्या अतींद्रिय सामर्थ्याची रायनाड्यांना खात्री पटून त्यांना पाच रुपये देण्याची त्यांना इच्छा झाली. याच वेळी 'भविष्य' सांगणाऱ्या बैराग्याने त्यांच्या हातात कमंडलूतील थोडे भस्म ठेवले. त्यानंतर काय घडले हे खुद्द रायनाडे यांच्याच शब्दात वाचा. (श्री. रायनाडे यांनी घडलेल्या घटनांचे आपल्या स्वाक्षरीने मला निवेदन दिले आहे.)

"मी त्यांना पाच रुपये द्यावेत म्हणून आत आलो. आदल्याच दिवशी माझा पगार झाला होता व पगाराची सर्व रक्कम मी जशीच्या तशी कपाटात ठेवली होती. कपाट उघडून मी एकदम पगाराचे सर्व पैसे नेऊन त्या बैराग्यांना दिले. हे कसे घडले हे त्यावेळी मला कळले नाही. पण सर्व पैसे दिले एवढे खरे. पैसे घेऊन ते बैरागी निघून गेल्यानंतर एकदम मला जाग आली व पगाराचे सर्व पैसे मी त्यांना दिले असावे असे वाटू लागले. खात्री करावी म्हणून मी आत येऊन कपाट उघडून पाहिले, तेव्हा कपाटात पैसे नसल्याचे आढळून आले. मी भाकरी करीत असलेल्या पत्नीला ही गोष्ट सांगितली. तिनेही कपाटात पैसे नसल्याचे पाहिले. नंतर लगेच मी बाहेर येऊन शेजारच्या लोकांना ही गोष्ट सांगितली. शेजारी व आम्ही सर्वांनी चौकशी केली तेव्हा ते बैरागी पुढच्या कोणत्याही घरात भिक्षा न मागता निघून गेल्याचे आढळून आले. म्हणून ताबडतोब शेजारच्या निशिकांत मगदूम यांच्या घरात फराळ करणारे तरुण, त्यांनी त्या बैराग्यांना पाहिलेले असल्यामुळे व ओळखू शकत असल्यामुळे सायकली व मोटर सायकली घेऊन त्यांना शोधण्यासाठी निघाले. थोड्याच वेळात या तरुणांपैकी प्रकाश कुलकर्णी या तरुणाने त्या दोघा बैराग्यांना रेल्वे लाईन ओलांडून मिरजेच्या दिशेने जात असल्याचे पाहिले व त्यांना काही सांगून परत आणले.

"पुढील घटना सांगण्यापूर्वी श्री. प्रकाश कुलकर्णी या तरुणाविषयी थोडे सांगितले पाहिजे. या तरुणाने भारताचा व बांगला देशचा सायकलीने प्रवास केला असून त्यावेळी केंद्रात मंत्री असलेले श्री. यशवंतराव चव्हाण यांनी महाराष्ट्रीय तरुण म्हणून त्याचे दिल्लीत स्वागत केले होते व आपल्या घरी त्याचा यथोचित पाहुणचारही केला होता. अशा रीतीने बाहेरील जग त्याने पाहिले असल्याने तो अनुभवी व जाणकार तरुण होता. त्यामुळेच तो त्या बैराग्यांना पकडून परत आणू शकला हे उघड आहे. (हल्ली श्री. प्रकाश कुलकर्णी हे मुंबईत एक मोठे कंत्राटदार बनले आहेत.)

"प्रकाशने त्यांना जवळच्या गल्लीतील श्री. किरण भोसले यांच्या घरासमोर आणले. (किरण हाही त्या बैराग्यांना शोधत होता. श्री. किरण भोसले हे डी. वाय पाटील यांच्या पुणे येथील इस्टेटीचे हल्ली मॅनेजर आहेत.) प्रकाश व ते दोघे बैरागी

किरणच्या घरासमोर येताच तेथे सर्व तरुण जमले. ज्यांच्या घरात हे सर्व तरुण दिवाळीचा फराळ करीत होते, त्या घरचा तरुण श्री. निशिकांत मगदूम हा त्यावेळी एकदम त्या बैराग्यासमोर आला व त्यांना, ''तुम्ही पलीकडच्या घरातील पैसे घेतले आहेत ते द्या, नाहीतर आम्ही तुम्हाला सोडणार नाही.'' असे म्हणाला. पण ते ''आम्ही पैसे घेतलेले नाहीत'' असेच म्हणू लागले. त्यानंतर काय घडले हे श्री. निशिकांत मगदूम यांच्या शब्दात वाचा :

''मी व माझ्या इतर मित्रांनी त्या म्होरक्या व कमंडलुधारी बैराग्याला पैसे देण्याविषयी परोपरीने सांगून पाहिले. पण तो काही केल्या पैसे घेतल्याचे कबूल होईना. तेव्हा मी एकदम भडकलो व त्याच्या हातातील काठी घेऊन त्याला मारू लागलो. तरीही पैसे घेतल्याचे तो कबूल करेना. तेव्हा मी त्याला इतके मारले की तो जमिनीवर पडला व त्याच्या हातातील कमंडलू पडून त्यातील भस्म जमिनीवर सांडले. आता आपली सुटका नाही हे यावेळी त्याने ओळखले व ''पैसे कपाटातच आहेत. जाऊन पाहा. मारू नका.'' असे तो म्हणाला. आम्हाला हे त्याचे बोलणे ऐकून आश्चर्य वाटले. तथापि, आम्ही रायनाडे यांना - तेही यावेळी त्या ठिकाणी उपस्थित होते - घरी जाऊन कपाटात पैसे आहेत का हे पाहून येण्यास सांगितले. ते घरी गेले व परत येऊन म्हणाले की, ''पैसे कपाटात आहेत.'' हे ऐकून आम्ही जास्तच आश्चर्यचकित झालो. पण पैसे परत मिळाले असल्यामुळे आम्ही त्या बैराग्यांना सोडून दिले.''

## या प्रकरणातील महत्त्वाचे प्रश्न

या घटनेसंबंधी काही महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात. त्यांची चर्चा करण्यापूर्वी या प्रकरणातील प्रमुख घटनांची प्रथम नोंद केली पाहिजे. त्या घटना अशा :

१. आपल्या कपाटात पैसे किती आहेत हे त्या बैराग्याने बरोबर सांगितले असे रायनाडे म्हणतात.

२. आपण स्वत: पगाराचे पैसे त्या बैराग्याला दिले असेही ते म्हणतात.

३. आपल्या लेखी निवेदनात जरी त्यांनी या गोष्टीचा उल्लेख केलेला नसला तरी मी मुद्दाम खोदून विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले की, त्या बैराग्याने आपल्या हातात भस्म ठेवल्यानंतरच आपल्या मनावर परिणाम झाला. तत्पूर्वी काही परिणाम झाला नाही.

४. काही वेळाने आपल्याला 'जाग' आली व बैराग्याला आपण पगाराचे सर्व पैसे दिल्याचे आठवले व आपण आत येऊन कपाट उघडून पाहिले तेव्हा कपाटात पैसे नव्हते असे रायनाडे म्हणतात, याविषयी ते पत्नीचीही साक्ष काढतात, आणि त्यांच्या पत्नीही या गोष्टीला दुजोरा देतात.

५. बैराग्याने पैसे कपाटात आहेत असे ज्यावेळी सांगितले तेव्हा मी घरी येऊन कपाट उघडून पाहिलं, तेव्हा तेथे पूर्वीप्रमाणे पैसे असल्याचे आढळले असे आपल्या लेखी निवेदनात रायनाडे यांनी म्हटले आहे. (त्यांचे सर्व निवेदन येथे दिलेले नाही.)

**आता या प्रकरणी पुढील महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात.**

१. श्री. रायनाडे यांच्या कपाटात पैसे किती आहेत हे त्या बैराग्याने कसे बरोबर ओळखले?

२. बैराग्याला पाच रुपये देण्याची इच्छा झालेल्या रायनाड्यांनी पगाराचे सर्व पैसे त्या बैराग्याला का (वा कसे) नेऊन दिले?

३. बैराग्याने हातात भस्म ठेवल्यानंतरच आपल्या मनावर परिणाम झाला असे रायनाडे म्हणतात. भस्मात (म्हणजे राखेत) असा मनावर परिणाम करण्याचे किंवा वागणुकीत बदल घडवून आणण्याचे सामर्थ्य असू शकते काय?

४. पैसे कपाटातच होते, पण बैराग्याने रायनाड्यांवर संमोहन प्रयोग केल्यामुळे रायनाडे यांना व त्यांच्या पत्नीना ते कपाटात दिसले नाहीत असे म्हणता येईल काय?

५. हा संमोहनाचा प्रयोग नसेल व पैसे कपाटात नव्हते हे खरे असेल तर ते पैसे नंतर कपाटात कसे आले?

या प्रकरणाची रूढ (normal) किंवा बुद्धिवादी उपपत्ती देऊन वरील प्रश्नांची उत्तरे मिळवता येतात का हे पाहणे आपले पहिले कर्तव्य आहे. तेव्हा तसा प्रयत्न प्रथम करू.

## या प्रकरणाची बुद्धिवादी दृष्टिकोणातून चिकित्सा

या प्रकरणातील केंद्र स्थानातील व सर्वात महत्त्वाची घटना म्हणजे श्री. रायनाडे यांनी बैराग्यांना स्वत: कपाटातील सर्व पैसे नेऊन दिले ही होय. ते पैसे त्यांनी दिले होते हे सिद्ध झाले, तर नंतर कपाटात ते आले ही वस्तुस्थिती हा एक चमत्कार ठरतो. आणि दिले नव्हते हे सिद्ध झाले तर चमत्काराचा हा डोलारा एकदम कोलमडतो, तेव्हा रायनाड्यांनी बैराग्यांना पैसे दिले नाहीत असे सिद्ध करता येते का ते पाहू.

बुद्धिवादी दृष्टिकोणातून या प्रकरणाकडे पाहणारा एखादा संशयवादी पुढील तीन प्रकारचे युक्तिवाद करू शकतो :

१. श्री. रायनाडे हे बैराग्यांना आपण सर्व पैसे दिले असे म्हणतात याचे कारण ते मनोविकृतीने पछाडलेले आहेत.

२. श्री. रायनाडे हे बैराग्यांना पैसे दिल्याचे खोटेच सांगतात.

३. श्री. रायनाडे यांना बैराग्यांना पैसे दिल्याचा भ्रम झाला. त्यानी प्रत्यक्षात बैराग्यांना पैसे दिलेच नाहीत. ते कपाटातच होते.

आता वरील तीन युक्तिवादांचा बुद्धिवादी दृष्टिकोणातून विचार (त्याच क्रमाने) करू.

१. श्री. रायनाडे हे आपण बैराग्यांना पैसे दिले असे सांगून गल्लीतील लोक जमवण्याइतके मनोविकृत असतील तर त्यांची मनोविकृती मोठ्याच विकोपाला गेली होती असे म्हटले पाहिजे. त्यांच्या इतर वागणुकीतूनही ती प्रकट व्हायला पाहिजे. पण याला पुरावा नाही. ते डिस्ट्रिक्ट लँड रेकॉर्ड ऑफिसमध्ये जबाबदारीच्या हुद्यावर कित्येक वर्षे नोकरी करीत आहेत. ते थोडे जरी मनोविकृत असते तरी ती गोष्ट लपून राहणे शक्य नाही. वास्तविक विक्षिप्तपणाचा सुद्धा त्यांच्यावर कोणी आरोप करणार नाही, असा त्यांचा स्वभाव आहे. शिवाय त्यांनी पैसे गेल्याचे सांगताच शेजारचे तरुण त्या बैराग्यांच्या शोधासाठी गेले ही वस्तुस्थिती ते नॉर्मल होते याचा पुरावा आहे. तेव्हा मनोविकृतीचा त्यांच्यावरील आरोप वस्तुस्थितीविरुद्ध आहे.

२. आता ते खोटे बोलत आहेत असे कशाच्या आधारे म्हणणार? किरकोळ बाबतीत मनुष्य खोटे बोलणे शक्य आहे हे मान्य करता येईल, पण ही बाब किरकोळ नाही. बैराग्यासारख्या भिक्षुकीवर निर्वाह करणाऱ्यांवरील हा 'आरोप' आहे. अशा लोकांवर एका सधन, सुशिक्षित व जबाबदारीची सरकारी नोकरी करणाऱ्या प्रतिष्ठित व्यक्तीने असा 'आरोप' का करावा? *

अशा व्यक्तीला बैराग्यांनी आपल्याला फसवून आपल्या पगाराचे सर्व पैसे नेले असे खोटे सांगून काय मिळवायचे होते? उलट ही गोष्ट त्यांना कमीपणा आणणारीच होती. कारण बैराग्यांकडून गंडवले जाण्याइतके ते भोळसट आहेत हे त्यामुळे लोकांच्या निदर्शनास येणार होते. आपला भोळसटपणा लोकांच्या निदर्शनास आणून देण्यात त्यांचा कोणताही स्वार्थ दडला असणे शक्य नाही. तेव्हा हा खोटेपणाचा त्यांच्यावरील आरोप क्षणभरही टिकणारा नाही.

---

* श्री रायनाडे यांचे कुटुंब अकिवाट (ता. शिरोळ, जि. कोल्हापूर) येथील असून त्यांची तेथे मोठी शेतीवाडी आहे. ते एक सधन कुटुंब आहे. सांगलीत विश्रामबागमध्ये त्यांची स्वतःची इमारत आहे. कर्नाटक युनिव्हर्सिटीच्या 'जैनॉलॉजी' विभागाचे प्रमुख व प्रसिद्ध जैन तत्त्वज्ञान व वाङ्मयाचे अभ्यासक कै. डॉ. रायनाडे हे त्यांचे सख्खे काका होत. प्रस्तुत लेखकाचा व त्यांचा (डॉ. रायनाडे यांचा) चांगला स्नेहसंबंध होता हे सांगणे येथे उचित होईल.

३. तिसऱ्या युक्तिवादानुसार श्री. रायनाडे यांना बैराग्यांना पैसे दिल्याचा भ्रम झाला. पण असे कशाच्या आधारे म्हणणार? हा भ्रम संमोहनाने त्या बैराग्याने निर्माण केला असे म्हणावे तर तो त्या बैराग्याच्या हिताविरुद्ध आहे. संमोहन-प्रयोग करायचाच तर तो बैराग्यांना पैसे दिले नाहीत असे त्यांना वाटण्याचा करावयास हवा. आणि प्रत्यक्षात तसाच प्रयोग त्यांच्यावर झाला असल्याचे दिसून येते. कारण आपण कपाटातील पैसे दिले हे त्यांना प्रत्यक्ष देताना कळलेच नाही, नंतर 'जाग' आल्यावर ते कळले असे ते म्हणतात. म्हणजे काही वेळाने संमोहनाचा प्रभाव नाहीसा झाला. त्यातून ते बाहेर आले व मग आपण बैराग्याला पैसे दिल्याचे त्यांना आठवले. तेव्हा त्यांना प्रत्यक्षात झालेला 'भ्रम' हा खरे तर पैसे दिल्याचा नव्हता तर पैसे न दिल्याचा होता. तात्पर्य, त्यांना पैसे दिल्याचा भ्रम झाला हे म्हणणे खोटे सिद्ध होते.

भ्रमाचा हा सिद्धांत आणखी एका दृष्टीने विचार करता खोटा सिद्ध होतो. रायनाडे यांनी आत येऊन परत कपाट उघडून पाहिल्यानंतर त्यांना कपाटात प्रत्यक्षात पैसे नसल्याचे आढळून आले. बरे, त्यांना पैसे कपाटात दिसले नाहीत हेही भ्रमामुळेच असे म्हणावे तर असा भ्रम त्यांच्यात का निर्माण व्हावा, याला काही समर्पक कारण सापडत नाही. एक तर असा भ्रम तो बैरागी निर्माण करणे शक्य नाही. कारण ते त्याच्या हिताविरुद्ध होते. दुसरे म्हणजे त्या बैराग्याला भ्रम निर्माण करावयाचाच होता तर तो कपाटात पैसे रायनाड्यांना दिसावेत असा निर्माण करावयास हवा होता. कारण ते त्याच्या हिताचे होते. त्यामुळे त्याला पैसे घेऊन पसार होता येणार होते. पण प्रत्यक्षात असे काही घडलेले नाही. प्रत्यक्षात कपाटात पैसे नव्हते असे त्यांना दिसले. अशा रीतीने रायनाड्यांना कपाटात पैसे दिसले हा भ्रम नव्हता हे सिद्ध होते. शिवाय त्यांच्या पत्नीचीही या गोष्टीला साक्ष आहे. अशा रीतीने तिसरा भ्रमाचा (बुद्धिवादी वा संशयवादी) युक्तिवादही टिकू शकत नाही.

या प्रकरणातील बुद्धिवादी उपपत्तीचा पोकळपणा उलट्या पद्धतीने या घटनेकडे पाहिले तर जास्त नजरेत भरतो. ते कसे हे आता पाहू.

श्री. रायनाडे यांना बैराग्याने त्यांच्या कपाटात किती पैसे आहेत हे बरोबर सांगितले. (मग ते कसेही सांगितलेले असो.) हे सांगण्यात त्या बैराग्याचा रायनाड्यांवर आपल्या 'दैवी' शक्तीची छाप पाडून (त्यांनी देऊ केलेल्या दोन रुपयांपेक्षा) जास्त पैसे काढायचे होते हे स्पष्ट आहे. आणि हे 'जास्त पैसे' म्हणजे त्यांच्या कपाटातील पगाराचे 'सर्व पैसे' हे आता स्पष्ट झाले आहे. कारण ते सर्व पैसे त्यांनी आपण होऊन त्या बैराग्याला दिले असे रायनाडे म्हणतात. त्यांच्या हातावर भस्म ठेवण्याचा बैराग्याचा हेतू हाच असला पाहिजे हे उघड आहे. कारण ते भस्म त्याने आपल्या हातावर ठेवल्यानंतरच आपल्यात बदल झाला व आपल्याला काही कळेनासे होऊन

आपण पगाराचे सर्व पैसे त्याला दिले असे रायनाडे यांचे म्हणणे आहे. ही भस्माची घटना रायनाडे यांनी बैराग्याला खरोखरच पैसे दिले, तो भ्रम नव्हता हे अशा रीतीने निर्णायकपणे सिद्ध करणारी आहे. नंतर त्यांना कपाटात पैसे आढळले नाहीत ही वस्तुस्थिती या गोष्टीला पुष्टीच देते. एरवी रायनाड्यांना भस्म देण्यात त्या बैराग्याचा दुसरा कोणता हेतू होता हे कळणे कठीण आहे.

त्या बैराग्याने रायनाड्यांना भस्म देऊन त्यांच्या कपाटातील सर्व पैसे उकळले याला दुसरा पुरावा म्हणजे नंतर ते बैरागी पुढच्या घरातून भिक्षा मागण्याचे सोडून ताबडतोब तेथून निघून गेले; इतकेच नव्हे, तर सांगलीची हद्द ओलांडून मिरजेच्या दिशेने चाललेले त्यांना हुडकणाऱ्या प्रकाश कुलकर्णी या तरुणाला ते आढळले. वास्तविक भिक्षा मागण्याचा आपला कार्यक्रम असा एकदम बंद करून त्यांनी असे एकदम तेथून निघून जाणे विचित्र नाही काय? त्यांनी रायनाडे यांची बरीच मोठी रक्कम उकळली होती म्हणूनच ते असे एकदम निघून गेले, हे स्पष्ट आहे.

नंतरच्या घटनाही याला पुष्टीच देतात. त्यांना प्रकाशने हटकताच ते विशेष विरोध न करता परत आले, याचे कारण त्यांनी विरोध केला असता तर त्याचा प्रकाशला जास्त संशय आला असता हे त्यांनी ओळखले असावे. श्री. प्रकाश कुलकर्णी यांनी प्रस्तुत लेखकाला आपण पोलिसांनाही फोन केला होता असे सांगितले आहे. (मात्र पोलीस आले नाहीत.) नंतर किरण भोसले यांच्या घरासमोर कमंडलुधारी म्होरक्या बैराग्याला निशिकांत मगदूम याने मारण्यास सुरुवात करताच आपण निर्दोष असल्याचे सिद्ध करण्याचा एक सोपा व साधा उपाय - ते खरोखरच निर्दोष असतील तर - त्यांना उपलब्ध होता. तो म्हणजे आपली तपासणी करा व पैसे असतील तर काढून घ्या असे त्या तरुणांना सांगणे. निदान त्यांनी मारण्यास सुरुवात करताच त्यांनी असे म्हणावयास हवे होते. तसे ते म्हणाले नाहीत ही वस्तुस्थिती त्यांना काही लपवायचे होते म्हणजे ते निर्दोष नव्हते - हे दाखवून देते. या संदर्भात त्या म्होरक्या कमंडलुधारी बैराग्याला मारणारे श्री. निशिकांत मगदूम म्हणतात की, बेदम मारल्यानंतर आता आपली पैसे दिल्याशिवाय सुटका नाही याची खात्री झाल्यानंतरच तो बैरागी म्हणाला की, 'पैसे कपाटातच आहेत. जाऊन पाहा.' पैसे कपाटातच होते तर त्याने मारण्यापूर्वी सुरुवातीलाच तसे का सांगितले नाही? तो निर्दोष असता तर त्याने तसे सांगितले असते, पण सांगितले नाही ही वस्तुस्थिती श्री. मगदूम यांच्या तर्काला दुजोरा देते. प्रकरण अगदी विकोपाला गेल्यानंतरच तो असे म्हणाला ही वस्तुस्थिती असे सुचविते की, फार तर दोन थपडा देऊन आपल्याला सोडून देतील, असे त्याला वाटले असावे. जमिनीवर पडेपर्यंत मारतील याची त्याला कल्पना नसावी. म्हणून आपली पैसे दिल्याशिवाय सुटका नाही याची खात्री झाल्यामुळे, ती झाल्यानंतरच त्याने कपाटात पैसे असल्याचे

सांगितले व आपली सुटका करून घेतली, हे मगदूम यांचे म्हणणे सयुक्तिक आहे. प्रारंभापासून शेवटपर्यंत म्हणजे कपाटातील पैशाचे 'भविष्य' सांगण्यापासून बेदम मार खाऊन कपाटातच पैसे आहेत असे उलटे 'भविष्य' सांगण्यापर्यंतचे बैराग्यांचे सर्व वर्तन रायनाड्यांना गंडवून त्यांचे पैसे त्यांनी घेतले हेच सिद्ध करते. त्यांनी ते घेतले नाहीत, ते निर्दोष होते, याविषयी शोधूनही कसला पुरावा सापडत नाही. अशा रीतीने श्री. रायनाडे यांनी त्या बैराग्यांना सर्व पैसे दिले होते याविषयी कसलाही संशय बाळगण्याचे कारण नाही.

अशा रीतीने रायनाड्यांनी बैराग्यांना पैसे दिले होते हे खरे असेल तर ते कपाटात कसे आले? ते कसे आले याची बुद्धिवादी उपपत्ती देता येत नसल्यामुळेच हे सर्व प्रकरण बुद्धिवादात बसत नाही या निष्कर्षाला यावे लागते. हे संपूर्ण प्रकरण अतींद्रिय आहे आणि ते अतींद्रिय असल्याचे ते प्रकरण स्वतःच पुराव्यानिशी सांगत आहे. तथापि, अशा प्रकारच्या इतर अतींद्रिय प्रकरणांचे ऐतिहासिक दाखले देऊन त्याचा खरेपणा सिद्ध करता येतो. कारण हे प्रकरण तुरळक आहे असे समजण्याचे कारण नाही. अशा काही प्रकरणांचे ऐतिहासिक दाखले आता पाहू.

## अतींद्रिय शक्तीच्या बाजूने ऐतिहासिक दाखले

या प्रकरणी काही महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात असे प्रारंभी म्हटले आहे. या प्रश्नांची उत्तरे या प्रकरणाचा विचार बुद्धिवादी दृष्टिकोणातून केला तर मिळत नाही हे आपण वर पाहिले आहे. आता त्या प्रश्नांची उत्तरे अतींद्रिय दृष्टिकोणातून विचार केला तर कशी मिळतात हे आपल्याला पाहायचे आहे. त्यासाठी ऐतिहासिक दाखल्यांचा आधार घ्यावयाचा आहे. त्यादृष्टीने आता आपण या प्रश्नांची चर्चा करू.

**प्रश्न १ :** श्री. रायनाडे यांच्या कपाटातील पैसे त्या बैराग्याने बरोबर कसे सांगितले? त्याने रायनाडे यांना किती पगार आहे याची बाहेरून कुठून तरी माहिती मिळवून तो आकडा सांगितला असे येथे कोणी म्हणेल. पण तसे येथे म्हणता येत नाही. कारण त्या बैराग्याने रायनाडे यांचा पगार सांगितलेला नाही, तर कपाटातील पैसे सांगितले आहेत. आणि कपाटात फक्त पगाराचेच पैसे रायनाड्यांनी ठेवले होते असे कशावरून म्हणता येईल? म्हणजे पगाराचे पैसेच फक्त त्यांनी कपाटात ठेवले होते हे ज्ञान तरी त्यासाठी त्या बैराग्याला झाले पाहिजे हे उघड आहे. हे ज्ञान सामान्य किंवा रूढ (normal) पद्धतीने त्याला होणे शक्य नाही. हे ज्ञान त्याला अतींद्रिय मार्गानेच झाले तर होईल. असे ज्ञान अतींद्रिय मार्गाने होऊ शकते याला खालील ऐतिहासिक दाखला देतो.

निडसोसी (ता. हुक्केरी, जि. बेळगाव) या दुरदुंडीश्वर मठाबद्दल प्रसिद्ध असलेल्या गावामधील दुरदुंडीश्वर हायस्कूलमध्ये एकदा एक बैरागी आला होता.

त्याने हायस्कूलमधील अनेक शिक्षकांचे 'भविष्य' सांगितले. (वास्तविक हे 'भविष्य' नसते, तर 'भूत'च - म्हणजे भूतकालच असतो. फारच थोडे, तेही खरे न येणारे 'भविष्य' असते.) ते पटल्यामुळे त्या शिक्षकांनी त्याला बरेच पैसे दिले. एका शिक्षकाने त्याला एक क्षुल्लक नाणे दिले व एवढेच पैसे माझ्याजवळ आहेत असे तो म्हणाला. तेव्हा तो बैरागी 'खोटे का बोलता?' असे म्हणून त्याच्या खिशात किती पैसे आहेत हे सांगितले व 'पाहा, एवढे पैसे असून हे शिक्षक मला एक नाणे देत आहेत' असे तो सर्वांना म्हणाला. तेव्हा त्याचे आश्चर्य वाटून सर्वांनी त्या शिक्षकाला खिशातील पैसे काढायला लावून ते मोजले, तेव्हा ते त्या बैराग्याने सांगितले होते तितकेच बरोबर निघाले ! हा शिक्षक दुसरा कोणी नसून प्रस्तुत लेखकाचा मेहुणा (बायकोचा भाऊ) असून त्याचे नाव श्री. आण्णासाहेब शिवराम मुकरे, एम. ए. बी. एड्. या घटनेचे साक्षीदार त्या हायस्कूलमधील श्री. अंबली, नागौडा इ. शिक्षक आहेत. तेव्हा बैराग्याने रायनाड्यांच्या कपाटातील पैसे बरोबर सांगितले तर त्याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

**प्रश्न २ व ३ :** पाच रुपये देण्याची इच्छा झालेले श्री. रायनाडे यांनी पगाराचे सर्व पैसे त्या बैराग्याला कसे दिले? त्या बैराग्याने त्यांच्या हातावर ठेवलेल्या भस्मात असे वृत्तीत बदल घडवून आणण्याचे सामर्थ्य होते असे म्हणता येईल काय? होय, असे म्हणता येते. याला पुढील घटनेचा दाखला देता येईल.

एक बाई आपल्या सुनेचा सतत मानसिक छळ करीत असे. तो छळ तिने कित्येक वर्षे सहन केला. शेवटी तो तिला सहन होईना. पण त्यावर काही व्यावहारिक उपायही सापडेना. एकदा कोणीतरी तिला एक देवऋषीची माहिती दिली. (वास्तविक त्याला देवऋषी म्हणणे बरोबर होणार नाही. तो एक देवाची उपासना करणारा साधा माणूस होता.) तिने त्याला आपले गाऱ्हाणे सांगितले व उपाय विचारला. त्याने एक भस्माची पुडी दिली व ती सासूला कळू न देता तिच्या उशीत ठेवून द्यायला सांगितले. तिने तसे केले. आश्चर्य म्हणजे त्यानंतर ती सासू आपल्या सुनेशी अतिशय आपुलकीने वागू लागली. आजतागायत ती चांगली वागत आहे. ही सासू दुसरी कोणी नसून प्रस्तुत लेखकाची बहीण आहे. आणि तिची सून हीही दुसरी कोणी नसून लेखकाची स्वतःचीच मुलगी आहे. *

---

* वास्तविक खुद्द लेखकाला भस्माचे व्यक्तीवर यापेक्षाही जास्त विलक्षण परिणाम होत असल्याचे आढळून आले असून असले अनुभव, ते केवळ स्वतःचे आहेत म्हणून लेखकाने या ग्रंथात समाविष्ट केलेले नाहीत. येथे संदर्भ आल्याने अपरिहार्य म्हणून वरील दोन अनुभव कथन केले आहेत. लेखकाचा मुख्य भर इतरांच्या अनुभवावर आहे.

या विषयी स्वत: रायनाडे यांनीच एक दाखला दिला आहे. (हा दाखला भस्माच्या प्रभावाचा नसला तरी (किंवा असेल तर ते माहीत झालेले नाही) रायनाड्यांच्या प्रकरणाशी बरोबर जुळणारा आहे.) सांगलीतील लँड रेकॉर्ड ऑफिसमध्ये नोकरी करणारे श्री. सु. बा. पाटील हे आपल्या महिन्याचा पगार हातात पडताच तो सर्व मिरजेच्या एका 'महाराजा'ला ताबडतोब व न चुकता नेऊन देत असत. त्यात थोडीही दिरंगाई ते करीत नसत. तो 'महाराज' त्या पगारातील अल्प रक्कम त्याना देत व तेवढ्यावरच ते कशीबशी गुजराण करीत. (ते अविवाहित होते) आपण असे का करतो हे त्यांना समजत नसे व सांगताही येत नसे. त्याच्या मित्रांनी व ऑफिसमधील इतर लोकांनी त्यांना या गोष्टीपासून परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. पण त्यांना यश आले नाही. बऱ्याच दिवसानंतर हा प्रकार बंद झाला. (हल्ली ते विवाहित असून शिरोळ, (जि. कोल्हापूर) येथे असिस्टंट डिस्ट्रिक्ट इन्स्पेक्टर ऑफ लँड रेकॉर्डर्स या हुद्यावर काम करीत आहेत. प्रस्तुत लेखकाने त्यांना न भेटता स्वतंत्रपणे या प्रकरणाची शहानिशा केली आहे.)

देवचंद कॉलेज, निपाणी येथील एक प्रा. ए. आर. पेंढारकर यांनीही आपला घरोबा असलेल्या कुटुंबातील एका बाईचे अशाच प्रकारचे एक प्रकरण प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. (प्रा. पेंढारकरांची माहिती प्रकरण ३ च्या शेवटी दिली आहे.)

त्या बाईंना कोणा अनोळखी व्यक्तीला आपले सर्व सोन्याचे दागिने नेऊन देण्याची तीव्र ओढ लागली होती. त्यासाठी त्या सतत बाहेर जाण्याचा हट्ट धरीत. त्यांची ती अनामिक व अनाकलनीय इच्छा कळल्यानंतर घरातील लोकांनी त्यांना घराबाहेर जाण्यास पूर्ण बंदी केली होती. पुढे एकदा त्यांच्या घरी मुंजीचा कार्यक्रम होता. त्या समारंभात जेवणाच्या पंगतीत बसलेल्या एका अनोळखी व्यक्तीला आपले दागिने देण्याची त्या बाईंना अनावर इच्छा झाली. तेव्हा घरच्या लोकांना ती व्यक्ती ओळखून आली. ती व्यक्ती अनोळखी व समारंभाला विनाआमंत्रण आलेली असल्यामुळे घरच्या लोकांनी तिला मारपीट करून तेथून हाकलून दिले. नंतर हा प्रकार थांबला. (त्या बाई मुंबईच्या असून त्या शहाडे कुटुंबाच्या आहेत. त्यांच्याविषयीचे येथील वृत्त प्रा. पेंढारकरांनी सांगितले तसेच दिले आहे. त्याची लेखकाने स्वतंत्रपणे शहानिशा केलेली नाही. त्या बाई हल्ली नाहीत, वारल्या आहेत असे पेंढारकरांनी सांगितले.)

---

मुळात बुद्धिवादी असलेल्या लेखकाला असले अनेक अनुभव आल्यानंतरच बुद्धिवाद तोकडा वाटून तो टाकून देऊन त्याने या क्षेत्रात संशोधन आरंभिले व अशा घटनामागील विज्ञान समजून घेण्यासाठी परामानसशास्त्राचा अभ्यास सुरू केला.

वर दिलेले तीन दाखले अनुक्रमे एखाद्या व्यक्तीच्या वृत्तीत बदल घडवून आणण्याचे सामर्थ्य भस्मात असल्याचे व आपले पगाराचे पैसे, दागिने इ. वस्तू आपण होऊन आपल्याला देण्यास इतरांना प्रवृत्त करण्याचे अतींद्रिय सामर्थ्य ('विद्या') काही लोकांत असल्याचे सिद्ध करतात. त्या बैराग्याला पगाराचे पैसे आपण कसे नेऊन दिले हे आपल्याला कळलेच नाही असे रायनाडे का म्हणतात हे आता वाचकांच्या लक्षात येईल. अशा रीतीने वरील तिन्ही दाखले रायनाडे यांच्या (भस्मामुळे पैसे आपण होऊन देण्याच्या) प्रकरणाला बळकटी आणणारेच आहेत.

**प्रश्न ४ :** पैसे कपाटातच होते, पण रायनाड्यांना ते बैराग्यानी केलेल्या संमोहनामुळे दिसले नाहीत, असे म्हणता येईल काय? या प्रश्नाचे उत्तर बुद्धिवादी दृष्टिकोणातून या घटनेची चिकित्सा केली असता बुद्धिवाद खोडून काढणारेच कसे मिळते हे आपण वर पाहिलेच आहे.

**प्रश्न ५ :** पैसे कपाटात नव्हते हे खरे असेल तर नंतर ते कपाटात कसे आले? हा सर्वात महत्त्वाचा प्रश्न असून त्याचे उत्तर तशाच प्रकारच्या इतर अतींद्रिय घटनांच्या दाखल्याच्या आधारे देता आले तर बुद्धिवाद खोटा ठरतो व रूढ विज्ञानातील नियमांचा अपुरेपणाही सिद्ध होतो. असे दाखले देता येतात काय? याचे उत्तर 'होय' असे असून असे दाखले आता देतो.

## जड वस्तूंचे अदृश्य रीतीने स्थलांतर

जड वस्तूंचे अदृश्य रीतीने स्थलांतर होत असल्याबद्दलचे हे दाखले असून असे प्रकार 'भानामती' च्या प्रकारामध्ये सर्रास घडत असतात. प्रस्तुत ग्रंथातील भानामतीवरील प्रकरणात अशा प्रकारची अनेक उदाहरणे दिली आहेत. (उदा. प्रकरण १ मधील अदृश्य रितीने विष्टा पडण्याचा प्रकार, प्रकरण २ मधील बंद खोलीतील सामान बाहेर येऊन पडण्याचा प्रकार, प्रकरण ३ व ५ मधील बंद घरात छतातून दगड पडण्याचे प्रकार इ.) श्री. रायनाडे यांच्या घरातील बंद कपाटात पैसे येऊन पडण्याचा प्रकार यातच मोडतो. बंद कपाटातून पैसे अशाच अदृश्य रीतीने गायबही होऊ शकतात. येथे असल्या एका प्रकरणाचा दाखला देतो.

हा दाखला पुण्याच्या दै. 'सकाळ' मधील बातमीचा असून ती संपूर्ण बातमी येथे जशीच्या तशी देतो.

### *कम्युनिस्टाला भुताटकीचा अनुभव*

*सौंदाणे. दि. १२ (वार्ताहर) येथील एक कॉन्ट्रॅक्टर श्री. ठाकरे व मुख्याध्यापक श्री. गोसावी यांना भुताटकी-भानामतीचा अनुभव येत असल्यामुळे गावात खळबळ माजली आहे. त्यातही श्री. ठाकरे कम्युनिस्ट असून त्यांना या प्रकाराचे गूढ उकलत*

*नसल्यामुळे ते बेचैन झाले आहेत.*

*श्री. गोसावी यांच्या **कपाटातील पैसे गायब होत असल्याचा अनुभव आला. सर्व संशय फिटल्यानंतरच ते भानामती असावी या निष्कर्षाला आले आहेत.** कपाटात नोटा ठेवून कुलूप लावून वर सील केले व किल्ल्या मित्राकडे ठेवल्या तरी सकाळी नोटा गायब झाल्याचे आढळले. ....सील मात्र तसेच !*

*या उलट श्री. ठाकरे यांना रात्री दोन-तीन इसम भेटतात, ते ठाकरेंना आपल्या मागे येण्यास सांगतात व काही वेळाने अदृश्य होतात, असा अनेकदा अनुभव आला. श्री. ठाकरे हे कम्युनिस्ट असल्याने त्यांना भुताटकी हा प्रकार साफ नामंजूर आहे. परंतु प्रत्यक्ष त्यांनाच अनुभव येऊ लागल्यामुळे ते बेचैन झाले आहेत.*

अशा रीतीने बंद कपाटातून पैसे अदृश्य रीतीने गायब होत असतील तर बंद कपाटात ते अदृश्य रीतीने येऊन पडणेही अशक्य नाही हे उघड आहे. रायनाडे यांच्या बाबतीत घडले तसे बंद कपाटात वस्तू अदृश्य रीतीने येऊन पडण्याचेही अनेक दाखले असून विस्तार भयास्तव येथे एकच दाखला देतो. (आणखी अशाच दाखल्यासाठी प्रकरण १४ पाहा.)

शांतिनाथ नावाचा एक पिशाच्चविद्येत पारंगत असलेला माणूस (बैरागी) गुजरातमधील लालपूर या गावात अग्निकुंडातील राखेतून जेवणाची ताटे बाहेर काढणे, (असले जेवण आपण स्वत: जेवले असल्याचे कृष्णानंदानी म्हटले आहे.) जेवल्यानंतर ती ताटे परत तेथील राखेत सारून अदृश्य करणे हा प्रकार करीत असे. पण ती ताटे आदित्यन नावाच्या खेड्यातील एका सेठजीच्या जेवणघरातील कपाटातून येत असत व जेवलेली खरकटी ताटे परत त्या कपाटातच जाऊन पडत असत, हे भारतभर प्रवास करणाऱ्या कृष्णानंदांना सहज त्या गावात आले असता नंतर त्या सेठच्या तोंडूनच कळल्याचे आपल्या True Experience (खरे अनुभव) या ग्रंथात पान २५३ ते २६४ मधील प्रकरणात कृष्णानंदानी लिहिले आहे. * (पाहा, **True Experiences** by Krishnanand, Krishnanand Publication committee Shanti Ashram, Bhadran (Dt. Kheda) Gujrat. Pin. 388530. पृष्ठे २५३ ते २६४) कृष्णानंद भद्रन गुजरात येथील असून त्यांना प्रस्तुत लेखक भेटला आहे. त्यांनी भद्रन येथेच समाधी घेतली. ते पदवीधर असून अत्यंत चौकसपणे निरीक्षण करणारे व शास्त्रीय दृष्टी बाळगणारे होते. त्यांनी संपूर्ण भारताचा प्रवास करून आपले अनुभव उपरोक्त ग्रंथात सविस्तरपणे लिहून ठेवले आहेत.)

---

* त्या सेठला मात्र आपल्या घरातील जेवणाच्या वस्तू अदृश्य कशा होतात व खरकटी ताटे कुठून कपाटात येऊन पडतात हे कळत नसे. हा प्रकार कृष्णानंदांनी त्याच्या तोंडून ऐकल्यानंतर लालपूरमधील जेवणाच्या ताटाचे गूढ त्यांना उकलले.

अशा रीतीने रायनाडे यांच्या कपाटात पैसे अदृश्य रीतीने येऊन पडले याचे कोणालाही आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. त्याचे आश्चर्य वाटते फक्त जडवादी दृष्टिकोण तत्त्वज्ञान म्हणून स्वीकारलेल्या लोकांना. जडवस्तूंचे जिवंत मानवी व्यक्ती किंवा शक्तीशिवाय स्थलांतर होणे शक्य नाही असा सैद्धांतिक दृष्टिकोण बाळगणाऱ्यांना! पण असले पुस्तकी सिद्धांत वरील प्रकरणाच्या अनुभवामुळे आणि प्रयोगामुळे साफ खोटे ठरतात! वरील जडवादी तत्त्वज्ञान व सिद्धांत हे आरामखुर्चीत बसून तयार केलेले आहेत हे यावरून उघड आहे. वस्तुनिष्ठ व कठोर अशा अनुभवांवर व प्रयोगांवर ते आधारलेले नाहीत. विज्ञान आपले सिद्धांत वस्तुनिष्ठ व कठोर अशा अनुभवांवर व प्रयोगावर आधारते. तसेच अनुभवाने व प्रयोगाने सांगते; नव्हे वैज्ञानिक सत्यशोधनाची एकादा सिद्धांत खोटा ठरणे हीच कसोटी आहे असे **The Logic of Scientific Discovery** (वैज्ञानिक सत्यशोधाचे तर्कशास्त्र) या ग्रंथात प्रसिद्ध विज्ञानवादी विचारवंत के. आर. पॉप्पर याने प्रतिपादिले असून (त्याला एखादा सिद्धांत खोटा ठरवणारी कसोटी- Falsifiability Criterion म्हणतात.) त्याची ही कसोटी विज्ञान जगतात मान्यता पावलेली आहे. (पाहा, वरील मथळ्याचा ग्रंथ प्रकाशन : Hutchinson of London, 1959, by Karl Popper.) पण डोळ्यावर खोट्या तत्त्वज्ञानाचे कातडे मुद्दाम ओढून घेतलेल्या लोकांना त्याचे काय! अशा लोकांना एक वेळ 'तत्त्वज्ञ' म्हणता येईल. (नाहीतरी तत्त्वज्ञ वेडेपीर असतात हे प्रसिद्धच आहे!) पण त्यांना शास्त्रज्ञ म्हणणे हा 'शास्त्र' शब्दाचा अपमान आहे. आणि तसे नसेल आणि त्यांना शास्त्रज्ञच म्हणायचे असेल तर मग सत्य शोधणे हे शास्त्रज्ञांचे काम नव्हे असे म्हटले पाहिजे!

■■

### प्रकरण तेरावे

# श्रद्धा जेव्हा मूर्त रूप धारण करते

*तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचे रूप दावीन ।*
*अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ।।*

**- ज्ञानेश्वर**

---

निपाणी, (जि. बेळगाव) येथील एक प्रसिद्ध डॉक्टर श्री. जे. जे. निर्मळे यांना १९८० साली चि. विनय याला (विनय हा त्यांचा थोरला मुलगा.) एम. बी. बी. एस्. च्या कोर्ससाठी मेडिकल कॉलेजमध्ये प्रवेश मिळवायचा होता. पण मुलाला चांगले गुण मिळालेले असूनही प्रवेश मिळवण्यात त्यांना काही केल्या यश येत नव्हते. अशा वेळी त्यांच्या पत्नींना कोणी तरी सांगितले की, 'तुम्ही पंढरपूरला जाऊन विठोबाचे दर्शन घ्या. म्हणजे तुमचे काम होईल.' डॉक्टरांच्या पत्नी अत्यंत श्रद्धाळू असल्यामुळे आणि पंढरपूरला जाऊन विठोबाचे दर्शन घेणे ही काही अवघड गोष्ट नसल्यामुळे त्यांनी डॉक्टरांच्याकडे पंढरपूरला जाण्यासाठी हट्ट धरला. डॉ. निर्मळे हे सश्रद्ध असले तरी आपल्या मुलाच्या कॉलेज प्रवेशासाठी विठ्ठलाला साकडे घालावे हे काही त्यांच्या बुद्धीला पटण्यासारखे नव्हते. म्हणून त्यानी आपल्या पत्नीला "आपण काही पंढरपूरला येणार नाही, तथापि तुम्ही जाणार असाल तर तुमच्यासाठी खास गाडीची सोय करून देतो" असे सांगितले. त्यावर त्यांच्या पत्नी म्हणाल्या, "तुम्ही आलेच पाहिजे. तुम्हाला घेतल्याशिवाय आम्ही जाणार नाही." तेव्हा डॉ. निर्मळे म्हणाले, "माझे पेशंट्स हेच माझे विठोबा आहेत. मी येथे विठ्ठलाचीच पूजा करतो. माझे हे म्हणणे खरे असेल तर विठ्ठलच माझ्याकडे येऊ दे की."

त्यांची ही दर्पोक्ती (हा खुद्द डॉक्टरांचाच - त्यांनी स्वाक्षरीने मला दिलेल्या लेखी निवेदनातील - शब्द आहे.) ऐकून त्यांच्या पत्नी हिरमुसल्या झाल्या. पण त्यांचा डॉक्टरांच्या पुढे काही उपाय चालू शकत नसल्यामुळे अर्थातच त्यांना आपला पंढरपूरचा बेत रद्द करावा लागला.

यानंतर चार वर्षांनी घडलेली घटना. निपाणीच्या उत्तरेला पुणे-बेंगलोर रस्त्यावर असलेल्या डोंगराच्या माथ्यावरील तवंदी (स्तवनिधी) नावाच्या खेड्यातील कृष्णा पाटील नावाचा मैलकुलीचे (रस्त्यावर खडी टाकण्याचे) काम करणारा एक गरीब अशिक्षित माणूस (वय सुमारे ५०) त्यांच्या दवाखान्यात १९८४ सालच्या जून महिन्यात भयंकर डोकेदुखीची तक्रार घेऊन आला. डॉ. निर्मळे यांनी त्याची संपूर्ण तपासणी करून त्याची डोकेदुखी मेंदूतील रक्तस्त्रावामुळे (Sub-arachnoid hemorrhage) होत असल्याचे निदान केले. डॉ. निर्मळे त्या पेशंटला म्हणाले, "तुमची ही डोकेदुखी साधी, म्हणजे सर्दीखोकल्यापैकी नाही. माणसाच्या मेंदूवर एक आवरण असते. त्या आवरणाखाली रक्तस्त्राव झाला की असा डोकेदुखीचा त्रास होतो. ही व्याधी साध्या औषधाने बरी होणारी नाही. तुम्हाला बरीच किंमती औषधे घ्यावी लागतील, सलाईन द्यावे लागेल. दवाखान्यात काही दिवस राहावे लागेल."

डॉक्टरांचे हे बोलणे ऐकून तो हताश झाला व म्हणाला, "डॉक्टर, एवढा मोठा खर्च करण्याची माझी कुवत नाही." त्यावर डॉक्टर म्हणाले, "तुम्हाला जेवढे शक्य होईल तेवढे द्या. पण उपाय केलाच पाहिजे. तुमचा जीव धोक्यात आहे." आणि त्यांनी त्याला आपल्या दवाखान्यात रीतसर ॲडमिट करून घेतले. त्याच्यावर त्यांनी सर्व तऱ्हेचे उपचार केले. तो त्यांच्या दवाखान्यात बारा दिवस होता. बारा दिवसानंतर त्याला त्यांनी डिस्चार्ज दिला. त्यावेळी त्याने डॉक्टरांना बिल विचारले. डॉक्टरांनी दीड हजार रुपये बिल झाल्याचे सांगितले. ते ऐकून तो गृहस्थ म्हणाला, "डॉक्टर, माझी एवढे बिल देण्याची कुवत नाही." तेव्हा डॉ. निर्मळे त्याला म्हणाले, "तुम्हाला जेवढे देणे शक्य आहे तेवढे द्या." त्या गृहस्थाने डॉ. निर्मळेंना फक्त ५० रुपये दिले. त्यांनी ते 'प्रसाद' (हा डॉक्टरांचाच शब्द) म्हणून स्वीकारले व पुन्हा चार दिवसांनी येण्यास सांगून त्याला डिस्चार्ज दिला. (त्या रुग्णाची या बारा दिवसाच्या अवधीत राहण्याची व जेवणाची व्यवस्था डॉक्टरांनी स्वतःच्या खर्चाने केली होती. औषधेही स्वतःच्या पैशाने विकत घेतली होती.) यानंतर तो गृहस्थ डॉ. निर्मळेंच्या सल्ल्याप्रमाणे त्यांच्याकडे दोन वेळा येऊन गेला. तिसऱ्या व्हिजिटच्या वेळी तो पुन्हा त्यांच्याकडे प्रकृती तपासण्यासाठी आला असता डॉक्टरांना म्हणाला, "आमच्या गावचे लोक वर्षाच्या आषाढी वारीसाठी पंढरपूरला जात आहेत. मीही त्यांच्याबरोबर जाऊ इच्छितो. तुम्ही परवानगी दिली तर बरे होईल."

डॉ. निर्मळे म्हणाले, "मी तुमच्या वारीची जबाबदारी घेणार नाही. पण

तुमची इच्छाच असेल तर जा. वारी करताना वाटेत तुम्हाला मृत्यू आला तर ते तुमचे भाग्यच होय.''

डॉक्टरांनी जबाबदारी घेतली नाही तरी तो गृहस्थ आपल्या गावच्या लोकांबरोबर विठ्ठलावर भार ठेवून वारीला गेला. वारी निर्विघ्नपणे पार करून परत निपाणीच्या बस स्टँडवर उतरल्यानंतर तो आपल्या बरोबरच्या लोकांना म्हणाला, ''माझे निपाणीत आणखी एक विठोबा दैवत आहे. त्याला भेटल्याशिवाय मी गावी येणार नाही. तुम्ही पुढे चला. मी त्या दैवताला भेटून येतो.'' असे म्हणून तो डॉ. निर्मळेना भेटण्यासाठी त्यांच्या दवाखान्यात आला व वारी सुरक्षितपणे करून परत आल्याची आनंदाची बातमी त्याने डॉक्टरांना सांगितली. डॉक्टरांनी त्याला त्यादिवशी आपल्याकडे जेवणासाठी मुद्दाम ठेवून घेतले. त्या दिवशी डॉक्टरांच्याकडे जेवण व मुक्काम करून दुसरे दिवशी सकाळी तो डॉक्टरांचा निरोप घेऊन प्रसन्नचित्ताने आपल्या गावी निघून गेला.

दुसऱ्या वर्षी (१९८५ साली) पुन्हा पंढरपूरच्या आषाढी यात्रेला तो गेला. यात्रेहून परतल्यानंतर निपाणीच्या बस स्टँडवर उतरून पुन्हा डॉक्टर निर्मळेना भेटण्यासाठी आला व त्यांना पंढरीचा प्रसाद देऊन गेला.

पुन्हा तिसऱ्या वर्षी (१९८६ साली) तो नेहमीप्रमाणे पंढरीची आषाढी वारी करून परतताना डॉ. निर्मळेंच्या दवाखान्यात (दवाखाना व घर एकाच इमारतीत आहे) आला. त्यावेळी डॉक्टर आपल्या कन्सल्टिंग रूममध्ये (तपासणीच्या खोलीत) होते. खोलीला असलेले सरकवता येणारे दार थोडे सरकवून त्याने आत डोकावून पाहिले. डॉक्टर समोरच्या पेशंटबरोबर बोलत होते. तो डॉक्टरांना म्हणाला, ''बाईसाहेब आहेत का?''

डॉक्टर त्या गृहस्थाला पाहून म्हणाले, ''हो आहेत की. तुम्ही केव्हा आलात?''

''हा आताच आलो.'' तो गृहस्थ

''कसे काय?'' डॉक्टर.

''छान आहे.'' असे म्हणून तो आत निघून गेला. त्याने डॉक्टरांच्या पत्नीसाठी रुक्मिणीचा चुडा आणला होता. तो त्याने त्यांच्या पत्नीच्या हातात दिला. नंतर तो जेवण करून निघून गेला. मात्र जाते वेळी (कदाचित पेशंटस्‌ची गर्दी असल्यामुळे) तो डॉक्टरांचा निरोप न घेताच निघून गेला.

वरील घटनेनंतर १५ दिवसांनी म्हणजे ६ ऑगस्ट रोजी डॉ. निर्मळे यांना हृदयविकाराचा तीव्र झटका आला. त्यांची परिस्थिती एकदम गंभीर बनली. त्यांना ताबडतोब कोल्हापूरच्या 'आशा नर्सिंग होम' (राजारामपुरी) येथे नेण्यात आले. डॉक्टरांच्या या हार्टअॅटॅकची तीव्रता इतकी होती की ते पूर्ण बेशुद्ध झाले होते व तत्काळ त्यांच्यावर उपचार करण्यासाठी कोल्हापूरातील १०-१२ हृदयतज्ज्ञ डॉक्टर

तेथे जमले होते. * त्या सर्वांनी डॉ. निर्मळे यांच्या हृदयाघाताचे निदान Atrial fibrillation (हृदयाच्या स्नायूंना येणारा कठीणपणा) असे केले व पेशंट काही तासाचाच सोबती असल्याचा आपला निर्णय दिला. यापैकी डॉ. दिलीप कुलकर्णी व डॉ. एस्. आर. पाटील यांचे असे मत पडले की निर्मळेना मॅक्झेटील हे औषध दिले तरच काही आशा आहे. पण मॅक्झेटील हे औषध कोल्हापूरात मिळत नव्हते. किंबहुना ते मुंबईशिवाय कुठेच मिळत नव्हते. म्हणून ताबडतोब मुंबईला एका ओळखीच्या व्यक्तीला रात्री फोन करून ते औषध कुरिअर सर्व्हिसने पाठविण्यास सांगण्यात आले. तोपर्यंत डॉ. निर्मळे यांचा मुलगा डॉ. विनय व त्याचा मित्र डॉ. कटकोळ यांनी होमिओपॅथीची औषधे निर्मळेंना दिली. सुदैवाने सकाळी मुंबईहून मॅक्झेटील हे औषधही आले. ते ताबडतोब देण्यात आले. या सर्वांचा परिणाम होऊन निर्मळे यांच्या प्रकृतीला थोडा आराम पडला, व हृदयतज्ज्ञ डॉक्टर लोकांनी धोका टळल्याचे जाहीर केले. पुढे डॉ. निर्मळे यांची प्रकृती सुधारत गेली व तीन आठवड्यांनी ते पूर्ण बरे होऊन घरी परत आले. नंतर डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार त्यांनी २/३ महिने पूर्ण विश्रांती घेतली.

वरील घटनेनंतर व डॉ. निर्मळे पुन्हा आपला व्यवसाय करू लागल्यानंतर सहज एकदा तो तवंदीचा गृहस्थ त्यांच्या दवाखान्यात आला. त्याला पाहून डॉ. निर्मळे म्हणाले, "अहो पाटील, तुम्ही मालकिणीला रुक्मिणीचा चुडा देऊन गेला व (त्यामुळे) माझा जीव वाचला. मला हृदयाचा तीव्र झटका आला होता." **

तो गृहस्थ आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "कुठला चुडा?"

डॉ. निर्मळे म्हणाले, "त्या दिवशी पंढरपुरीची आषाढी वारी करून परत आल्यानंतर घरी पत्नीला तुम्ही रुक्मिणीचा चुडा देऊन गेला हे आठवते ना?"

तो गृहस्थ जास्तच आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "नाही. मी तुमच्याकडे आषाढी वारी करून परत येताना इकडे आलो नाही. परस्पर गावी निघून गेलो."

---

* यावेळी निपाणीत डॉ. निर्मळे वारल्याची बातमी पसरली; व निपाणीच्या लोकांची कोल्हापूरला एकच रीघ लागली. 'आशा नर्सिंग होम'ला एका यात्रेचे स्वरूप आले. त्या लोकांना कोल्हापुरात दवाखान्यात आल्यानंतरच बातमी खोटी असल्याचे कळले. इकडे निपाणीत संध्याकाळी कोणाची तरी प्रेतयात्रा निघाली होती. ती डॉ. निर्मळे यांचीच आहे असे समजून काहीजण आपल्या घरासमोर फुलांचे हार घेऊन तयारीत राहिले होते असे नंतर कळले!

** हिंदू संस्कृतीत स्त्रीचा चुडा हे तिच्या सौभाग्याचे लक्षण समजले जाते. त्या गृहस्थाने डॉक्टरांच्या पत्नीना चुडा दिला (चुडेदान केले) म्हणजे तिचे सौभाग्य राखले. डॉ. निर्मळेंचा जीव वाचवला - जीवदान केले असा अर्थ.

आता डॉ. निर्मळेंच्यावर आश्चर्यचकित होण्याची पाळी आली. ते म्हणाले, "खरंच, तुम्ही आला नाही?"

"खरंच, मी आलो नाही." तो गृहस्थ म्हणाला.

डॉ. निर्मळे विचारात पडले. त्यांनी त्या कृष्णा पाटलाने आपल्या खोलीचे दार सरकावून आत डोकावून पाहताना त्याचा चेहरा स्पष्ट पाहिला होता. त्यांच्याशी त्याने संभाषणही केले होते. "मालकीण आहेत का?" असा स्पष्ट प्रश्न त्याने विचारला होता, व आपण 'केव्हा आलात?' असे विचारल्यानंतर 'आत्ताच आलो' व 'कसे काय?' या प्रश्नाला 'छान आहे' अशी उत्तरेही त्याने दिली होती, हे त्यांना स्पष्ट आठवत होते. शिवाय घरी त्यांच्या पत्नीशीही त्याने संभाषण केले होते, 'रुक्मिणीचा चुडा आणलाय, घ्या' असे म्हणून तो तिच्या हातात घालायला दिला होता. त्याने जेवणही केले होते. हा सर्व भ्रम असणे शक्य नाही. चुडा तर अजूनही त्यांच्याकडे होताच. कृष्णा पाटील तर म्हणतो, 'मी आलोच नाही. परस्पर गावी गेलो.' त्यांना प्रश्न पडला की कृष्णा पाटलाचे रूप घेऊन प्रत्यक्ष विठ्ठल तर आला नाही? आणि त्यांना सहा वर्षापूर्वीची गोष्ट आठवली. त्यांच्या पत्नीने सहा वर्षांपूर्वी पंढरपूरला विठ्ठलाच्या दर्शनासाठी चलण्याचा त्यांच्याजवळ हट्ट धरला होता. त्यावेळी ते तिला म्हणाले होते की, 'माझे पेशंटस् हाच माझा विठ्ठल आहे. मी येथे विठ्ठलाचीच पूजा करतो. हे माझे म्हणणे खरे असेल तर विठ्ठलच माझ्याकडे येऊ दे की.' आणि आता स्वत: विठ्ठलच त्यांच्याकडे आला होता! तेही त्यांच्या पेशंटच्याच रूपाने! आणि तेही ज्याचा त्यांनी जीव वाचवला होता - कसल्याही मोबदल्याची अपेक्षा न धरता वाचवला होता - त्याच पेशंटच्या रूपाने! आणि तेही खुद्द डॉक्टरांचाच जीव वाचविण्यासाठी - त्यांच्या पत्नींना 'चुडेदान' करण्यासाठी! डॉक्टरांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

## यो यच्छ्रद्धः स एव सः। (जशी ज्याची श्रद्धा तसे त्याला फळ.)

भगवद्‌गीतेच्या सातव्या अध्यायात पुढील एक श्लोक आहे :

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धा तामेव विदधाम्यहम् ।। ७.२१.**

याचा अर्थ असा : 'जो जो ज्या ज्या रूपात ईश्वराची श्रद्धेने भक्ती करतो त्याला त्याला त्याच्या श्रद्धेनुसार मी (ईश्वर) ते ते रूप धारण करतो व त्याची ती ती श्रद्धा दृढ करतो.' वरील प्रकरणामध्ये आपल्या पेशंटस्‌ना प्रत्यक्ष विठ्ठल (ईश्वर) मानून त्यांची सेवा (भक्ती) करणाऱ्या डॉ. निर्मळेंना ईश्वराने (विठ्ठलाने) त्यांच्या एका पेशंटच्याच रूपाने भेटून त्यांची श्रद्धा दृढ केली आहे हे स्पष्ट आहे. गीतेचे वरील वचन केवळ कविकल्पना नसल्याचे हे प्रकरण अशा रीतीने सिद्ध करते.

भगवद्गीतेचे तत्त्वज्ञान हे केवळ पुस्तकी तत्त्वज्ञान नसून अनुभवाधिष्ठित शास्त्र (Science) आहे याची यावरून वाचकांना कल्पना येईल.

वरील श्लोकानंतरच्या पुढच्या श्लोकाची दुसरी ओळ अशी आहे. **'लभते च तथा कामान् मयैव विहितान् हि तान्।।'** याचा अर्थ 'त्याला त्याच्या इच्छेप्रमाणे मीच फळ देतो' असा आहे. वरील प्रकरणात डॉ. निर्मळे यांनी कृष्णा पाटील या पेशंटचा निष्कामभावाने (सेवा करून) जसा जीव वाचवला तसा डॉक्टरांचाही जीव ईश्वराने (विठ्ठलाने) (चुडेदान करून) त्याच पेशंटच्या रूपाने वाचवला. अशा रीतीने हे गीतावचनही अनुभवाधिष्ठित असल्याचे - शास्त्रशुद्ध असल्याचे - सिद्ध होते. विठ्ठलाचा निस्सीम भक्त असलेल्या दामाजीपंताने दुष्काळात उपाशी मरणाऱ्या जनतेला राजाचे धान्य वाटल्यामुळे त्याच्यावर बेतलेले संकट विठू महाराच्या रूपाने त्या धान्याची किंमत राजाकडे भरून विठ्ठलाने टाळल्याची पुराणातील कथा ही कपोलकल्पित नाही, हेही यावरून वाचकांना स्पष्ट होईल.

तथापि, वरील प्रकरणी संशयवादी लोक म्हणतील की डॉ. निर्मळे यांनी स्वत:चे महत्त्व वाढविण्यासाठी बनवलेली ही एक काल्पनिक कथा असण्याची शक्यता आहे. त्यांच्या या आक्षेपाचा प्रथम आपल्याला विचार केला पाहिजे.

## संशयवाद्यांच्या एका आक्षेपाचा विचार

डॉ. निर्मळे यांना स्वत:चे महत्त्व वाढविण्यासाठी एखादी गोष्ट बनवून सांगण्याची गरज का वाटावी, हा एक पहिला महत्त्वाचा प्रश्न येथे निर्माण होतो. डॉ. निर्मळे हे निपाणीतील एक प्रथितयश डॉक्टर आहेत आणि वरील कथा पुराणात शोभणारी, म्हणजे रूढ विज्ञानाच्या दृष्टीने अंधश्रद्धेत मोडणारी असल्यामुळे अशी कथा बनवून सांगणे ही गोष्ट डॉक्टरांचे वैद्यकीयदृष्ट्या महत्त्व वाढविण्याऐवजी वैद्यकीय क्षेत्रात त्यांना कमीपणा आणणारी असल्यामुळे कोणताही प्रथितयश डॉक्टर असली गोष्ट बनवून सांगणे राहोच, खरी असली तरी ती सांगणार नाही हे स्पष्ट आहे. बरे, श्रद्धाळू लोकात आपले महत्त्व वाढावे म्हणून त्यांनी ती बनवून सांगितली असे म्हणावे, तर त्यामुळे त्यांचे जे महत्त्व वाढेल ते त्यांच्या धंद्याच्या दृष्टीने त्यांना परवडणारे नाही! कारण त्यामुळे त्यांच्याकडे (दामाजीकडे उपाशी लोकांची जशी रीघ लागली) तशी फुकट सेवाशुश्रूषा करून घेणाऱ्या पेशंटांची रीघ या आधुनिक 'दामाजी'कडे लागण्याचा धोका होता! आणि प्रत्यक्षात डॉक्टर निर्मळे हे भेटेल त्याला ही गोष्ट सांगत असल्याचे आढळूनही येत नाहीत. अगदी घनिष्ठ संबंधातील लोकांनाच फक्त त्यानी ही घटना सांगितली आहे. (प्रस्तुत लेखकालाही त्यांनी ती सांगितली, ते केवळ त्याचा या विषयांचा अभ्यास असल्यामुळेच - म्हणजे तो या विषयाचे संशोधन करीत असल्यामुळेच - होय.)

ही गोष्ट बनवून सांगण्यामधील दुसरी मोठी अडचण म्हणजे त्यांना आपल्या कुटुंबियांना व तवंदीच्या त्या पेशंटला आपली ही काल्पनिक गोष्ट सांगण्यासाठी आपल्या कटात सामील करून घ्यावे लागणार आहे आणि एवढे कष्ट घेण्यासारखे व इतके लोक त्यांच्या या कटात सामील होण्यासारखे येथे कोणते बलवत्तर कारण आहे बरे? स्वत: डॉक्टरांना व त्यांच्या कटात सामील होणाऱ्यांना त्यामुळे काय लाभ होणार आहे?

ही गोष्ट बनवून सांगण्याच्या शक्यतेविरुद्ध परिस्थितीजन्य पुरावा मात्र इतका बलवत्तर आहे की वरील दोन्ही गोष्टीचा विचार बाजूला ठेवला तरी ही गोष्ट सत्य असल्याचे सिद्ध करण्यास तो एकच पुरेसा ठरतो. उदा. त्यांच्या पत्नीने पंढरपूरला चलण्यासाठी धरलेला हट्ट व त्यांनी पत्नीला दिलेले उत्तर या दोन्ही सत्य घटना आहेत. तसेच तवंदीच्या कृष्णा पाटलाच्या आजाराचे स्वरूप गंभीर होते व त्याला डॉ. निर्मळेंनी स्वत:च्या खर्चाने बरे केले हीही वस्तुस्थिती आहे. तो गृहस्थ आजारातून बरा झाल्यानंतर पंढरपूरची दोन वेळा वारी करून परतताना दोन्ही वेळा डॉक्टरांना भेटायला आला, या घटनाही सत्य आहेत. (डॉ. निर्मळे यांना तीव्र स्वरूपाचा हार्टअॅटॅक आला ही गोष्टही सत्य आहे.) या सर्व घटनांचा विचार करता पंढरीची तिसऱ्या वेळी वारी करून परतताना कृष्णा पाटलाने त्यांना भेटायला यावे हे अगदी स्वाभाविक होते. त्याने तिसऱ्या भेटीत रुक्मिणीचा चुडा त्यांच्या पत्नींना दिला यातही अस्वाभाविक असे काहीच नव्हते. तार्किक दृष्टीने विचार करता ती घटना क्रमप्राप्तच ठरते. अर्थात, येथे संशयवादी कृष्णा पाटील डॉक्टरांना प्रत्यक्ष भेटायला आला होता, पण 'आलो नाही' असे त्याने त्यांना खोटेच सांगितले असे अवश्य म्हणू शकतात आणि या शक्यतेचा आपण अवश्य विचार करू. पण डॉ. निर्मळे यांनी ही गोष्ट बनवून सांगितली असे कट्टर संशयवाद्यांनाही म्हणता येणार नाही, याविषयी कोणाचे दुमत होईल असे वाटत नाही.

## संशयवाद्यांच्या आणखी एक आक्षेपाचा विचार

कृष्णा पाटलाने डॉ. निर्मळेना भेटूनही 'भेटलो नाही' असे खोटेच सांगण्याचे कारण काय असण्याची शक्यता आहे बरे? स्वत:चा जीव वाचवणाऱ्या - कसल्याही मोबदल्याची अपेक्षा न करता स्वत:च्या खर्चाने वाचवणाऱ्या - डॉक्टरांना त्या गृहस्थाने खोटे बोलण्यासारखे कोणते बलवत्तर कारण होते बरे? हे अर्थातच संशयवादी सांगू शकणार नाहीत. खोटे बोलण्यामध्ये माणसाचा एखादा स्वार्थ दडला असणे अर्थातच शक्य आहे. आता येथे त्या गृहस्थांचा भेटूनही 'भेटलो नाही' असे खोटे बोलण्यामध्ये कोणता स्वार्थ दडला होता असे म्हणता येईल? स्वार्थाच्या दृष्टीनेच विचार करायचा तर - म्हणजे येथे खोटे बोलण्यात त्या गृहस्थाचा

स्वार्थ होता असेच म्हणायचे तर - डॉक्टरांना भेटूनही 'भेटलो नाही' असे म्हणण्याऐवजी उलट भेटलेला नसतानाही 'भेटलो' असे म्हणण्यातच त्या गृहस्थाचा स्वार्थ दडलेला असण्याची जास्त शक्यता आहे हे स्पष्ट आहे. कारण असे (खोटे) बोलल्यामुळे डॉक्टरांच्या पत्नींना चुडेदान करून डॉक्टरांचा जीव वाचवल्याने फुकटचे श्रेय त्याला अनायासे मिळाले असते ! पण हे फुकट मिळणारे श्रेय त्याने घेतले नाही व तो खरे तेच बोलला. कारण तो भेटायला आलाच नव्हता ही वस्तुस्थिती होती. म्हणजे या प्रकरणात त्याचा कसलाही स्वार्थ दडलेला नव्हता; व एखादा स्वार्थ असता तरी भेटूनही 'भेटलो नाही' असे म्हणण्याऐवजी भेटलेला नसताना 'भेटलो' असे उलट म्हणण्यातच तो होता असे म्हणावे लागते. तात्पर्य, त्या गृहस्थाने खोटे बोलण्याची ही उरलेली संशयवाद्यांनी उपस्थित केलेली शक्यताही निकालात निघते. आता या दोन शक्यतांचा निकाल लागल्यानंतर शेवटी एकच शक्यता उरते. ती म्हणजे ही घटना अतींद्रिय पातळीवरची असण्याची शक्यता आणि तीच येथे शेवटी स्वीकारावी लागते. कारण अशा प्रकारची ही एकच घटना नसून अशा घटनांची इतर अनेक उदाहरणे इतिहासात सापडतात. हल्ली ही अशा घटना घडत असल्याची उदाहरणे मिळतात. ही सर्व उदाहरणे प्रस्तुत प्रकरणाला - या प्रकरणाच्या सत्यतेला - बळकटी आणणारी असल्यामुळे अशा प्रकारांची काही उदाहरणे - उदाहरणांचे दाखले - देणे येथे अप्रस्तुत ठरणार नाही. ते देण्यापूर्वी एका तात्त्विक मुद्याचे स्पष्टीकरण येथे प्रथम करणे आवश्यक आहे. हा तात्त्विक मुद्दा म्हणजे 'अतींद्रिय' आणि 'दैवी' उपपत्ती यातील फरक होय. कारण वरीलसारख्या प्रकरणांची काहीजण 'दैवी' उपपत्ती देताना दिसून येतात.

## 'अतींद्रिय' उपपत्ती आणि 'दैवी' उपपत्ती यामधील फरक

वर म्हटले आहे की डॉ. निर्मळे यांना आपल्याला कृष्णा पाटलाच्या रूपाने प्रत्यक्ष विठ्ठलच भेटायला आला व आपल्या पत्नीला चुडेदान करून त्याने आपला जीव वाचवला, असे वाटले. डॉ. निर्मळे यांना असे वाटणे स्वाभाविक होते. कारण सहा वर्षांपूर्वी ते आपल्या पत्नीला म्हणाले होते की, 'माझे पेशंटस् हाच माझा विठ्ठल आहे. मी येथे विठ्ठलाचीच पूजा करतो. माझे हे म्हणणे खरे असेल तर विठ्ठलच माझ्याकडे येऊ दे की.' पण ते पूर्वी असे म्हणाले होते म्हणून प्रत्यक्ष विठ्ठलच त्यांना भेटायला आला होता असे ठरत नाही. असे ठरण्यापूर्वी विठ्ठलाचे स्वतंत्र अस्तित्व वस्तुनिष्ठ पुराव्यांच्या आधारे प्रथम सिद्ध झाले पाहिजे. ते सिद्ध झालेले नाही आणि ते कधीच सिद्ध होणार नाही. पुराणात वर्णिलेला (पीतांबर नेसलेला, कौस्तुभ मण्यांची माळ घातलेली इ.) विठ्ठल जरी त्यांना भेटायला आला असता तरी तो पुरावा विठ्ठलाचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करू शकत नाही. (अशी

एखादी व्यक्ती त्यांच्याकडे आली असती तर डॉ. निर्मळेनी त्या व्यक्तीला 'विठ्ठला'चे सोंग घेऊन आलेला कोणी लफंगा समजून हाकलूनही दिले असते!) 'देव' जोपर्यंत प्रकट होत नाही तोपर्यंतच 'खरा' असतो ! प्रकट झाल्याबरोबर त्याच्यातील 'देव'त्व एकदम नाहीसे होते! तो मग एक साधा मनुष्य बनतो! याचे कारण भौतिकतेच्या पलीकडच्या सर्व घटनांची उपपत्ती केवळ अतींद्रिय पद्धतीनेच देता येते हे आहे. या उपपत्तीला 'दैवी' म्हणायचे ते केवळ आपल्या मनाच्या समाधानासाठी! मनाची समजूत काढण्यासाठी ! आणि मनाची अशी समजूत काढण्याची आपल्याला गरज भासते ती अशा घटनांची भौतिक उपपत्ती आपल्याला (देवाची मदत घेतल्याशिवाय) देता येत नाही म्हणून! पण मुख्य म्हणजे अतींद्रिय शास्त्राचा-अशा घटनेतील या शास्त्राच्या उपपत्तींचा - आपल्याला परिचय नाही म्हणून !

आणि अतींद्रिय शास्त्राचा परिचय नसल्यामुळे काही बुद्धिवादी लोक बुद्धीचे - अकलेचे कसे तारे तोडतात पाहा. उदा. ते म्हणतात, ''हे संत आपल्या विठ्ठलाला विश्वंभर - विश्वाचे भरणपोषण करणारा - म्हणतात. पण त्यांच्या या विश्वंभराला दुष्काळ निवारता येत नाही. दुष्काळ निवारण्याऐवजी तो एका मुसलमान (म्लेंछ) राजापुढे विठ्या महार बनून जोहार (मुजरा) करतो, आणि लुटलेल्या धान्याचे पैसे भरतो !''

या बुद्धिवादी लोकांना '**यो यो यां यां तनुं भक्तः**' या गीतेतील वचनाचा परिचय नाही किंवा ते वचन विश्वातील एक अतींद्रिय विज्ञानाचा नियम सांगते हे तरी त्यांना माहीत नाही, असे म्हणावे लागते. वास्तविक 'देवा'ची (विठ्ठलाची) कल्पना ही कविकल्पना आहे. कवी (आणि संत कवीच असतात) काव्यमय भाषेत बोलतात. ते सत्यशोधक नसतात. खऱ्या खोट्याचा शोध घेणे हे त्यांचे काम नसते. या उलट अतींद्रिय विज्ञान हे सत्याचा शोध घेते आणि सत्य हे नेहमी अनुभवाधिष्ठित असते. 'विठ्ठल' ही एक कविकल्पना आहे, तर डॉ. निर्मळे यांना भेटणारा 'कृष्णा पाटील' हा प्रत्यक्ष (सत्य) अनुभव आहे. तो त्यांना भेटला ही (अतींद्रिय शास्त्राच्या दृष्टीने) सत्य घटना आहे आणि एखादी घटना जेव्हा घडते तेव्हा ती भौतिक विज्ञानाच्या दृष्टीने कितीही 'असंभाव्य' वाटत असली तरी ती अतींद्रिय विज्ञानाच्या दृष्टीने अगदी स्वाभाविक - निसर्गनियमानुसार घडणारी - घटना असते. आपणाला अतींद्रिय विज्ञानाचा परिचय (वा त्याचा अभ्यास) नसल्यामुळे ती घटना आपल्याला असंभाव्य वाटते, इतकेच दृश्य भौतिक जगाच्या नियमाप्रमाणेच - ज्या नियमांचा अभ्यास भौतिक विज्ञान करते - अतींद्रिय जगाचेही काही नियम असून या नियमांचा अभ्यास अतींद्रिय विज्ञान करते. ''ज्या ज्या रूपात तुम्ही 'ईश्वरा'ची श्रद्धेने भक्ती-सेवा करता, त्या त्या रूपात तो 'ईश्वर' तुम्हाला भेटतो'' हा असाच एक अतींद्रिय जगाचा शास्त्रीय (निसर्ग) नियम आहे व तो गीतेत ''**यो यो यां यां तनुं भक्तः**''

या श्लोकात सांगितलेला आहे आणि तुम्ही श्रद्धेने तशी भक्ती-सेवा करून त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊ शकता. त्या वचनाचा (शास्त्रीय) पडताळा पाहू शकता. काही संतांना पीतांबरधारी विठ्ठल जर भेटलेला असेल, तर ते त्यांच्या तशा रूपातील विठ्ठलाची श्रद्धेने त्यांनी सेवा-भक्ती केल्यामुळेच होय, असे याच कारणासाठी म्हणावे लागते. (अशी दर्शने अनेकांना झालेलीही आहेत.) * तो अनुभव खोटा म्हणता येत नाही.

अशा रीतीने 'जशी ज्याची श्रद्धा असेल तसे त्याला फळ मिळते' (**यो यच्छ्रद्धः स एव सः ।**) हा अतींद्रिय जगाचा (निसर्ग) नियम असून या नियमानुसार दामाजीपंताला जसे त्याच्या श्रद्धेचे-सेवेचे फळ मिळाले, तसे डॉ. निर्मळेनाही त्यांच्या श्रद्धेचे-सेवेचे फळ मिळाले. यात 'विठ्ठला'चा - विठ्ठल नावाच्या कोणा 'देवा'चा काही संबंध नाही. (असलाच तर तो काव्यमय संबंध आहे, शास्त्रीय नाही.) आणि म्हणून अशा 'देवा'ची बुद्धिवाद्यांनी टिंगल करणे हे अज्ञानमूलक ठरते. अतींद्रिय शास्त्राची ओळख नसल्याचे ते द्योतक आहे. पण आपले हे अज्ञान झाकण्यासाठी हे बुद्धिवादी लोक 'सर्वांनाच असा अनुभव का येत नाही?' असा एक अडाणी प्रश्न विचारतात ! या प्रश्नाचे उत्तर 'सर्वांचीच श्रद्धा किंवा सेवा दामाजीप्रमाणे किंवा डॉ. निर्मळेप्रमाणे प्रामाणिक किंवा अंत:करणापासूनची नसते' हे आहे. पण यावर बुद्धिवादी म्हणतात की 'हे Catch-22 उत्तर आहे.' (म्हणजे अनुभव येत नाही हा तुमचाच दोष आहे, असे म्हणून स्वत: निसटून जाण्याचा हा प्रकार आहे.) पण निसटून जाण्याचा हा प्रकार नाही, तर अतींद्रिय जगाचा - अतींद्रिय अनुभव येण्यासाठीचा तो नियमच आहे. अतींद्रिय विज्ञानाचा परिचय नसल्यामुळे बुद्धिवाद्यांना हे उत्तर म्हणजे निसटून जाण्याचा प्रकार वाटतो इतकेच. हा अतींद्रिय जगाचा नियम 'मानला तर देव नाही तर दगड' या लोकोक्तीतून ही व्यक्त झालेला असून तो वास्तविक '**यो यच्छ्रद्धः स एव सः ।**' या गीतावचनाचाच अनुवाद आहे. म्हणजे सामान्य लोकांना सुद्धा या गीता वचनाचा - अतींद्रिय जगाच्या या नियमाचा अनुभवातून परिचय आहे - जो या बुद्धिवाद्यांना नाही ! याचे कारण बुद्धिवाद्यांजवळ सामान्य लोकांप्रमाणे अतींद्रियावर श्रद्धा नाही हे आहे आणि कोणत्याही शास्त्रीय नियमांचा - शास्त्रीय सत्याचा - परिचय अनुभवातूनच होत असतो आणि अतींद्रिय क्षेत्रातील अनुभव अतींद्रियावर श्रद्धा असेल तरच येतो.

---

* अशा दर्शनांना बुद्धिवादी भ्रम किंवा मनाचा खेळ म्हणतात ! (कारण हा पीतांबरधारी विठ्ठल एकदम अतींद्रिय रीतीने - अकल्पितपणे - प्रकट होतो, व तसाच अदृश्यही होतो.) या लोकांना अतींद्रिय विज्ञानाची - त्याच्या नियमांची - ओळख नसल्याचा हा आणखी पुरावा !

## श्रद्धेतून अतींद्रिय अनुभव का येतात?

श्रद्धेमुळे अतींद्रिय अनुभव का येतात यालाही तसेच शास्त्रीय कारण आहे. मानवाला अतींद्रिय अनुभव येतात ते अतींद्रिय विज्ञानाने शोधून काढलेल्या एका प्रसिद्ध नियमानुसार येतात. हा नियम 'पिंडी ते ब्रह्मांडी' या नावाने प्रसिद्ध आहे. पिंड म्हणजे मानवी शरीर आणि ब्रह्मांड म्हणजे संपूर्ण विश्व. मानवी शरीर या विश्वापासून निर्माण झालेले असल्यामुळे संपूर्ण विश्वाचे प्रतिबिंब त्यात पडले आहे. दुसऱ्या शब्दात मानवी शरीर म्हणजे विश्वाची एक लहान प्रतिकृतीच (replica) आहे. याचा अर्थ विश्वाला असलेले मन मानवातही सूक्ष्म रूपाने आहे, असा होतो.* म्हणूनच मानवी मनाचा या वैश्विक मनाशी संबंध जोडण्याचे हे काम श्रद्धा करते. म्हणून श्रद्धेला इतके महत्त्व. ते रेडिओतील स्टेशन लावणाऱ्या बटणासारखे आहे. तुमचे रेडिओरूपी मन शुद्ध (प्रामाणिक, निष्कपट) असेल तरच बरोबर स्टेशन लागते. नाही तर गोंगाट ऐकू येतो. मग अतींद्रिय जगाचा नियम काम करीत नाही. बुद्धिवादी यालाच Catch - 22 म्हणून मोकळे होतात!

दामाजीपंत व डॉ. निर्मळे यांची मने शुद्ध परोपकाराच्या - दुसऱ्यांचा जीव वाचवण्याच्या - प्रेरणेतून कार्यप्रवृत्त झाली. म्हणून त्यांची मने त्या विश्वंभराच्या - वैश्विक (वा विश्वाच्या) मनाशी (Cosmic life or mind) जुळली व म्हणून ते विश्वमन 'विठू महारा'च्या व 'कृष्णा पाटला'च्या रूपाने अवतार घेऊन त्यांच्या मदतीला संकटाच्या वेळी धावून आले. त्याने मानवी रूप कसे घेतले? दामाजीने वाटलेल्या धान्याचे पैसे त्याने कुठून आणले? डॉ. निर्मळे यांच्या पत्नीसाठी त्याने चुडा कुठून आणला? त्या मनाने मानवी रूप अतींद्रिय जगापासूनच घेतले. पैसे व (रुक्मिणीचा) चुडा हेही त्याने अतींद्रिय जगापासूनच आणले. कारण विश्वातील प्रत्येक कण (मानवी शरीराच्या प्रत्येक पेशीप्रमाणे) जिवंत आहे, चैतन्ययुक्त आहे म्हणून ते कण कोणतेही रूप धारण करू शकतात. 'कण कणमे भगवान्' - अणुरेणूत परमेश्वर भरला आहे - ही लोकोक्ती हेच अतींद्रिय विज्ञानाचे - अतींद्रिय जगाचे - सत्य सांगते. माणसाच्या शरीरात मन असल्यामुळे त्याला जसा जिवंतपणा येतो तसे विश्वातही (वैश्विक) मन असल्यामुळे विश्वातही जिवंतपणा आहे आणि जिवंत विश्व काहीही करू शकते आणि ते काहीही करू शकणारे असल्यामुळे

---

* विश्वाला 'मन' आहे, विश्वापासून मानव निर्माण झाला इ. कल्पना शास्त्रीय आहेत, काल्पनिक नाहीत. यासाठी पाहा, The Life of the Cosmos - Lee Smolin (1997) आणि The Anthropic Cosmologicl Principle - John D. Barrow & Frank J. Tipler (1986)

मानवाच्या - अर्थात, शुद्ध मनाच्या मानवाच्या - इच्छा व संकल्प ते साध्य करते, ते पुरे करणाऱ्या व त्याच्या मदतीला धावून येणाऱ्या या विश्वाला मग 'देव' म्हटल्याने काही बिघडत नाही. इतकेच की तो 'वैयक्तिक देव' नाही. तर 'विश्वात्मक देव' आहे. म्हणून ज्ञानेश्वर 'आता विश्वात्मके देवे' अशी त्याची आळवणी करतात व त्याच्याकडे पसायदान मागतात.

विश्वाची लहान प्रतिकृती असलेला मानव जसा भौतिक व नैतिक नियमांनी बांधला गेला आहे, तसे तो ज्याची प्रतिकृती आहे ते विश्वही भौतिक व नैतिक नियमांनी बांधले गेले आहे. म्हणूनच वैश्विक मनाशी मानवाचे शुद्ध व नैतिक मनच संबंध जोडू शकते. अनैतिक मन नाही. तसेच मनुष्य जशी व जितकी विश्वाची (विश्वातील प्राणीमात्राची) सेवा-भक्ती करतो, तशी व तितकीच विश्वही - वैश्विक मनही - त्याची सेवा-भक्ती करते. '**ये यथा मां प्रपद्यन्ते तांसाथैव भजाम्यहम्**' या गीतवचनात हाच नियम सांगितला आहे. क्रियेला योग्य प्रतिक्रिया हा गतीविषयक भौतिक नियमासारखा विश्वाचा हा नैतिक नियम असून विश्व तो काटेकोरपणे पाळते. यात 'देवा'चा - वैयक्तिक 'ईश्वरा'चा - काही संबंध नाही. भौतिक व अतींद्रिय विज्ञानाचे नियम विश्वाच्या त्या त्या पातळीवर सारख्याच कार्यक्षमतेने व समांतर रीतीने कार्य करीत असतात.

अशा रीतीने डॉ. निर्मळे यांच्या अनुभवाची उपपत्ती अतींद्रिय विज्ञानाची कास धरली तरच देता येते, 'दैवी' उपपत्तीची कास धरून ती देता येत नाही असे म्हणावे लागते. असे म्हणण्याला आणखी एक कारण आहे. अशा घटनांची 'दैवी' उपपत्ती देणारे म्हणतात, की परमेश्वर विश्वाच्या प्रक्रियेत, त्याच्या जीवनक्रमात, हवे तेव्हा व हवा तसा हस्तक्षेप करू शकतो. कारण तो सर्व शक्तिमान आहे. तसे नसते तर '**यदा यदाही धर्मस्य ग्लानिर्भवति**' या श्लोकातून गीतेने ईश्वराच्या अवताराची - संकटकालच्या त्याच्या विश्वातील हस्तक्षेपाची -कल्पना मांडली नसती. पण 'वैयक्तिक ईश्वरा'ने विश्वप्रक्रियेत हस्तक्षेप करण्याची ही कल्पना अशास्त्रीय आहे. विश्व कोणत्याही व्यक्तीच्या - मग ती व्यक्ती भले सर्वशक्तीमान परमेश्वर असो - लहरीने चालत नाही, तर विशिष्ट नियमानुसार चालते. विश्व विशिष्ट नियमानुसार चालते असे मानले तरच 'शास्त्र' किंवा 'विज्ञान' शक्य आहे. हवे तसे व हवे तेव्हा हस्तक्षेप करणारा 'देव' (मग तो कितीही दयाळू असो) मानला तर शास्त्राचा - शास्त्रीय नियमांचा - विचारच सोडून द्यावा लागेल आणि शास्त्रीय नियमांच्या अभावी सर्वत्र गोंधळ माजेल. पण विश्व हे गोंधळयुक्त (chaos) असल्याचे आढळून येत नाही. ते नियमयुक्त (cosmos) असल्याचे आढळून येते आणि सुव्यवस्थित विश्वाचे हेच नियम भौतविज्ञानाने व अतींद्रिय विज्ञानाने शोधून काढले आहेत आणि हेच नियम गीतेने '**यदायदा हि धर्मस्य**' या श्लोकातून

अवताराच्या कल्पनेतून सांगितले आहेत. कारण विश्वाची व्यवस्था जशी भौतिक (Physical order) आहे, तशी ती नैतिक ही (Moral order) आहे आणि अवताराची कल्पना विश्व नैतिक व्यवस्थेवर आधारले असल्याचे गृहीत धरूनच मांडलेली आहे. वैयक्तिक 'देवा'चा हस्तक्षेप गृहीत धरून मांडलेली नाही. पहिली कल्पना शास्त्रीय आहे, तर दुसरी (हस्तक्षेप करणाऱ्या देवाची कल्पना) अशास्त्रीय आहे आणि गीता हे शास्त्र आहे. कविकल्पना वा काव्य नाही. (विश्व नियमानुसार चालते याविषयीचे शास्त्रीय विवेचन ७ व्या प्रकरणात केले आहे, ते पाहा.)

अशा रीतीने 'दैवी उपपत्ती' व 'अतींद्रिय उपपत्ती' यामधील फरक स्पष्ट केल्यानंतर डॉ. निर्मळे यांच्याप्रमाणेच इतरही अनेक सामान्य लोकांच्या जीवनातही अशा प्रकारच्या अतींद्रिय घटना घडल्याचे जे दाखले आहेत तिकडे वळू.

## अशा प्रकारच्या अतींद्रिय घटनांचे अलीकडच्या काळातील काही दाखले

**घटना १ ली :** गेल्या (१९ व्या) शतकातील रामकृष्ण परमहंस व अक्कलकोटचे स्वामी समर्थ यांच्यापासून तो तहत आधुनिक कालातील म्हणजे अक्कोळ (जि. बेळगाव) येथे जन्मलेले व आदमापूर येथे १९६६ साली महासमाधी घेतलेले आदमापूरचे (जि. कोल्हापूर) बाळूमामा या धनगर समाजात जन्म घेतलेल्या संतापर्यंत अनेक सत्पुरुष व सिद्ध पुरुष महासमाधी घेतल्यानंतरही संबंधिकांना व भक्तांना मूळ रूपात वा अन्य तऱ्हेने भेटल्याचे अनेक दाखले आहेत. पण ते येथे देत नाही. येथे सामान्य व्यक्तीच इतर सामान्य व्यक्तीना जिवंतपणीच भेटल्याचे जे दाखले आहेत ते फक्त देतो. त्यामुळे 'दैवी' उपपत्ती'ऐवजी अतींद्रिय उपपत्तीचाच स्वीकार केल्यावाचून कसे गत्यंतर नाही, हेच स्पष्ट होणार आहे.

कोल्हापूर जिल्ह्यात शिक्षण खात्यात 'विस्तार शिक्षण अधिकारी' या पदावरून अलीकडेच निवृत्त झालेले श्री. बी. बी. ऐदमाळे या प्रस्तुत लेखकाच्या एका स्नेह्याचे हे अनुभव असून ते त्यांच्याच शब्दात खाली देत आहे. (ते त्यांच्याच शब्दात का देत आहे हे नंतर स्पष्ट होईल.)

माझे द्वितीय चिरंजीव अरुण (बी. टेक्.) याच्या विवाह प्रसंगाची ही घटना.

फेब्रु. १९९६ च्या पहिल्या आठवड्यात पंढरपूरचे श्री. सी. एस. तथा भाऊसाहेब फत्तेपूरकर यांची द्वितीय कन्या चि. पल्लवी (बी. ए.) हिच्याबरोबर चि. अरुणचा विवाह ठरला.

लग्न आमचेकडेच ठरले होते. श्री क्षेत्र नृसिंहवाडी येथे प. पू. धुळगांवकर पाटील महाराज यांच्या मठातच लग्न व्हावे ही माझी इच्छा होती. दत्त देवस्थानचा हॉल भोजनासाठी ठरवण्यात आला.

याच वेळी प. पू. सद्‌गुरु बाळूमामा यांच्या ग्रंथाचे काम कोल्हापूर येथे सुरू होते.* लग्नपत्रिकेवर अग्रभागी प. पू. सद्‌गुरु बाळूमामा यांचा फोटो भक्तिभावाने छापला आणि मनोमन प्रार्थना केली, ''मामा, तुम्हीच हे लग्न उत्तम रीतीने पार पाडावे'' आणि अर्थातच न कळत मी लग्नाबाबत निश्चिंत झालो. (विशेषत: येणाऱ्या पाहुण्यांची भोजनाची व्यवस्था उत्तम रीतीने होईल की नाही याची मला चिंता होती.)

लग्न २७ मे १९९६ ला होते. एक आठवडा आधी नृसिंहवाडी - कुरुंदवाड येथे जाऊन आचारी ठरवला. अकिवाटचे श्री. दादासाहेब कल्लाण्णावर यांनी किती पाहुणे येतील असा प्रश्न केला. सुमारे दीड-दोन हजार माणसे येतील, त्यादृष्टीने तयारी असावी असे मी म्हणालो, श्री. कल्लाण्णावर गुरुजींनी हिशेब मांडला. बोरगाव-शिरदवाडहून दोन ट्रक येणार, म्हणजे प्रत्येकी १०० ते १५० प्रमाणे ३०० माणसे. पाहुण्यांच्या (वधूकडच्या) दोन एस्ट्या, म्हणजे १०० माणसे, आणखी १००-२०० माणसे जादा धरून पाच ते सहाशे माणसासाठी भोजनाची तयारी करावी असे त्यांनी ठरविले. २७ मे रोजी सगळीकडे लग्नसमारंभ होते. शिवाय आमच्याच गावच्या श्री. प्रभाकर पोतदार यांच्या चिरंजीवाचे लग्न वाडीतच प. पू. धुळगावकर पाटील महाराज यांच्या मठाशेजारीच देवस्थानाच्या (शासकीय) हॉलमध्ये होते. त्यांच्या अक्षता साडेदहाच्या सुमारास व आमच्या चिरंजीवाच्या अक्षता साडेबाराच्या सुमारास होत्या. त्यामुळे बरीच मंडळी (आमच्या गावची) पोतदारांच्या लग्नात भोजन करून येणार असा हिशेबही करण्यात आला. शेवटी पाच ते सहाशे मंडळीसाठी भोजन व्यवस्था करणेचे ठरले.

आचारी यांच्या सल्ल्याने श्री. कल्लाण्णावर गुरुजींनी ३० किलो मैदा, १ क्विंटल तांदूळ आणि यासाठी पूरक इतर साहित्य खरेदी करावे असे ठरवले. कमी-जास्त असू दे म्हणून आणखी ५ किलो मैदा म्हणजे ३५ किलो घेणेचेठरले.

माझा भाचा श्री. महादेव बागलकोटे याच्यावर खरेदी सोपवली. साडेचार ते

---

* प. पू. सद्‌गुरु बाळूमामा यांनी १९६६ साली आदमापूर, (ता. कागल, जि. कोल्हापूर) येथे महासमाधी घेतली. त्यांनी आपल्या भक्तांना अनेक चमत्कार करून दाखवले - किंवा त्यांच्या भक्तांना ते आपोआप अनुभवास आले असे म्हणणे योग्य होईल. (आजही ते त्यांना अनुभवास येत असतात.) त्यांच्या भक्तामध्ये यमकनमर्डीचे हरीकाका व कोल्हापूरचे नूतनगंधर्व श्री. आप्पासाहेब देशपांडे यांचा समावेश होतो. त्यांचे एक छोटे चरित्र 'भावभक्तीचा भंडारा' या नावाने प्रसिद्ध झाले होते. त्याचाच विस्तार त्यात अधिक घटनांची भर घालून श्री. सी. एस्. कुलकर्णी आणि श्री. बी. बी. ऐदमाळे यानी 'बाळू मामा' नावाच्या बृहद् ग्रंथात केला आहे. त्या ग्रंथाचा येथे उल्लेख आहे. - ग्रंथलेखक

पावणे-पाच हजार रुपयांचे भोजन साहित्याचे बिल झाले.

२७ मे १९९६ रोजी अक्षतारोपणाचा कार्यक्रम व्यवस्थित पार पडला. भोजनगृहाची जबाबदारी प्रा. सावगावेसरांनी स्वीकारली होती. त्यांना मदतनीस म्हणून आमच्या चिरंजीवाचे मित्र मंडळ होते. श्री कल्लाण्णावर गुरुजी, श्री. कागेमामा हे सर्व अन्नपदार्थांचा पुरवठा व्यवस्थित करण्यासाठी जातीने खपत होते.

दत्त देवस्थानच्या सदर भोजन हॉलमध्ये एका वेळी सुमारे तीनशे माणसे बसू शकत होती. एकूण सात पंगती बसल्या. ६ वी पंगत उठली, ७ वी पंगत बसणार होती. मी भोजनगृहात (हॉलमध्ये) गेलो. दारातच श्री. केरबा बैलकर (रा. मेतके) भेटले मी विचारले, "जेवण झाले का?" त्यांच्या डाव्या हातावर घोंगडे होते. उजव्या हाताने (जेवण झाल्याबद्दल) होकारदर्शक हात केला व न बोलताच त्याच हाताने माझ्या शर्टच्या खिशात आहेराचे पाकीट घातले. हे सर्व अबोलपणे - काही न बोलता झाले.

शेवटच्या पंगतीत उर्वरित पाहुणे मंडळी, वाढपी, श्री. कागे मामा, कल्लाण्णावर गुरुजी व श्री आप्पासाहेब नाईक गुरुजी, प्रा. सावगावेसर इत्यादी सर्व मंडळींचे भोजन झाले.

शेवटी शिल्लक राहिलेली जिलेबी दोन पिंपात (प्रेझेंट आलेल्या) भरून व भाताचे एक पातेले घरी पाठविले.

संध्याकाळी प्रा. सावगावेसर म्हणाले, "मी आजपर्यंत शंभर एक लग्न समारंभ पार पाडले, पण अन्नपदार्थांचा असा अक्षय-अखंड पुरवठा मला कुठेच आढळला नाही."

माझा भाचा महादेव म्हणाला, "भोजन तयार करण्याच्या खोलीत कोणताही पदार्थ आणायला गेलो असता तो तयार असलेला असायचा. त्यामुळे ताबडतोब पुरवठा करणे शक्य होत असे. जणू त्या खोलीत अन्नपूर्णाच अवतरली होती."

नृसिंहवाडीत सर्व निरवानिरव करून मी दुसरे दिवशी बोरगाववाडीस आलो. घरी आल्या आल्या समजले की पट्टणकोडोलीच्या कुंभारमामी स्वर्गवासी झाल्या. त्या २७ मे रोजी म्हणजे चिरंजीवाच्या लग्नादिवशीच सकाळी ७ वाजता स्वर्गवासी झाल्या होत्या. कुंभारमामी या प. पू. बाळूमामांच्या परमभक्त. मानलेली बहीण, मामीच्या घरी पट्टणकोडोली यात्रेच्या वेळी मामा प्रसाद करीत असत. ती प्रथा आजतागायत चालू आहे.

तिसरे दिवशी म्हणजे २९ मे १९९६ रोजी मामींच्या रक्षाविसर्जनासाठी मी पट्टणकोडोलीस गेलो. रक्षाविसर्जनानंतर चर्चा करताना समजले की, कुंभारमामींनी आमच्या चिरंजीवाच्या लग्नाला जाता यावे म्हणून केरबा बैलकर (रा. मेतके) याला मुद्दाम बोलवून घेतले होते. (श्री. बैलकर यांचेकडेच बाळूमामांच्या (मेतक्याच्या)

मंदिराची व्यवस्था - पूजाअर्चा असते.)

श्री. सतूजी रोंगेना मी म्हणालो, "श्री. केरबा बैलकर आमच्या चिरंजीवांच्या लग्नाला आले होते. माझ्या खिशात पैशाचे पाकीट घातले...."

श्री. रोंगे म्हणाले, "मामींच्या (मृतदेहाची) गावातून मिरवणूक निघाली, मिरवणुकीपुढे भजनाचा कार्यक्रम, वाजप इ. होते. दहनविधी उरकला त्यावेळी साडेबारा एक वाजला असेल. त्यानंतर केरबा मेतक्यास गेला. मग वाडीला लग्नाला कसा येणार?" नंतर रोंगेच पुन्हा म्हणाले, "काही कळत नाही बुवा. ही बाळूमामांचीच किमया असणार!"

मीही विचार करू लागलो. मलाही हे न सुटणारे कोडे होते. आमच्या चिरंजीवाच्या लग्नाचा कार्यक्रम उत्तम रीतीने पार पडला. विशेषत: भोजनाचा कार्यक्रम उत्तम झाला. शिवाय सर्व अन्नपदार्थ शिल्लकही राहिले. पाचसहाशे माणसांसाठीचा स्वयंपाक ! दीड-दोन हजार माणसं जेवतात !!

हे घडले गुरु दत्तात्रयांचा आशीर्वाद, प. पू. धुळगांवकर पाटील महाराज यांची असीम कृपा आणि प. पू. बाळूमामांची किमया यामुळे अशी माझी श्रद्धा आहे.

(सही)

बी. बी. ऐदमाळे

या घटनेची शहानिशा करण्यासाठी वरील निवेदन लिहून झाल्यानंतर श्री. केरबा बैलकरांची मेतक्याला जाऊन मुद्दाम भेट घेतली असता, २७ मे १९९६ रोजी ते श्री. बी. बी. ऐदमाळे यांच्या चिरंजीवाच्या लग्नाला आपण गेलो नव्हतो, कुंभारमामींचा अंत्यसंस्कार करून परस्पर मेतक्याला आलो, असे त्यांनी सांगितले. ते म्हणाले, "कुंभारमामींनी मला मुद्दाम पट्टणकोडोलीस ऐदमाळेसाहेबांच्या मुलाच्या लग्नाला जाण्यासाठी बोलावले होते. पण मी २६ मेला तेथे गेलो व त्यांची प्रकृती अचानक बिघडली, म्हणून त्यांनी आपल्याऐवजी आपल्या भाच्याला माझ्याबरोबर जाण्यास सांगितले. पण दुसरे दिवशी सकाळी त्यांचे एकदम प्राणोत्क्रमण झाल्यामुळे आम्हाला ऐदमाळेसाहेबांच्या मुलाच्या लग्नाला जाता आले नाही. त्या लग्नाला जाण्याऐवजी मामींच्या अंत्यविधीचा कार्यक्रम करावा लागला. तो लग्नाच्या मुहूर्ताच्या वेळीच झाला. तो उरकून मी परस्पर मेतक्यास आलो."

वरील प्रकरणात दोन 'चमत्कार' घडले आहेत. एक : पाच ते सहाशे लोकांसाठी केलेल्या जेवणात दोन हजार लोक जेवले! (श्री. ऐदमाळेनी या विषयीचा प्रत्यक्ष हिशेबच दिला आहे.) आणि श्री. केरबा बैलकर हे गृहस्थ ऐदमाळेंच्या चिरंजीवाच्या लग्नाला (पैशाचे पाकीट आहेर देण्यासाठी) उपस्थित राहिले व त्याच

वेळी कुंभारमामींच्या अंत्ययात्रेलाही हजर राहिले! या चमत्कारांची उपपत्ती श्री. ऐदमाळे यांनी 'आशीर्वाद, कृपा, किमया' अशा शब्दांनी दिली आहे. ती अर्थात साधने आहेत. त्याची शास्त्रीय उपपत्ती अर्थात 'अतींद्रिय' ही आहे. कुंभारमामींची प्रस्तुत लग्नाला केरबांना पाठवण्याची तीव्र इच्छा होती. जी त्यांच्या अपघाती मृत्यूमुळे सफल होऊ शकली नाही. पण वैश्विक मनाने त्यांची ती इच्छा अतींद्रिय केरबाला पाठवून पूर्ण केली. मामी, केरबा, ऐदमाळे हे सर्व बाळूमामांचे नि:सीम भक्त. त्यांच्यावरील त्या सर्वांच्या श्रद्धेने त्यांच्या मनांचा वैश्विक मनाशी संबंध जुळवून आणला व त्या सर्वांचा संकल्प पूर्ण केला. अन्न पदार्थांचा अखंड पुरवठाही या वैश्विक मनानेच ऐदमाळेंच्या श्रद्धेमुळे अतींद्रिय विश्वातून केला.

**घटना २ री :** मुरगूडच्या शिवाजी ज्युनिअर कॉलेजमध्ये शिक्षक असलेल्या प्रा. जयवंत गोपाळ बारड यांच्या मातोश्री सौ. जानकीबाई या बाळूमामांच्या परमभक्त आहेत. त्यांना ५ ऑगस्ट १९९८ रोजी आजारामुळे इतका अशक्तपणा आला होता की, त्यांना नीट पायावर उभेही राहता येत नव्हते. तो हिंदू पंचांगाप्रमाणे श्रावण शुद्ध द्वादशीचा दिवस होता व त्रयोदशीपासून श्रीक्षेत्र आदमापूर येथील बाळूमामांच्या समाधी मंदिरात ज्ञानेश्वरीच्या पारायणाचा सप्ताह सुरू होणार होता. जानकीबाईंना या पारायणाच्या सप्ताहात भाग घेण्याची प्रथमच तीव्र इच्छा झाली. त्या घरच्या लोकांना म्हणू लागल्या की, "मी उद्या ज्ञानेश्वरी पारायणाच्या कार्यक्रमात भाग घेणार." घरच्या मंडळींनी त्यांना वेड्यात काढले. पोटात अन्नाचा कण नाही. आजारामुळे भयंकर अशक्तपणा आलेला. स्वत:च्या पायावर उभे राहण्याची सुद्धा शक्ती नाही आणि म्हणे आदमापूरला पारायणाला जाणार ! त्यांनी त्यांचे म्हणणे थट्टेवारी नेले. पण जानकीबाईंना त्या रात्री काही केल्या चैन पडले नाही. पारायणाच्या कार्यक्रमात भाग घेण्याच्या ओढीने त्या तळमळू लागल्या. दुसरे दिवशी उजाडताच त्या अंथरुणात उठून बसल्या. त्यांना एकदम कुठून बळ आहे कुणास ठाऊक ! त्या एकदम उठून आदमापूरला जाण्याची तयारी करू लागल्या. घरातील मंडळी आश्चर्यचकित झाली. आदल्या रात्री त्या उभ्यासुद्धा राहू शकत नव्हत्या. पण आता त्या उठून साडी वगैरे कपडे पिशवीत घालून बसस्टँडकडे निघण्यास सज्ज ही झाल्या होत्या ! जणू त्या काल आजारीच नव्हत्या ! त्यांची ही तयारी पाहून त्यांच्या मुलाला त्यांना बस स्टँडवर पोहोचविण्याशिवाय गत्यंतरच उरले नाही ! आणि अशा रीतीने त्या आदमापूरला आल्या. एकट्याच !

मुरगूडहून आदमापूर पाच किलोमीटर अंतरावर आहे. त्या मंदिरात आल्या तेव्हा अजून पारायणाला सुरुवात झालेली नव्हती. मंदिरातील पारायणाचा नियम असा आहे की, प्रत्येकाने पारायण सप्ताहासाठी स्वत:ची ज्ञानेश्वरी आणायची व सप्ताहाच्या शेवटी परत न्यायची. जानकीबाईंनी ज्ञानेश्वरी आणली नव्हती. त्या

चिंतेत पडल्या. त्यावेळी मंदिरातील पटांगणाच्या पारकट्ट्यावर श्री. बी. बी. ऐदमाळे बसले होते. त्यांनी जानकीबाईंना जवळ बोलावले व म्हटले, "तुम्ही ज्ञानेश्वरीच्या पारायणाला बसणार आहात ना? ही घ्या ज्ञानेश्वरी." आणि आपल्याजवळची ज्ञानेश्वरी त्यांनी जानकीबाईंना दिली. त्यांना आनंद झाला. त्यांनी ज्ञानेश्वरी पारायणाचा सप्ताह पूर्ण केला व सप्ताहाच्या शेवटी ती ज्ञानेश्वरी मंदिराच्या व्यवस्थापकाकडे दिली. नंतर जेव्हा त्यांची ऐदमाळे यांच्याशी भेट झाली तेव्हा त्यांना त्या म्हणाल्या,

"तुम्ही दिलेली ज्ञानेश्वरी मंदिरात दिली आहे."

श्री. ऐदमाळे म्हणाले, "कुठली ज्ञानेश्वरी?"

जानकीबाई म्हणाल्या, "तुम्ही पारायणाच्या पहिल्या दिवशी सकाळी मला या येथे दिली नव्हती काय? ती !"

श्री. ऐदमाळे म्हणाले, "अहो मी केव्हा तुम्हाला ज्ञानेश्वरी दिली? दुसरे कोणी तरी दिली असेल."

त्या म्हणाल्या, "म्हणजे? तुम्ही या पारकट्ट्यावर बसला होता व मला मुद्दाम बोलवून ज्ञानेश्वरी दिलीत नाही कसे म्हणता?"

सौ. जानकीबाई व श्री. ऐदमाळे हे दोघेही बाळूमामांचे नि:सीम भक्त आहेत. ते खोटे कसे बोलतील? आणि यामध्ये खोटे बोलून त्यांना काय मिळणार होते? (सौ. जानकीबाईंनी बाळूमामांवरील श्रद्धेमुळे अशाच प्रकारे आलेल्या आपल्या इतर अनेक चमत्कारांचे अनुभवही प्रस्तुत लेखकाला त्यांनी सांगितले आहेत.)

वरील प्रकरणात जानकीबाईंच्या बाळूमामांवरील श्रद्धेमुळे त्यांच्या मनाचा वैश्विक मनाशी संबंध जुळून आला. या वैश्विक मनानेच त्यांना शक्ती दिली. श्री. ऐदमाळेंच्या रूपात भेट दिली व ज्ञानेश्वरीही दिली. (त्यांना आपल्या आयुष्यात प्रथमच ज्ञानेश्वरी पारायणात भाग घेण्याची इच्छा झाली होती ती सफल झाली.) 'सत्य संकल्पाचा दाता भगवान्' म्हणतात. येथे भगवान् म्हणजे 'विश्वात्मक देव' वा 'विश्वमन' होय. श्रद्धेची किल्ली फिरवली की त्या विश्वमनाचे दार उघडते ! संकल्प पुरा होतो ! (जानकीबाईनी परत दिलेली ज्ञानेश्वरी मंदिरात नसल्यामुळे ती जेथून आली तेथे गेली' असे त्या म्हणतात !) *

**घटना ३ री :** २१ ऑगस्ट १९९७ रोजी म्हणजे श्रावण वद्य चतुर्थीच्या

---

* विश्वमन संकट वा अडचण निवारण्यासाठी धावून येते. सौ. जानकीबाईंना ज्ञानेश्वरी हवी होती. ती अडचण त्याने निवारली. ज्ञानेश्वरीचे काम संपल्याबरोबर ती नाहीशी झाली. डॉ. निर्मळेंच्या पत्नींना दिलेल्या चुड्याची गोष्ट वेगळी आहे. चुडा त्यांच्या सौभाग्याचे चिन्ह असल्यामुळे व ते टिकवण्यासाठी विश्वमनाने तो दिलेला असल्यामुळे तो नाहीसा झाला नाही, अजूनही त्यांच्याकडे आहे.

पहाटे ५॥ वाजता श्री क्षेत्र आदमापूर येथील बाळूमामांच्या समाधीच्या पूजेचा नित्याचा कार्यक्रम आटपून प्रा. जयवंत गोपाळ बारड (वरील प्रकरणातील सौ. जानकीबाईंचे ज्येष्ठ चिरंजीव) गर्भगृहातून बाहेर आल्यानंतर एक गृहस्थ त्यांच्याजवळ आले व त्यांच्या हातात २० रुपये देऊन म्हणाले, "तुम्ही मुरगूडला जाणारच आहात तेव्हा या पैशातून कमळाचे फूल, केवड्याचे कणीस आणि फुलांचा हार येताना घेऊन या.'' प्रा. बारड यांनी त्या गृहस्थाने सांगितल्याप्रमाणे त्या वस्तू त्या दिवशी आणल्या. पण ते गृहस्थ नंतर त्यांना भेटले नाहीत. श्री. बारडना ते परिचयाचे नसल्यामुळे नंतर आपल्याला भेटून त्या वस्तू ते नेतील अशा कल्पनेने ते साहित्य मंदिराजवळच्या राहण्याच्या खोलीत त्यांनी ठेवून दिले. पण ते गृहस्थ नंतर त्या वस्तू नेण्यासाठी आलेच नाहीत. दुसरे दिवशी पहाटे ३॥ वाजता श्री. बारड मंदिरात गेले. गाभाऱ्यात प्रवेश करून त्यांनी व इतर सहकाऱ्यांनी, सप्ताह सोहळ्याचा तो शेवटचा दिवस असल्यामुळे, बाळूमामांच्या समाधीला अभिषेक घातला. अभिषेकानंतर समाधीवर हार, व फुले चढवण्यासाठी त्यांनी शोधाशोध केली, पण कुणीच त्या दिवशी फुले व हार आणले नव्हते असे आढळले आणि सर्वजण मोठ्याच अडचणीत सापडले. श्री. बारड यांना एकदम त्या गृहस्थाने मुरगूडहून आणायला सांगितलेल्या व शेजारच्या राहण्याच्या खोलीत ठेवलेल्या वस्तूंची आठवण झाली. त्यांनी ताबडतोब खोलीतील त्या वस्तू म्हणजे, कमळाचे फूल, केवड्याचे कणीस व फुलांचा हार आणवून घेतले व समाधीला वाहिले. अशा रीतीने समाधीच्या अभिषेकाचा व पूजेचा तो सोहळा यथासांग संपन्न झाला. त्या वस्तू आणायला सांगणारे, त्यासाठी २० रु. देणारे ते गृहस्थ कोण, नंतर त्या वस्तु त्यांनी का नेल्या नाहीत याचा उलगडा त्यांना आता झाला ! खुद्द बाळूमामाच पुढची अडचण ओळखून ती निवारण्यासाठी हे सोंग घेऊन आले होते. असा सर्वांनी तर्क बांधला. अर्थात, सर्वांच्या बाळूमामांवरील भक्तीमुळे, श्रद्धेमुळे सर्वांच्या (सामूहिक) मनाने त्या विश्वमनाशी संधान बांधून त्याच्याकडून या वस्तू मिळवल्या होत्या, हे या घटनेमागील अतींद्रिय सत्य होते. जाणीवयुक्त मन जेव्हा झोपी जाते (फुलाच्या हाराची व्यवस्था करण्यास विसरते) तेव्हा श्रद्धाळू (भक्त) मन जागे होते व त्या विश्व मनाशी संबंध जोडून आपले काम साधते. **'या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी'** हा अतींद्रिय नियम योग्याप्रमाणे भक्तालाही लागू होतो.

**घटना ४ थी :** प्रस्तुत लेखकाने पुण्याचे (कै.) श्री. द. (मामा) देशपांडे (गुळवणी महाराजांचे शिष्य) यांच्याबरोबर गुजरातमधील प्रसिद्ध गरुडेश्वर व नारेश्वर या दत्ताच्या तीर्थक्षेत्रांना भेटी देण्यासाठी गेले असता ऐकलेली ही गोष्ट आहे. (ही दोन्ही तीर्थक्षेत्रे नर्मदेच्या काठी आहेत.)

नारेश्वर येथे आम्ही गेलो असता तेथील व्यवस्थापकांनी आम्हाला पुढील

घटना सांगितली. मुख्य मंदिराजवळच दुसरे एक लहान मंदिर नव्याने बांधण्यात आले होते. त्यात मूर्ती बसवण्यात येणार होती. (त्या मंदिरासमोरच त्यानी ही घटना सांगितली) ती मूर्ती ट्रकमधून आल्यानंतर कशीबशी उतरविण्यात आली. पण मंदिराचे गर्भगृह उंच असल्यामुळे व त्याला बऱ्याच पायऱ्या असल्यामुळे ती मूर्ती वर चढवायची कशी हा सर्वांसमोर प्रश्न होता. कोणत्या युक्तीने ती वर न्यावी याचा सर्वजण विचार करू लागले. पण कुणाला काही उपाय सुचेना. यावेळी एक धष्टपुष्ट मनुष्य पुढे आला व म्हणाला, ''मूर्ती माझ्या पाठीवर चढवा. मी ती तुम्हाला हवी तेथे नेऊन ठेवतो.'' मग सर्वांनी मिळून ती मूर्ती त्याच्या पाठीवर प्रयत्न करून चढवली. लगेच त्याने ती अगदी लीलेने वर नेली व त्यांना हवे तेथे ठेवून दिली. मूर्ती वर आल्याच्या आनंदात त्यावेळी त्या माणसाकडे कोणाचे लक्ष गेले नाही. पण नंतर त्याची आठवण होऊन त्यांनी त्याची चौकशी केली व शोध घेतला. तेव्हा तो कुठेच दिसला नाही. तो कोण होता हे तेथे जमलेल्या लोकांपैकी कुणालाही माहीत नव्हते. तो कुठून आला व कुठे गेला याचा पत्ता लागला नाही.

पण तो कोण होता, कुठून आला व कुठे गेला, याचे उत्तर सोपे आहे. रुक्मिणीचा चुडा घेऊन डॉ. निर्मळेंच्या (त्यांच्या पत्नींना 'चुडेदान' करून) जीव वाचवण्यासाठी धावून येणारा 'कृष्णा पाटील', दामाजीवरील संकट टाळण्यासाठी पैशाची थैली घेऊन राजाकडे धावून जाणारा 'विठ्या महार', श्री. ऐदमाळे यांच्या मुलाच्या लग्नात अपेक्षेपेक्षा चारपट जास्त संख्येने आलेल्या लोकांसाठी ऐनवेळी हवे असलेले जादा अन्न, श्री. ऐदमाळे यांच्या खिशात लग्नातील आहेर म्हणून पैशाचे पाकीट घालणारा 'केरबा बैलकर', सौ. जानकीबाईंना पारायणासाठी ऐनवेळी ज्ञानेश्वरी देणारे 'ऐदमाळेसाहेब', सप्ताह समाप्तीच्या अभिषेक कार्यक्रमासाठी फुले आणायला सर्वजण विसरणार हे अगोदरच ओळखून २० रु. बारडसरांना देऊन त्याची व्यवस्था करणारा अनोळखी गृहस्थ, हे सर्व जेथून आले तेथूनच अवजड मूर्ती वर उचलून नेण्यासाठी ऐनवेळी तो 'धष्टपुष्ट मनुष्य'ही आला होता. हे उघड आहे. ही सर्व संबंधित लोकांच्या भक्तीच्या, श्रद्धेच्या सामर्थ्याची किमया आहे आणि ती किमया करण्याचे कर्तृत्व आहे 'विश्वमना'चे! त्या भक्तांच्या 'विश्वंभरा'चे! ज्ञानेश्वरांच्या 'विश्वात्मक देवा'चे!

**घटना ५ वी :** बेळगावचे (कै.) श्री. गोविंद विश्वनाथ कुलकर्णी (वकील) यांनी प्रस्तुत लेखकाला सांगितलेली ही घटना आहे. घटना १९७२ साली घडलेली आहे. त्यावेळी गोविंदरावांच्याकडे एक उत्तम प्रतीचा जपानी कंपनीचा पॉकेट ट्रान्झिस्टर होता. त्यांचे मित्र श्री. र. के. तेंडुलकर (बेळगावच्या दै. तरुण भारतचे सहसंपादक) सावंतवाडीला (ते मूळ सावंतवाडीचे) व जवळच्याच मोरगाव या आपल्या मामाच्या गावाला जाणार होते. जाताना त्यांनी गोविंदरावाकडील जपानी कंपनीचा तो पॉकेट

ट्रान्झिस्टर आपल्या प्रवासात सोबतीला म्हणून नेला. प्रवास करून परत आल्यानंतर त्यांनी तो व्यवस्थित स्वरूपात परत आणून दिला. या सर्व स्वाभाविक घटना होत्या. पुढे सहा दिवसांनी तेंडुलकर गोविंदरावांकडे पुन्हा आले व म्हणाले, "गोविंदराव, तुमचा ट्रान्झिस्टर मोरगावला जाताना सावंतवाडी बांदा या प्रवासात कुठेतरी हरवला." गोविंदरावांना त्यांचे हे बोलणे ऐकून आश्चर्य वाटले. तेंडुलकरना अम्नेशियाचा (विसरभोळेपणाचा) झटका आला आहे की काय असा संशय आला. ते म्हणाले,

"तुम्ही प्रवासानंतर ट्रान्झिस्टर व्यवस्थितपणे परत आणून दिला आहे, आणि आता तो हरवला म्हणून सांगता, हा काय प्रकार आहे ?"

तेंडुलकर म्हणाले, "मी आजच प्रवासाहून परत आलो आणि आताच तुमच्याकडे प्रथम आलो आहे; ट्रान्झिस्टर हरवला ही वस्तुस्थिती असून ते सांगण्यासाठीच मी आलो आहे."

"काय सांगता? आजच प्रवासाहून आला?" गोविंदरावांनी विचारलं.

"होय, मी आजच आलो." तेंडुलकर म्हणाले.

"मग सहा दिवसापूर्वी ट्रान्झिस्टर कुणी आणून दिला? खोटे वाटत असेल तर तो तुम्हाला दाखवतो."

असे म्हणून गोविंदरावांनी आतल्या खोलीतून जपानी कंपनीचा तो ट्रान्झिस्टर आणून त्यांच्यासमोर ठेवला! तो पाहून तेंडुलकर अवाक झाले. त्यांनी गोविंदरावांना तो निश्चित कोणत्या दिवशी मिळाला हे विचारले. त्यांनी "बरोबर सहा दिवसापूर्वी" असे सांगितले आणि तेंडुलकरांनी बरोबर सहा दिवसापूर्वीच तो हरवला होता! म्हणजे तो हरवल्याबरोबर 'अतींद्रिय' जगातील 'र. के.'नी तो गोविंदरावांना लगेच आणून दिला होता! हे अर्थात, भौतिक जगातील र. के. ना माहीत नव्हते. माहीत असणे - माहीत होणे - शक्य नव्हते.

येथे वाचकांना या प्रकरणात श्रद्धेचा, भक्तीचा कुठे संबंध येतो, हा प्रश्न पडेल. म्हणून र. के. तेंडुलकरांचा थोडा इतिहास सांगितला पाहिजे.

र. के. तेंडुलकर हे व्यावहारिकदृष्ट्या बेळगावातील 'दै. तरुण भारत'सारख्या एका वृत्तपत्राच्या संपादकीय विभागात सहसंपादक म्हणून सामान्य माणसाप्रमाणे नोकरी करीत असले तरी ते एक असामान्य सिद्ध पुरुष होते. त्यांना अतींद्रिय जगातून कोणतीही वस्तू काढून देण्याची सिद्धी प्राप्त झाली होती. बेळगावात कोवाडकर यांच्या घरी ते बैठका घेत असत. या बैठकांना बेळगावचे बरेच प्रतिष्ठित लोक उपस्थित राहात. यापैकी प्रमुख व्यक्ती म्हणजे, डी. जी. देशपांडे, गंगाधर शानभाग, केशवराव दड्डीकर, चंदा पै हे होत. हल्ली 'दै. तरुण भारत'च्या वृत्तविभागाचे संपादक म्हणून काम करीत असलेले ग. गो. राजाध्यक्ष यांनाही त्यांच्या सिद्धीचा अनुभव आहे. खुद्द गोविंदराव कुलकर्णींना त्यांनी दत्ताच्या लहान पादुका हवेतून

काढून दिल्या व त्या त्यांच्या पूजेत अजूनही आहेत. मात्र र. के. नी आपल्या सिद्धीचा कधी गाजावाजा केला नाही. इतरांनाही तो करू दिला नाही. त्याचा बाजारही कधी मांडला नाही. (सामान्य माणसेही सिद्ध पुरुष असतात. ते आपल्या सिद्धीचा कधी गाजावाजा करीत नाहीत, आणि ही गोष्ट केवळ भारतातच घडू शकते! व्यवहारात अगदी सामान्य माणूस म्हणून जगणाऱ्या दोन सिद्ध पुरुषांची उदाहरणे ११ व्या प्रकरणात दिली आहेत, ती पाहा.)

अशा रीतीने अतींद्रिय जगाशी - विश्वमनाशी - केव्हाही संबंध जुळवू शकणाऱ्या र. के. तेंडुलकरांसारख्या सिद्ध पुरुषाला त्या विश्वमनाने त्यांच्या संकटाच्या वेळी मदतीला धावून यावे व त्यांना त्यातून निभावून न्यावे यात काहीच आश्चर्य नाही. येथे दुसरा एक प्रश्न वाचकांच्या मनात निर्माण होणे शक्य आहे. तो म्हणजे, हवेतून कोणतीही वस्तू काढू शकणारे र. के. ट्रान्झिस्टर हरवल्यानंतर तसलाच ट्रान्झिस्टर हवेतून काढून गोविंदरावांना तो देऊ शकले नसते काय? हा प्रश्न अतींद्रिय विश्वाचा नियम माहीत नसल्याचे द्योतक आहे. अतींद्रिय विश्व नैतिक नियमांनी बांधले गेले आहे. त्यात 'परमेश्वर'ही हस्तक्षेप करू शकत नाही. नैतिकतेच्या या नियमानुसार ट्रान्झिस्टर ही उपभोग्य वस्तू असल्याने ती माणसाचे नैतिक वा आध्यात्मिकदृष्ट्या कसलेही भले वा कल्याण करीत नाही. ती वस्तू सिद्ध पुरुषाला हवेतून निर्माणही करता येईल. पण तो सिद्धीचा नैतिक वा आध्यात्मिक दुरुपयोग होईल आणि त्याची त्याला किंमत द्यावी लागेल. दुसरे असे की, एखादी वस्तू हरवणे हा गाफीलपणा वा निष्काळजीपणा आहे आणि त्याची किंमत अधिक काळजीने वा दक्षतेनेच द्यावी लागते, सिद्धीने नाही; आणि र. के. नी आपल्या सिद्धीचा कधी दुरुपयोग केला नाही. त्यामुळे विश्वमनाला त्यांचे हे ऋण ट्रान्झिस्टर परत करून फेडावे लागले ! विश्वाचा हा नियमच आहे की, तुम्ही त्यांच्याशी जसे वागाल तसे ते तुमच्याशी वागते. **ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।** (गीता ४.११) या नियमाचा प्रत्यय खुद्द र. के. तेंडुलकरनाच पुन्हा एकदा आला. ती घटना येथे सांगणे आवश्यक आहे.

**घटना ६ वी :** र. के. तेंडुलकरांच्या पत्नींना एकदा मानसिक आजार आला होता. र. के. नी त्यांना मिरजेच्या मिशन हॉस्पिटलमध्ये उपचारासाठी दाखल केले होते. बऱ्याच दिवसांच्या उपचारानंतर डिसचार्ज घेण्यापूर्वी ते बिल देण्यास ऑफिसमध्ये गेले, तेव्हा तेथील माणसाने सांगितले की, "तुमचे बिल तुमचे मित्र जी. व्ही. कुलकर्णी (वकील) यांनी चुकते केले आहे. तुम्ही जाण्यास हरकत नाही." र. के. आपल्या पत्नीला घेऊन बेळगांवला आले व जी. व्ही. कुलकर्णींना गाठून विचारले की, "तुम्ही मिरजेला येऊन आम्हाला न कळवता आमचे हॉस्पिटलचे बिल देऊन आम्हावर एवढे उपकार केले, ते कशासाठी?" जी. व्ही. कुलकर्णी आश्चर्यचकित

होऊन म्हणाले, "तुम्ही काय म्हणता हे मला कळत नाही. मी मिरजेला कधी गेलो नाही व तुमचे हॉस्पिटलचे बिलही दिलेले नाही."

वरील घटना प्रस्तुत लेखकाला गोविंदराव कुलकर्णींनी सांगितली आहे आणि ती खोटी मानण्याचे कारण नाही. र. के. हवेतून कोणतीही वस्तू काढीत हे वर सांगितलेच आहे. ते हवेतून कधी कधी पैसेही काढीत. पण नंतर ते लगेच फेकून देत व ते पैसे अदृश्य होत असत. त्यांनी आपली सिद्धी प्रपंचासाठी कणभरही कधी वापरली नाही. इतरासाठीच आणि तीही इतरांची श्रद्धा व भक्ती दृढ करण्यासाठी, वाढविण्यासाठीच ते ती नेहमी वापरत असत. (बहुतेक वेळा ते देवतांच्या मूर्ती वा पादुका अशा वस्तूच हवेतून काढीत असत.) त्यांच्या या निष्काम भावनेने केलेल्या लोकसेवेचे - आध्यात्मिक सेवेचे - ऋण त्या विश्वमनाने त्यांचे हॉस्पिटलचे बिल देऊन चुकते केले, असे म्हणावे लागते.

अशाच प्रकारच्या - प्रपंचाची, पैशाची वा नोकरीची चिंता न करता केलेल्या - भक्तीची परतफेड त्या विश्वमनाने ऐनवेळी मदत करून केल्याची आणखी एक घटना येथे सांगणे उचित होईल.

**घटना ७ वी :** १८५६ सालची ही घटना असून ती गोपाळबुवा केळकर लिखित अक्कलकोटच्या स्वामी समर्थांच्या जीवनावरील बखरीत नोंदलेली आहे. सोलापूरला चिंतोपंत टोळ यांच्या घरी एकदा स्वामी समर्थ भोजनास आले होते. पण भोजनाचे पात्र वाढूनही स्वामी जेवीनात. दहा वाजून गेले. चिंतोपंतांचा मुलगा विष्णुपंत हा त्यावेळी कलेक्टर कचेरीत कारकून होता. गोल्डपीट हे कलेक्टर आणि दप्तरदार हणमंतराव पीतांबर हे दोघेही फार कडक होते. दहा वाजता सर्वांनी कचेरीत हजर राहण्यासंबंधीचा त्यांचा करडा नियम होता. चिंतोपंताना हे माहीत होते म्हणून ते चिरंजीवास म्हणाले, "तुला कचेरीला जायचे आहे. तू जेवून घे व जा." पण विष्णुपंत हे भक्तिमान होते. त्यांनी निश्चय केला की, महाराजांनी जेवण केल्याशिवाय अन्न घ्यायचे नाही. मग काय व्हायचे ते होईल. अकरा वाजण्याच्या सुमारास महाराज भोजन करू लागले. मग विष्णुपंतही भोजन आटोपून लगबगीने ऑफिसात गेले. बाळकृष्णराव देवराव कलेक्टरचे हेडक्लार्क असून त्यांच्याकडे हजेरी भरण्याचे काम होते. विष्णुपंतांनी अंगावरील वस्त्र गादीवर ठेवले व आपणास जरा उशीर झाला याबद्दल रदबदली करण्यास ते हेडक्लार्ककडे गेले. विष्णुपंतांची विनंती ऐकून देवरावांस आश्चर्य वाटले व ते म्हणाले, "तुम्ही आज माझे अगोदर कचेरीत आला असून तुमची हजेरी पूर्वीच भरली आहे." हजेरी बुक उघडून त्यात हजर मांडले असल्याचे विष्णुपंतांस दाखवले. विष्णुपंतांस मोठे आश्चर्य वाटले. (**गोपाळबुवा केळकर लिखित बखर :** संपादक - रा. चिं. ढेरे. पृ. २७-२८)

विष्णुपंतांची श्रद्धा व भक्ती स्वामींवर होती. त्यांनाच त्यांनी आपला खरा आधार मानले. नोकरीला आधार मानले नाही आणि त्यांना त्यांच्या श्रद्धेने-भक्तीने आधार दिला. विश्वमन त्यांच्या मदतीला धावून आले.

### भक्ती व श्रद्धेखेरीज तरणोपाय नाही

गीतेच्या ७ व्या अध्यायात पुढील एक श्लोक आहे -

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।। ७.१४**

याचा अर्थ असा : **हे** दृश्य जग त्रिगुणात्मक असून ते असत्य (माया) आहे. पण तेच माणसाला - डोळ्यांना प्रत्यक्ष दिसत असल्यामुळे - खरे वाटते. ते खोटे मानणे त्याला फार जड जाते (दुरत्यया), पण ते खरे मानल्याचा परिणाम असा होतो की, त्यात तो पूर्ण गुरफटून जातो. इतकेच नव्हे तर आपल्या या गुरफटून जाण्याचे तो बुद्धीने समर्थनही करतो. या गुरफटून जाण्याला भौतिकवाद, बुद्धिप्रामाण्यवाद, वास्तववाद अशी गोंडस नावेही तो देतो. या वादानुसार 'मी' म्हणजे भौतिक देह असून - आणि तो खरा असून - त्याचे हित साधणे हाच खरा धर्म आहे. (याला तो 'सुखवाद' म्हणतो) त्या हिताला - सुखाला - तुच्छ लेखणे हा अडाणीपणा आहे असे तो मानतो. याच्या उलट श्रद्धावाद डोळ्यांना दिसणारे खरे नसून, डोळ्यांना न दिसणारे (अतींद्रिय) हेच खरे आहे, किंबहुना तेच एकमेव व परमसत्य आहे असे मानतो. या वादानुसार देह खरा नसून देहात वास करणारा आत्मा खरा आहे. या आत्म्याचा विश्वात्म्याशी माता व तिच्या उदरातील गर्भ यासारखा संबंध आहे असे तो मानतो. त्यामुळे आईचे सुखदु:ख हे तिच्या उदरातील गर्भाचे जसे सुखदु:ख असते, तसे विश्वाचे - सर्व लोकांचे - सुखदु:ख हे आपलेच सुखदु:ख आहे असे तो (श्रद्धावादी) मानतो. त्याला विश्वाहून - विश्वात्म्याहून स्वत:चे असे वेगळे अस्तित्व वा व्यक्तित्व नसते, त्यामुळे तो त्या विश्वाच्या सुखासाठीच केवळ जगतो, धडपडतो. परिणामी विश्वही त्याच्या इच्छा पूर्ण करते. मातेला आपल्या गर्भाचे जसे डोहाळे लागतात, (**गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथीचा जिव्हाळा तेथे बिंबे** ।। - तुकाराम) तसे विश्वालाही अशा व्यक्तीच्या इच्छेचे डोहाळे लागतात; व माता जसे त्या गर्भाच्या इच्छा (डोहाळे) पुरवते तसे विश्वही अशा व्यक्तीच्या इच्छा पुरवते, पूर्ण करते. डॉ. निर्मळेपासून तो विष्णुपंतांपर्यंतच्या सर्व लोकांनी स्वत:ऐवजी इतरांची (विश्वाची) चिंता वाहिली. त्यांची निरीच्छपणे, श्रद्धेने, भक्तीने सेवा केली. म्हणून त्यांचीही इच्छा विश्वाने पूर्ण केली, अडचणी दूर केल्या. दृश्य जग (वा प्रपंच) व स्वत:चा देह हेच खरे मानून त्यासाठीच जगणाऱ्यांना (बुद्धिवादी, भौतिकवादी, वास्तववादी, सुखवादी या अतींद्रिय जगावर श्रद्धा नसणाऱ्यांना)

अशा प्रकारचे (श्रद्धावाद्यांना येणारे) तथाकथित 'चमत्कारा'चे अनुभव येत नाहीत, याचे कारण विश्वाचा हा नियमच आहे की, तुम्ही विश्वाकडे जसे पाहाल तसे तुम्हाला ते फळ देते. विश्वाकडे तुम्ही बुद्धिवादातून पाहाल तर ते तुम्हाला बुद्धिवादाचे फळ देईल; तसेच विश्व अनुभवास येईल. श्रद्धावादातून पाहाल तर ते तुम्हाला श्रद्धावादीच दिसेल; म्हणजे श्रद्धेचे 'चमत्कार' अनुभवास येतील. (**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**) हाच विश्वाचा नियम गीतेने थोड्या विस्ताराने व निराळ्या शब्दात तिसऱ्या अध्यायातील पुढील श्लोकात सांगितला आहे :

**देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ।।** (३.११)

यावर ज्ञानेश्वर माऊलीने पुढीलप्रमाणे भाष्य केले आहे :

तुम्ही देवताते भजाल । देव तुम्हा तुष्टतील । ऐसी परस्परे घडेल । प्रीति जेथ ।। तेथ तुम्ही जे करू म्हणाल । ते आपैसे सिद्धी जाईल । वांछित ही पुरेल मानसीचे । वाचासिद्धी पावाल । आज्ञापक होआल । म्हणिये तुमचे मागतील । महाऋद्धी ।। (अर्थ : - तुम्ही देवांचे आराधन कराल आणि देव तुमच्यावर प्रसन्न होतील. याप्रमाणे तुमचे एकमेकावर जेव्हा प्रेम जडेल तेव्हा तुम्ही जे करू म्हणाल, ते सहजच सिद्धीस जाईल, आणि मनातील इच्छित गोष्टीही पूर्ण होतील. तुम्ही बोलाल ते खरे होईल. (उदा. 'विठ्ठलच माझेकडे येऊ दे की' - डॉ. निर्मळे) (अशी योग्यता तुमच्या अंगी येईल) आणि तुम्ही आज्ञा करणारे व्हाल. तुम्हाला 'आपली काय आज्ञा आहे?' म्हणून महाऋद्धी (विश्वमन) विचारील. (येथे 'देव' विश्वमनाला - विश्वात्मक देवाला - म्हटले आहे, हे वाचकांना वेगळे सांगायला नको.)

प्रेम (भक्ती) हेच विश्वाचे अधिष्ठान आहे, बुद्धी नाही हे यावरून लक्षात येईल. म्हणजेच जगत् (विश्व) आई (अंबा) आहे. आणि ही आई जगदंबा प्रेमानेच (भक्तीनेच) वश होते, बुद्धीने नाही; आणि प्रेम (भक्ती) श्रद्धेतूनच निर्माण होते, बुद्धीतून नाही. म्हणून म्हणावे लागते की, श्रद्धेवाचून तरणोपाय नाही.

■■

## प्रकरण चौदावे

# पैसे देणारी भानामती

*म्हणऊनि नाही आणि असे । हे कल्पनेचेनि सौरसे ।*
*जे कल्पना लोपे भ्रंशे । आणि कल्पनेसवे होय ।।*

*- ज्ञानेश्वर*

---

**को**ल्हापूर जिल्ह्यातील हातकणंगले तालुक्याच्या दक्षिण टोकाला रेंदाळ नावाचे गाव आहे. चांदीच्या दागिन्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या हुपरी या गावापासून आग्नेय दिशेला ३ कि. मी. अंतरावर हे गाव असून कोल्हापूर-कुरुंदवाड हा रस्ता या गावावरून जातो. या गावातील श्री. रामकृष्ण गोविंद माळवदे (वय ८०) यांच्या घरी २० ऑक्टोबर १९९८ रोजी अचानक भानामतीच्या प्रकारांना सुरुवात झाली. तो दिवस अमावस्येचा होता. या गोष्टीचा सौ. बनूताई रामकृष्ण माळवदे (वय ७०) या आवर्जून उल्लेख करतात. किरकोळ गोष्टींनी या प्रकरणाची सुरुवात झाल्यामुळे हे प्रकरण भानामतीचे आहे हे प्रथम माळवदे कुटुंबियांच्या लक्षात आले नाही. तथापि, पहिल्या घटनेपासूनच या भानामतीने आपले वस्तू व पैसे देण्याचे एक आगळे-वेगळे वैशिष्ट्य दाखवले व ते शेवटपर्यंत कायम ठेवले. या भानामतीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे श्री. रामकृष्ण माळवदे यांच्या पंढरपूरला दिलेल्या मुलीचा मुलगा कु. पवन केकडे (वय १३) याच्या भोवती ती नेहमी घडत असल्याचे आढळून आले आहे. (याला काही अपवादात्मक घटना आहेत.) पवन याला माळवदे कुटुंबियांनी आपल्याकडे शिक्षणासाठी मुद्दाम पंढरपूरहून आणून ठेवले असून तो हल्ली सातवीत शिकतो.

आता बुद्धिवादी वा 'अंनिस'वाले म्हणतील की तोच हे प्रकार मुद्दाम घडवून आणत असावा. पण माळवदे कुटुंब हे इतके अडाणी नाही की त्यांना हा लहान मुलगा फसवून असे प्रकार करू शकेल. घरची सर्व मंडळी सुशिक्षित आहेत. रामकृष्ण माळवदे यांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री अरविंद माळवदे (वय ४६) यांचे शिक्षण एम्. ए. (भाग १) पर्यंत झालेले असून हल्ली ते जवळच्या प्रसिद्ध यळगूड दूध डेअरीमध्ये नोकरी करतात. दुसरे चिरंजीव गजानन (वय २५) यांचे शिक्षण १२ वी पर्यंत झाले असून ते चांदीचे दागिने तयार करण्याचे काम घरीच करतात. अरविंद यांनी आपला भानामतीवर विश्वास नसल्याचे - म्हणजे आपला दृष्टिकोण बुद्धिवादी असल्याचे - प्रस्तुत लेखकाला सांगितले. पण घरी घडणारे प्रकार प्रत्यक्ष पाहून आपणाला आता भानामतीवर विश्वास ठेवणे भाग पडले आहे असेही ते (मी विचारल्यानंतर) म्हणाले. घरची मंडळी शिकलेली आहेत, त्यांचा भानामतीवर विश्वास नाही, म्हणून लहान मुलगा त्यांना फसवणे शक्य नाही असे अर्थातच म्हणता येत नाही. प्रत्यक्ष घडलेल्या घटनांवरून व त्यांची तपासणी करूनच हे ठरवावे लागेल. म्हणून त्या घटनांकडेच आता वळू.

## प्रत्यक्ष घडलेल्या घटना

२० ऑक्टोबर १९९८ रोजी सकाळी पडवीतील खाटेवर एक साखरेची पुडी ठेवलेली सौ. बनूताईंना आढळली. नंतर त्याच खाटेवर एक बेसनाची पुडीही आढळली. या पुड्या येथे कोणी ठेवल्या याची बनूताईंनी चौकशी केली. पण घरच्या कोणाही व्यक्तीने त्या ठेवल्या नसल्याचे त्यांना आढळून आले. भानामतीचा संशय नसल्यामुळे त्या वस्तू घरीच वापरल्याचे त्यांनी सांगितले. पण नंतर हळूहळू बिस्किट पुडे, लेमन गोळ्या, पॉपिन्स, फरसाणाचे पुडे अशा वस्तू वरचेवर घरी येऊन पडू लागल्यामुळे हा प्रकार काही वेगळाच असल्याचे घरच्या लोकांच्या लक्षात आले. खाण्याच्या वस्तूंबरोबर पेन्सिलीचे पुडे, काड्याच्या पेट्यांचे बंडल यांसारख्या वस्तूही येऊन पडत असत. या वस्तू येऊन पडत असताना पवन हा मुलगा घरीच असायचा. आश्चर्याची गोष्ट म्हणजे पडणाऱ्या वस्तूंचे तो भाकीत करीत असे. म्हणजे कोणत्या वस्तू येऊन पडणार आहेत हे तो अगोदर सांगत असे आणि थोड्याच वेळात नेमक्या त्या वस्तू येऊन पडत. मात्र स्वत: तो या प्रकारांनी फार घाबरून गेला होता. इतका की कधीकधी त्याला घाबरून तापही यायचा.

एखादा 'अंनिस'वाला म्हणेल की या वस्तू तो मुलगाच आणून टाकत असावा. पण जेथे अगोदर त्या वस्तू नव्हत्या तेथे व तेही त्या मुलाने सांगितल्यानंतर पडलेल्या आढळून येत असल्यामुळे व या अवधीत तो मुलगा घरीच असल्यामुळे तो त्या वस्तू आणून टाकत असावा हे म्हणणे टिकू शकत नाही. शिवाय वर

सांगितलेल्या वस्तूखेरीज पैसेही वरचेवर येऊन पडत असत. हे पैसे नेहमी नोटाच असत. या नोटा दहा, पन्नास व शंभर रुपयांच्या असत. त्या इतक्या वेळा येऊन पडल्या आहेत, की श्री. अरविंद माळवदे यांनी सांगितले की अशा रीतीने एकूण १६०० रुपये जमा झाले आहेत. इतके पैसे तो मुलगा कुठून आणणे शक्य आहे? या नोटा कधी कधी त्या मुलाच्या खिशातही येऊन पडत व तो ते घरच्या लोकांना दाखवत असे व देत असे. बरे, तो घरी नसतानाही काही प्रकार घडले आहेत, त्याची उपपत्ती कशी देणार? काही गोष्टी तो करणेच शक्य नाही अशाही आहेत.

उदाहरणार्थ, विष्ठा व लघवी पडण्याचे प्रकारही होत असत. आणि हे प्रकार तुरळक नव्हते, तर सतत सहा महिने घडत होते. प्रथम माडीवर विष्ठा पडल्याचे आढळून आले. विशेष म्हणजे माडीवर बाहेरून जाणे शक्य नसताना व माडीचे सर्व दरवाजे बंद केलेले असताना ही विष्ठा पडलेली आढळून येत असे. नंतर खाली तळमजल्यावर-जमिनीवरही विष्ठा पडण्यास सुरुवात झाली. ही विष्ठा कुठेही पडलेली आढळत असे. एकदा खाटेच्या खालीही विष्ठा पडलेली आढळून आली. विष्ठेबरोबर लघवी पडण्याचे प्रकारही घडत होते. माळवदे यांचेकडे शिवाजी पवार (वय ३५) हा चांदीचे काम करण्यासाठी एक कामगार आहे. तो हे काम करीत असताना त्याच्या अंगावरच एकदा वरून लघवी गळू लागली ! लगेच माडीवर जाऊन पाहिले. पण वर कोणीच नव्हते. माडीचे दरवाजेही बाहेरून बंद होते. यावेळी पवन हा शाळेत जाण्याची तयारी करीत होता. आणखी एकदा प्लॅस्टिकच्या खुर्चीवर - त्याच्या खोलगट भागावर - लघवी साचलेली आढळली. अशा रीतीने लघवी पडण्याचे प्रकार सतत तीन महिने चालू होते. (विष्ठा व लघवीला भयंकर दुर्गंधी येत असे, असे सांगण्यात आले आहे.)

चांदीचे दागिने तड्यात जोडण्याचे काम कामगार करीत असतात. हे जोडकाम सुद्धा अनेकदा विस्कटले जायचे. (पवनचे परीक्षेचे पेपर - उत्तरपत्रिकाही - शाळेत फाडले जायचे असेही सांगण्यात आले आहे.) एकदा शिवाजी पवार हा कामगार तड्यात दागिन्याचे काम करीत असताना वरून नेमका तड्यात एक दगड पडला. हा दगड पडण्याचा प्रकार मोठाच चमत्कार ठरतो. कारण वरून दगड पडण्यापूर्वी तो एकतर छतात कुठेतरी अडकलेला असला पाहिजे. त्यामुळे तो निसटून पडला असे म्हणता येईल; किंवा वरच्या छताला पूर्वीच पडलेले एखादे भगदाड तरी असले पाहिजे की ज्यातून तो वरून पडला असे म्हणता येईल. पण या दोन्ही गोष्टी त्या छताला लागू होत नाहीत. त्यामुळे तो छतातून कसा पडला हे एक मोठे गूढ आहे. यावेळी पवन हा मुलगा शाळेला गेला होता. तात्पर्य, त्या मुलाच्या अनुपस्थितीतही भानामतीचे प्रकार घडत होते.

## विनोदी भानामती

ही भानामती कधीकधी विनोद वा पोरखेळही करीत असे. ते प्रकारही सांगितले पाहिजेत. स्वत: पवन हा मुलगा या विचित्र प्रकारांनी घाबरून गेल्याचे मागे सांगितलेच आहे. त्यामुळे त्याला त्याचे आजी व आजोबा (सौ. बनूताई व रामकृष्ण माळवदे) नेहमी आपल्या दोघांच्यामध्ये घेऊन रात्री झोपत असत. एकदा रात्री लाईट गेल्यामुळे लँपवजा (लहान) कंदील लावून तो भिंतीवरील खुंटीला लटकवून ठेवला होता. सकाळी उठून पाहतात तो त्या कंदिलाचा ग्लास गायब झाल्याचा आढळून आले. नंतर तो ग्लास झोपलेल्या पवनच्या काखेत आढळला ! त्या तापलेल्या ग्लासने त्याला भाजले कसे नाही याचे सर्वांनाच आश्चर्य वाटले.

आणखी एकदा दिवसाच्या वेळी रामकृष्ण माळवदे आपल्या चार वर्षाच्या अमित या नातवाला (मुलाच्या मुलाला) जवळ घेऊन झोपले होते. त्यावेळी पवन आतल्या खोलीत होता. थोड्या वेळाने ते उठून पाहतात तो देवळीत ठेवलेला त्यांचा काळा चष्मा झोपलेल्या अमितच्या डोळ्यावर घातलेला आढळला. मुलगा उताणा झोपलेला असल्यामुळे पाहणाऱ्याला वाटावे की ते मूल आपल्या आजोबाचा काळा चष्मा घालूनच झोपले आहे ! झोपेत जणू स्वप्न पाहण्यासाठी ! अशा गमतीही या भानामतीने केल्या आहेत.

एकदा पवनने देव्हाऱ्यावर ठेवलेला नैवेद्य विस्कटेल असे सांगितले आणि थोड्याच वेळात तो विस्कटलेला आढळला ! देव्हाऱ्यातील देवही एकदा फेकून देण्यात आले. एकदा चांदीच्या दागिन्यांचे वजन करण्याच्या तराजूच्या पारड्यांचा आवाज झाला, म्हणून घरच्या लोकांचे तिकडे लक्ष गेले. त्या ठिकाणी जाऊन पाहतात तो तेथे तराजूचे एकच पारडे होते. दुसरे पारडे गायब झाले होते. यावेळी पवन घराबाहेर होता. तराजूशिवाय चांदीकामाचा व्यवसायच शक्य नसल्यामुळे माळवदे कुटुंबाची मोठीच अडचण झाली. घरात सगळीकडे शोधूनही ते कुठेच सापडले नसल्यामुळे ते घराबाहेर गेले असल्याची त्यांची खात्री झाली होती. म्हणून त्यांनी गावातीलच एका ज्योतिष्याला त्याविषयी विचारले. त्याने सांगितले की एका मुलाने ते नेले असून दुसरे दिवशी घरात आणून टाकील आणि दुसरे दिवशी चांदीच्या कामासंबंधीची एक वस्तू शोधत असताना कपाटाच्या खाली ते सहजच सापडले. पूर्वी शोधले तेव्हा ते तेथे नव्हते. पवनने या तराजूच्या अदृश्य होण्याचेही भाकीत केले होते. किंबहुना विष्ठा पडण्याच्या प्रकाराखेरीज सर्व घटनाप्रकारांचे तो अचूकपणे भाकीत करीत असे. या त्याच्या सामर्थ्यावरून असे वाटते की ती भानामती त्याला या गोष्टी अगोदरच सांगत असावी. (क्वचित दिसतही असावी असाही संशय येतो.) कारण तो म्हणजे असे की " 'ते' (म्हणजे पिशाच किंवा भानामती) मी तुमचे अमूक नुकसान करीन, तमुक नुकसान करीन, घर जाळीन असे

मला म्हणते.'' असे असले तरी त्याचे त्याने कधी काही नुकसान केले नाही. उलट त्यांच्या वस्तू व पैसे देऊन फायदाच केला आहे असे म्हणता येईल. मात्र त्याने दिलेल्या वस्तू व पैसे माळवदे कुटुंबाने स्वत:साठी कधी वापरल्या नाहीत. दुसऱ्यांना दिल्या. एका ज्योतिष्याने पैसे घेऊ नका असे सांगितल्यावरून सर्व पैसे नरसोबाच्या वाडीला दान केले असे त्यांनी सांगितले. मात्र 'घर जाळीन' ही त्याची पोकळ धमकी नसावी असे वाटते, कारण एकदा बास्केटमध्ये अचानक जाळ झाल्याचे त्यांनी पाहिले.

## 'अंनिस' भानामतीचा खोटेपणा उघड करण्यासाठी का आली नाही?

या भानामतीवर गुरुचरित्राची पारायणे यासारखे दैवी उपाय माळवदे कुटुंबाने केले असले तरी ती हळूहळू कमी होत गणेशचतुर्थीला, म्हणजे १९९९ सालच्या सप्टेंबर महिन्यात आपोआप पूर्ण बंद झाली. अशा रीतीने या भानामतीची पीडा या कुटुंबाला सुमारे एक वर्षभर होत होती. ही भानामती सुरू असताना इचलकरंजीच्या अंधश्रद्धा निर्मूलनवाल्यांना हा प्रकार कळवायला दै. सकाळचे वार्ताहर तानाजी घोरपडे यांना माळवदे कुटुंबियांनी सांगितले होते, पण 'हे प्रकार दररोजच घडतात, कोण पाहणार?' असे त्यांनी उडवाउडवीचे उत्तर दिल्याचे घोरपडे यांनी सांगितले. मात्र हेच इचलकरंजीचे 'अंनिस'वाले न बोलावताच चंदूर या गावी अनुराधा देशमुख यांच्या धार्मिक (सोमनाथपूजा) कार्यक्रमाच्यावेळी त्यांना विरोध करायला गेले होते! हेरवाडच्या भानामतीची तपासणी करण्यासाठीसुद्धा संबंधित कुटुंबप्रमुखाने त्यांना लेखी विनंती करूनही ते तेथेही गेले नव्हते, त्यांनी उडवाउडवीचे उत्तर दिले होते, याचीही येथे आठवण करून दिली पाहिजे. (या दोन्ही प्रकरणांची माहिती **विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन** या ग्रंथात दिली आहे.) भानामतीच्या प्रकरणात फसवणूक (उघड करता येत) नसल्यामुळे (म्हणजे अशा प्रकारात बुवाबाजी नसल्यामुळे) या लोकांना भानामती खरी असल्याचे मान्य करावे लागते. पण ते त्यांना मान्य करायचे नसल्यामुळे - मग चमत्कार खोटे हा त्यांचा सिद्धांत खोटा ठरतो व 'अंनिस'च्या तात्त्विक भूमिकेला व महाराष्ट्रातील तिच्या अस्तित्वालाच सुरुंग लागतो! - ते अशा प्रकारांची तपासणी नेहमीच टाळतात, (व नाइलाजाने करावी लागलीच तर स्वत:च बुवाबाजी करतात !) हे माझे म्हणणे अशा रीतीने पुन्हा या प्रकरणाने सिद्ध झाले ! (त्यांच्या बुवाबाजीची प्रकरणे उपर्युक्त ग्रंथात सविस्तर वर्णन केली आहेत, ती जिज्ञासूंनी पाहावीत.)

**टीप :** प्रस्तुत भानामतीचे वैज्ञानिक विश्लेषण (या ग्रंथातील इतर भानामती प्रकरणांबरोबरच) शेवटच्या 'विज्ञान व चमत्कार' या प्रकरणात केले आहे.

■■

## प्रकरण पंधरावे

# एका गावातील तीन चमत्कारयुक्त अनुभव

*त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।*
*सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥*

*- भगवद्गीता*

---

### १. जीव वाचवणारे पिशाच

बेळगाव जिल्ह्याच्या हुक्केरी तालुक्यात कणगला नावाचे एक गाव असून ते संकेश्वरच्या उत्तरेस पुणे-बंगलोर महामार्गावर आहे. या गावात श्री. वसंत चव्हाण नावाच्या सैन्यातून निवृत्त झालेल्या गृहस्थांनी दैवी उपासनेची आवड असलेल्या सौ. लताबाई चव्हाण या आपल्या पत्नीच्या सहाय्याने अध्यात्म विषयाची आवड असणाऱ्या लोकांसाठी 'चैतन्य साधकाश्रम' नावाचा एक आश्रम स्थापून तो चालवला आहे. हा आश्रम म्हणजे त्यांचे घरच असून तेथे दैवी उपासना, ध्यानधारणा, कुंडलिनी जागृती, योग यासारख्या विषयावर इच्छुक लोकांना मार्गदर्शन करण्यात येते.

त्याच गावात राहणारी सौ. महादेवी सदाशिव रेंगटे (वय २८) ही अशिक्षित बाई भक्ती व उपासना याची आवड असल्यामुळे त्या आश्रमात मार्गदर्शनासाठी नेहमी जात असे. तिचा नवरा श्री. सदाशिव रेंगटे हा मात्र काही कारणामुळे संकेश्वर येथील एका देवर्षीकडे जात असे. अशा रीतीने पतीपत्नींचे दैवी उपासनेचे मार्ग भिन्न होते. एके दिवशी (ही १९९९ सालच्या ऑगस्ट महिन्यातील घटना आहे.) सदाशिव याने आपल्या पत्नीला त्या देवर्षीसाठी चांगले पक्वान्न तयार करण्यास सांगितले. देवर्षीपेक्षा अध्यात्माकडे तिचा ओढा जास्त असल्यामुळे तिने त्या गोष्टीला

स्पष्ट नकार दिला. त्यामुळे चिडून त्याने तिला ताबडतोब घराबाहेर जाण्यास व पुन्हा तोंड न दाखवण्यास फर्मावले. ती करारी स्वभावाची बाई तात्काळ त्या गोष्टीला तयार झाली व नेसत्या वस्त्रानिशी लगेच बाहेरही पडली. हे कुटुंब कणगला गावापासून बरेच दूर असलेल्या मळ्यात राहते. ती बाई आपल्या मळ्यातून उत्तर दिशेला आडवाटेला लागली व रानात झाडाला गळफास लावून आत्महत्या करण्याचे तिने ठरविले. बरेच लांब चालून गेल्यावर एका डोंगराळ भागात ती पोहोचली. तेथे पोहोचण्यापूर्वी रस्त्यात एक मोठे काळे मांजर तिच्या आडवे गेले. ते पाहून तिला आश्चर्य वाटले. पुढे चालून गेल्यावर त्या डोंगराळ भागात परत तेच काळे मांजर आडवे आले. हे मांजर कुठून आपल्याला सारखे आडवे येते याचे तिला आश्चर्य वाटू लागले. पण त्याकडे दुर्लक्ष करून ती आपला गळफास लावून घेण्याचा निर्णय अंमलात आणण्यासाठी योग्य जागा पाहू लागली. इतक्यात 'बाई, आत्महत्या करू नका' असे शब्द तिच्या कानावर पडले. तिने आश्चर्याने पाहिले. एक हेल्मेट घातलेला व कंबर मोडल्यामुळे उभा राहू न शकणारा माणूस तिला हात जोडून विनंती करीत होता. तो पुन्हा म्हणाला, 'बाई, घरी परत जा. आत्महत्या करू नका.'' तिने आश्चर्याने 'तू कोण? इथे कसा?' असे त्याला विचारले, तेव्हा तो म्हणाला, 'माझे नाव जानू कुंभार. मी टोकेगावचा. मला येथे मारून टाकण्यात आले. पण माझा लगेच जीव गेला नाही. आठ दिवसांनी गेला. बाई, तुम्ही जीव देऊ नका. घरी जा.'

त्या जानू कुंभाराच्या पिशाचाने आपल्याला वरचेवर अशी विनंती करावी याचे तिला कौतुक वाटून तिने त्याची विनंती मान्य करण्याचे ठरवले व ती तेथून परत निघाली. पण नवऱ्याने घरी परत तोंड न दाखवण्यास सांगितले असल्यामुळे आपल्याच गावच्या एका ओळखीच्या माणसाच्या मळ्यातील घराकडे तिने जाण्याचे ठरविले व ती त्या दिशेने निघाली. त्या मळ्यात येताच तेथील विहीर पाहून तिचे मन पुन्हा बदलले व त्या विहिरीत उडी मारून जीव देण्याचे तिने ठरविले व ती विहिरीकडेला आली. इतक्यात ते पिशाच पुन्हा तिला समोर दिसले व म्हणाले, 'बाई, जीव देऊ नका. घरी परत जा. तुम्हाला माझी हात जोडून विनंती आहे.'

ते पिशाच आपल्या भल्यासाठीच असे वरचेवर विनंती करीत असावे असे वाटून तिने शेवटी आत्महत्येचा विचार मनातून पूर्ण काढून टाकला व त्या ओळखीच्या माणसाच्या मळ्यातील घरात आली. व आपली घडलेली हकीकत तिने तेथील लोकांना सांगितली. त्यांनी तिला आपल्याकडे राहण्यास सांगितले. ती रात्र तिने तेथे काढली. पण दुसरे दिवशीही तिला आपल्या घरी परतावे असे वाटेना. दुसरे दिवशीही ती त्यांच्याकडेच राहिली. पण असे लोकांच्या घरी किती दिवस राहणार? शेवटी तिसरे दिवशी ती मोठ्या नाखुषीने आपल्या घरी परत आली.

घरी परत आल्यानंतर एके दिवशी देवघरात ती पूजा व नित्याची उपासना करीत असताना तिला ते पिशाच पुन्हा तेथे दिसू लागले व 'मला ही जागा व तुमची उपासना फार आवडते. मी येथेच राहतो.' असे ते पिशाच - म्हणजे तो मरून पिशाच झालेला जानू कुंभार - तिला म्हणू लागला. तेव्हा ती त्याला म्हणाली, 'बाबा रे, तू माझ्या पाठीमागून इथे पुन्हा आलास का? मी तुला कसलीही मदत करू शकत नाही. इथे राहून काही उपयोग नाही. माझ्या मार्गदर्शक गुरूकडे जा.'' त्याने तिला मार्गदर्शक गुरू कोण, कुठे आहे असे विचारले. तिने मग कणगला येथील साधकाश्रमाची त्याला माहिती दिली. त्यानंतर ते पिशाच अदृश्य झाले व नंतर पुन्हा आपल्याला ते कधी दिसले नाही असे ती बाई म्हणते.

मग ते कुठे गेले? साधकाश्रमात आले काय? श्री. वसंत चव्हाण म्हणतात, 'होय, ते आपल्या आश्रमात एक लहान मुलात प्रवेश करून एके दिवशी आले. माझ्या पत्नीने त्याच्या हातावर साखर ठेवली आणि ते निघून गेले. त्याला मुक्ती मिळाली.' आपल्या आश्रमाकडे जेव्हा अशी लहान मुले दाराशी येऊन थांबतात, तेव्हा त्यांच्यातून एखादे पिशाच आल्याचे आपण ओळखतो, असे त्यांनी प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. महादेवी रेंगटे या बाईच्या त्या दिवशीच्या अनुभवानंतर एक लहान मुलगा वर सांगितल्याप्रमाणे येऊन दाराशी थांबला. तो जानू कुंभारच होता व त्याला आपण प्रसाद म्हणून साखर दिल्याने त्याची पिशाच योनीतून सुटका झाली असे श्री. चव्हाण यांचे म्हणणे आहे. ते कितपत खरे म्हणून स्वीकारायचे हे ठरविण्यास वाचक स्वतंत्र आहेत. पण त्या बाईचा तो पिशाच्याचा अनुभव खोटा आहे असे मात्र कोणाला म्हणता येणार नाही.

येथे एक शंका उपस्थित होते. त्या बाईने घरी परतण्यासाठी आपल्याला काहीतरी निमित्त मिळावे म्हणून ही पिशाचाची कथा बनवून सांगितलेली नसेल कशावरून? स्वत: लेखकाला असा संशय आल्यामुळे त्याचे निराकरण करण्याचे त्याने लगेच ठरविले. त्या बाईने त्या पिशाचाने आपल्याला आपले नाव जानू कुंभार असल्याचे व आपण टोकेगावचा असल्याचे सांगितल्याचे प्रस्तुत लेखकाला म्हटले होते. ही कथा काल्पनिक नसेल तर जानू कुंभार व टोकेगाव यांचे प्रत्यक्ष अस्तित्व सिद्ध झाले पाहिजे. म्हणून प्रस्तुत लेखकाने महाराष्ट्रातील प्रमुख वृत्तपत्रांतून 'टोकेगाव नावाचे गाव आहे काय, असेल तर ते कोठे आहे हे वाचकांनी कृपया कळवावे' अशी जाहीररीत्या वृत्तपत्राच्या वाचकांना विनंती केली. आणि खरोखर अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे तालुक्यातील प्रवरा नदीच्या काठी टोकेगाव नावाचे गाव असल्याचे अनेक वाचकांनी कळवले. विशेष म्हणजे या गावाची माहिती देणाऱ्या वाचकांची (एक मिरज वगळता) सर्व पत्रे उत्तर महाराष्ट्रातून आली आहेत. याचा अर्थ दक्षिण महाराष्ट्रात हे गाव कोणाला माहीत नाही असा होतो. अशा परिस्थितीत कर्नाटकातील

एका खेड्यात (मळ्यात) राहणाऱ्या अशिक्षित बाईला त्या गावचे नाव माहीत व्हावे हे आश्चर्य नव्हे काय? त्या पिशाचाने तिला ते सांगितल्यामुळेच ते तिला माहीत झाले असे म्हणूनच म्हणावे लागते.*

टोकेगावची माहिती देणाऱ्या तीन पत्रांपैकी दोन पत्रे टोकेगावात पूर्वी रहिवास केलेल्या व हल्ली अहमदनगरमध्ये रहिवास करणाऱ्या वाचकांची होती. एक पत्र हल्ली टोकेगावात राहणाऱ्या लकारे नावाच्या वाचकाचे होते. या तिघांनाही मी 'जानू कुंभार नावाची व्यक्ती टोकेगावात राहत होती काय' याविषयीची माहिती मिळवून मला कळविण्यासंबंधी त्यांनी दिलेल्या पत्त्यावर पुन्हा पत्रे लिहिली. टोकेगाव सोडलेल्या दोघा वाचकांनी माहिती मिळत नसल्याची पत्रे लिहिली. (टोकेगाव हे उजनी धरणात १९५७ साली बुडाल्यामुळे त्याचे पुनर्वसन झाले आहे. त्यावेळी काही लोकांनी गाव सोडले. त्यापैकी जानू कुंभार हा असण्याची शक्यता आहे. म्हणून त्याची माहिती सर्वांनाच नसणे शक्य आहे.) मात्र हल्ली टोकेगावात राहत असलेल्या श्री. भाऊलाल लकारे यांना जानू कुंभार टोके गावचा रहिवासी असल्याची निश्चित माहिती मिळाली. त्यांनी १४-२-२००० रोजी लेखकाला लिहिलेल्या पत्रात दिलेली माहिती अशी : जानू कुंभार टोकेगावात राहत होता. त्याचे पूर्ण नाव जानू गोपाळा कुंभार. दरोडे असेही त्याचे आडनाव होते. त्याचे कोणी संबंधी हल्ली आहेत काय, याविषयीची मात्र माहिती त्याने दिलेली नाही. (अधिक माहिती मिळवून पाठविण्याचे त्यांनी आपल्या पत्रात आश्वासन दिले आहे.) तथापि, जानू कुंभार नावाची व्यक्ती टोकेगावाची रहिवासी होती, ही माहिती मिळाल्यामुळे त्या बाईला त्याच्या पिशाचानेच ती माहिती दिल्यामुळे कळली एवढे निश्चित सिद्ध होते. म्हणजे पर्यायाने त्याचेच ते पिशाच (मृतात्मा) असल्याचेही सिद्ध होते.

जानू कुंभार नावाच्या व्यक्तीचा खून झाला ही गोष्ट खरी असल्याचे, त्याची केस हाताळणारे श्री. मुधोळकर या जज्जनीच आपल्याला सांगितल्याचे श्री. चव्हाणांनी प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. (हे मुधोळकर जज्ज अध्यात्मविषयाकडे

---

* टोकेगावाची माहिती देणारी पुढील वाचकांची पत्रे आली आहेत.

सर्वश्री एच्. बी. साळुंके (अहमदनगर), ए. बी. शिंदे (अहमदनगर). आण्णा रावळ (सासवड), चिं. वि. बोकील (पुणे), अनिल मो. कुलकर्णी (शेवगाव), प्रभाकर गुरुजी (अहमदनगर), एस्. जे. भुसारी (राहुरी), गिताराम ना. बरबडे (कुलाणा, जि. अहमदनगर), श्रीनिवास बंग (पुणे), बी. आर. शेरकर (अहमदनगर), क. ना. अवचट (पुणे), के. बी. कुलकर्णी (मिरज), एम्. व्ही. जठार (श्रीरामपूर), म. ज. विसाळ (अकोला), भाऊलाल लकारे (टोका, जि. अहमदनगर), दीपक मोरे (दहीगाव, जि. अहमदनगर), धोंडीराम डोखे (पुणतांबा, जि. अहमदनगर).

ओढा असल्यामुळे आपल्या आश्रमात आले होते; तेथे त्यांची अर्धा तास समाधीही लागली होती, इ. माहितीही चव्हाणांनी दिली आहे. हल्ली ते जज्ज मालवणला असतात असे कळते.) आपल्यापुढे मुख्य प्रश्न आहे तो, पिशाच कोणाचे आहे हा नसून, त्या बाईचा तो पिशाचाचा अनुभव खरा की खोटा हा आहे. म्हणजे त्या बाईने घरी परतण्यासाठी शोधून काढलेले ते खोटे निमित्त आहे की काल्पनिक कथा आहे हा प्रश्न आहे. आणि समजा ती कथा घरी परतण्यासाठी तिने कल्पनेने रचलेली आहे असे असेल तर घरी परतल्यानंतर कित्येक दिवसांनी देवघरात आपल्याला ते पिशाच पुन्हा भेटल्याची गोष्ट तिने का सांगावी हा प्रश्न निर्माण होतो. हा देवघरातील अनुभव तिने बनवून सांगण्याचे काही कारण दिसत नाही. आणि त्या अनुभवाशी जुळणारी एक घटना घडल्याचे स्वत: त्या गावातील साधकाश्रमाचे वसंत चव्हाणही सांगतात. (ती घटना वर सांगितलेलीच आहे.) हे सर्व लोक भक्तिमार्गी असून ते सर्व खोटे बोलत आहेत असे कसे म्हणावे? आणि असे म्हणायचेच असेल तर त्याच गावात घडलेली पुढील एक घटना त्याला आणखी एक आव्हान ठरते.

## २. जीव घेणारे पिशाच

श्री. रामकृष्ण ज्योतीबा गजबरे (वय ३३) हा कणगला येथील अध्यात्म विषयाची आवड असणारा साधक असून तो वर उल्लेख केलेल्या चैतन्य साधकाश्रमात मार्गदर्शनासाठी नेहमी जात असतो. त्याच्याशी त्याच गावच्या एका व्यक्तीचे खासगी कारणामुळे वैमनस्य व शत्रुत्व होते. त्याचा तो शत्रू उपर्युक्त सौ. महादेवी रेंगटे या बाईच्या नवऱ्याप्रमाणेच संकेश्वर येथील 'त्या' देवर्षीकडे नेहमी जात असे. तो तेथे कशासाठी जातो हे आपल्याला माहीत आहे असे गजबरे म्हणतो. पण त्याचा इतका भयानक परिणाम आपल्यावर होईल याची त्याने कल्पना केली नव्हती.

१९९९ सालच्या सप्टेंबर महिन्यातील ही घटना आहे. एके दिवशी गजबरे हा दक्षिणेकडून महामार्गाने आपल्या गावी सायकलवरून येत होता. कणगला गावाजवळ येताच एक मोटरसायकल पाठीमागून येत असलेली त्याला दिसली. ती आपल्याच दिशेने येत आहे असे दिसताच तो उजवीकडे वळला. त्याबरोबर ती मोटरसायकलही परत उजवीकडे वळली. आश्चर्य वाटून तो परत डावीकडे वळला. त्याबरोबर ती पुन्हा डावीकडे वळली. पण त्याला ती चुकवणे अशक्य होऊन शेवटी ती त्याच्या सायकलीवर इतक्या जोराने येऊन आदळली की तो सायकलीवरून दूर फेकला गेला व त्याची सायकल मोटरसायकलीखाली सापडून तिचा चुराडा झाला. पुढचे त्याला काही आठवत नाही.

याचवेळी त्या रस्त्याने कणगला गावचे तिघेजण एकाच सायकलीवर बसून समोरून येत होते. त्यांनी एका सायकलीचा चुराडा झालेला व एक माणूस शेजारीच पडलेला पाहिला. त्याला पाहताच तो आपल्याच गावचा गजबरे आहे हे त्यांनी ओळखले. व तो बेशुद्ध झालेला असल्याने त्याला आपल्या सायकलीवरून गावात आणण्याचे ठरविले. त्या तिघांनी त्याला उचलून आपल्या सायकलीच्या मधल्या नळीवर बसवले आणि काय आश्चर्य! ती सायकलची नळी लगेच मोडून पडली व सायकलही मोडली. ज्या सायकलवरून नुकतेच ते तिघेजण बसून आले होते, ती सायकल व तिची नळी केवळ एकट्या गजबरेच्या वजनाने मोडावी हे पाहून ते आश्चर्याने थक्क झाले. या प्रकारावर त्यांचा स्वत:चा विश्वासच बसेना!

या अपघाताचे स्वरूप व त्यात सापडलेल्या सायकलीची अवस्था पाहिली तर कोणीही त्या अपघातात सापडलेली व्यक्ती वाचली असेल असे म्हणू शकणार नाही, इतका तो मोठा अपघात होता. गजबरे याने प्रस्तुत लेखकाला सांगितले की, "संकेश्वरच्या देवर्षीच्या अंगात पिशाचाचा संचार होत असून ते पिशाच माझ्यावर माझ्या शत्रूच्या सांगण्यावरून मला जिवे मारण्यासाठी त्या देवर्षीने मुद्दाम सोडले होते. मी केवळ साधकाश्रमाच्या व माझ्या साधनेच्या बळावर वाचलो. दुसरा कोणीही या अपघातातून वाचणे शक्य नव्हते. माझ्या जिवावर बेतलेले संकट अशा रीतीने केवळ किरकोळ जखमांवर निभावले."

गजबरेच्या म्हणण्याचा खरेखोटेपणा तपासणे शक्य नाही. तथापि, त्याचा पाठलाग करून त्याच्यावर मोटरसायकल मुद्दाम कोणी घातलेली नसेल आणि अशी मोटरसायकल घालून स्वत:वर संकट ओढवून घेईल हे कळणे कठीण आहे, तर त्या व्यक्तीचे तसे वागणे हे एक मोठेच गूढ आहे असे म्हणावे लागते. बरे, हा मोटरसायकलीचा हल्ला करून त्याला ठार मारण्याचा शत्रूने कट केला म्हणावे तर त्याला जिवे मारण्याचा यापेक्षा खात्रीचा उपाय उपलब्ध असताना असला दोन व्यक्तींचा जीव धोक्यात घालण्याचा अपघाताचा हा जगावेगळा मार्ग का निवडावा हे कळत नाही.* बरे, त्याला नैसर्गिकरित्या अपघातात मरण आल्याचे भासविण्यासाठी हा त्यांचा डाव होता असे म्हणावे, तर नंतर घडलेली सायकल मोडण्याची अविश्वसनीय घटना कशी घडली?

त्या घटनेची नैसर्गिक उपपत्ती देणेच शक्य नाही. ही (एका माणसाच्या वजनाने नळी मोडण्याची) एकच घटना या अपघाताच्या बाकीच्या (म्हणजे मोटरसायकल अंगावर घालण्याच्या) घटनेच्या नैसर्गिकपणाबाबतही संशय निर्माण करते. या

---

* हा मोटरसायकलवाला एक सामान्य वाटसरू होता असे म्हणण्यास जागा आहे. कारण गाव जवळ असताना असा अपघात करून ठार मारणे व निसटणे शक्य नाही.

एकाच घटनेमुळे हे सर्वच प्रकरण पिशाच-कल्पनेचा पाठपुरावा करणारे ठरते. गजबरेला याविषयी खोदून विचारले असता आपल्या शत्रूने त्या देतर्षीकडे आपल्याविरुद्ध आपल्याला मारण्यासाठी अघोरी उपाय केला असल्याचा आपल्याजवळ पुरावा असल्याचे प्रस्तुत लेखकाला सांगितले आहे. तो पुरावा त्याने उघड केला नसला तरी याबाबतीत अविश्वास व्यक्त करणाऱ्यांवर नुकतेच ज्या सायकलीवर तिघेजण बसून आले त्या सायकलीची नळी एकटा गजबरे बसताच क्षणात कशी मोडली याची नैसर्गिक उपपत्ती देण्याची जबाबदारी येऊन पडते. ती देता येत नसल्यामुळे एखादा 'अंनिस'वाला हे सर्वच प्रकरण काल्पनिक आहे असे म्हणून हातच झटकून टाकण्याचा संभव आहे ! पण पुढील एक प्रकरण असे आहे की नेहमीच्या त्यांच्या पळवाटा ते पूर्ण बंद करते. त्यामुळे एकतर पिशाचाचे अस्तित्व त्यांना मान्य करावे लागेल, अथवा आपण भोंदुगिरी करतो हा आरोप तरी स्वीकारावा लागेल !

## ३. 'अंनिस'च्या कार्यकर्त्यालाच धरणारे पिशाच

कणगला येथील श्री. वसंत रा. चव्हाण यांच्या साधकाश्रमाची माहिती वरील दोन प्रकरणात आलीच आहे. एकदा श्री. चव्हाण यांचेकडे सुमारे ३० वर्षं वयाची एक व्यक्ती आली. ती व्यक्ती कणगल्यात वास्तव्य करीत असली तरी तिची चव्हाणांना यापूर्वी कसलीच माहिती नव्हती. तिने आपला परिचय करून दिला तो असा : नाव - सतीश गावडू पाटील, (हे त्या व्यक्तीने चव्हाणांना दिलेल्या व स्वत: संपादित केलेल्या 'सत्यदीप' नावाच्या १९९९ सालच्या दिवाळी अंकावरून कळले.) जन्मगाव बेळगाव. पण कणगला येथे प्राथमिक शाळेत शिक्षकाची नोकरी. अविवाहित असून अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे कार्यकर्ते. दाभोळकरांचे परमभक्त. चमत्कार घडत नाहीत, ते सर्व थोतांड आहे याची शंभर टक्के खात्री. आपणही असले चमत्कार (हातचलाखीने) करून दाखवतो, हिप्नॉटिझमचे प्रयोगही करतो. इ. इ.

आता चव्हाणांच्याकडे येण्याचे कारण : काही दिवसापासून पुढीलप्रमाणे त्रास होत आहे. रात्री माडीवरील खोलीत झोपलेलो असताना एक मुलगी दरवाजा ठोठावते. दरवाजा उघडायला सांगते, उघड नाहीतर वरून (छतातून) येईन म्हणते. तिने जिन्याचे पार्टिशनही मोडून ढकलून दिले. आपल्या खोलीच्या दरवाजापर्यंत कोणालाही अगोदरचे दोन बंद दरवाजे ओलांडून येता येणार नाही. दोन्ही दरवाजे आतून बंद केलेले असल्यामुळे ती मुलगी आपल्या खोलीपर्यंत कशी आली समजत नाही. दरवाजा उघडून पाहिले तर कोणीच आढळत नाही. या प्रकाराने आपण हादरून गेलो आहोत. झोप लागत नाही. अंगातील रक्त व शक्ती नाहीशी झाली आहे. टाचणीने बोटांना टोचले तर अजिबात रक्त येत नाही. अतिशय अशक्तपणा जाणवतो.

श्री. पाटील यांनी चव्हाणांना प्रत्यक्ष आपल्या खोलीवर नेऊन आपली राहण्याची व झोपण्याची जागा दाखवली. जिन्याचे पार्टिशन मोडलेले दाखवले. ते सांगत असलेले प्रकार खरे असल्याची चव्हाणांची खात्री पटली. त्यांनी पिशाचबाधा दूर करण्यासाठी त्यांना काही उपाय सांगितले. त्यामुळे त्या दिवशी रात्री त्यांना चांगली झोप लागली. काही त्रास झाला नाही. पण नंतर पुन्हा त्रास होऊ लागला. शेवटी चव्हाणांनी त्यांना ती खोली सोडण्याचा सल्ला दिला. तो त्यांनी मानला व दुसऱ्या घरात हल्ली ते राहायला गेले आहेत. तेथे त्रास होत नसला तरी अशक्तपणाची तक्रार चालूच आहे.

प्रस्तुत लेखकाला वरील हकीगत कळताच 'अंनिस'चे श्री. पाटील यांची भेट घेण्यासाठी तो कणगला गावी ३१ जानेवारी २००० रोजी गेला. पण त्या दिवशी ते रजेवर गेले असल्याचे कळले. म्हणून त्याच शाळेत शिक्षक असलेले व त्यांच्याच (बेळगाव) गावचे त्यांचे मित्र श्री. सुभाष यल्लाप्पा पाटील यांची शाळेतच भेट घेतली. त्यांनी आपल्या समव्यावसायिकाची माहिती दिली. ती चव्हाणांनी दिलेल्या माहितीशी जुळली. शिवाय त्यांनी जास्तीची माहिती दिली ती अशी -

प्रथम गावाबाहेर असलेल्या एका विहिरीकडे शौचाला गेले असता त्यांना भीती वाटली. तेथे पिशाच असल्याबद्दल लोकांत वदंता आहे. म्हणजे त्यांच्या अनुभवाला येणारे पिशाच त्या घरातील नव्हे. कारण त्या घरातील तळमजल्यावर राहणाऱ्या एका म्हातारीला त्याचे अस्तित्व कधीच जाणवलेले नाही. शिवाय हा प्रकार घडल्यानंतर सोबतीला मुलांना घेऊन झोपले असता त्या मुलांना त्या पिशाचाचे अस्तित्व जाणवत नाही. पाटलांना मात्र जाणवते. याचा स्पष्ट अर्थ असा होता, की त्या पिशाचाने 'अंनिस'च्या पाटलांनाच आपले खास 'लक्ष्य' बनवले आहे ! आणि तेही नववर्षाच्या - नव्हे नवसहस्रकाच्या पहिल्याच (जाने.) महिन्यात! जणू काही त्याला सांगायचे आहे - हे सहस्रक 'अंनिस'वाल्यांचे नाही ! तुम्ही तुमचा गाशा गुंडाळा!

श्री. सुभाष पाटील यांनी प्रस्तुत लेखकाला अशीही माहिती दिली की ते आज रजा काढून गेले आहेत ते दुसऱ्या एका देवर्षीकडे उपचार करून घेण्यासाठी. अर्थात आपल्या वडिलांच्या सांगण्यावरून. तात्पर्य, देवदेवर्षी खोटे आहेत, ते बुवाबाजी करतात असे म्हणणारे 'अंनिस'वाले खासगीत - गुप्तपणे - त्यांचा सल्ला घेत असतात! (हे या प्रकरणाने सिद्ध होते.) जसे सांगलीच्या गिरीश शहा या ज्योतिष्याला वरून पाच लाखाचे आव्हान देणारे सांगलीचे 'अंनिस'वाले आतून त्यांना आपल्या कुंडल्या दाखवायला (भविष्य विचारायला) जातात! (हेही त्या प्रकरणात शहांनी उघड केले होते. पाहा : **विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन** या ग्रंथातील ३ रे प्रकरण.)

येथे कोणी अशी शंका काढील की हे पिशाचाचे प्रकरण नसून मनोव्याधीचे प्रकरण आहे. पाटलांच्या मनातील काल्पनिक भीतीमुळे त्यांना शारीरिक त्रास होत आहे. त्याच घरातील म्हातारीला किंवा त्यांच्या सोबतीला झोपणाऱ्या मुलांना त्या पिशाच्याचे अस्तित्व जाणवत नाही यावरून हा केवळ पाटलांच्या मनाचा खेळ आहे हे सिद्ध होते. पण हा तर्क चुकीचा आहे. पाटील गावाबाहेर विहिरीकडे शौचाला गेले असताना प्रथम त्यांना भीती वाटली. त्याच ठिकाणी त्यांना भीतीने घेरण्याचे कारण काय? कारण ते ठिकाण पिशाचाचे होते- तशी लोकांत वदंता होती. (आणि ती प्रत्यक्ष तशा अनुभवाशिवाय असणार नाही.) म्हणजे ती जागाच पाटलांच्या अनुभवाला कारण आहे, त्यांचे मन नव्हे. बरे, एखाद्या भाबड्या-म्हणजे पिशाचावर विश्वास ठेवणाऱ्या-माणसाला तशी भीती वाटली तर ते समजू शकते. पण ज्या माणसाचा पिशाचावर विश्वास नाही, किंबहुना जो माणूस हे सर्व थोतांड आहे असे लोकांना शिकवण्यासाठी खास कार्यक्रम करीत फिरत असतो, त्याला (त्याच्या लेखी अस्तित्वात नसलेल्या) पिशाचाची भीती वाटेलच कशी? आणि ती वाटली असे मानायचेच झाले तर त्याचा पिशाचावर विश्वास नाही हे खरे नाही, ते केवळ एक नाटक आहे, त्याचा आतून त्यावर विश्वास आहे असे मग म्हणावे लागेल ! म्हणजे त्याचे 'अंनिस'चे कार्य ही एक भोंदूगिरी ठरते ! पाटलांचा हा एक मनाचा खेळ आहे असे म्हणणाऱ्यांना हे मान्य आहे काय? हे त्यांना अर्थातच मान्य होणार नाही.

पण 'अंनिस'वाल्यांपुढे अशी आपत्ती निर्माण होते म्हणून त्यांनी पिशाचाचे अस्तित्व खरे मानावे अशातला हा मामला नाही. पिशाचाच्या (व मृतात्म्याच्या) अस्तित्वाचे असंख्य वस्तुनिष्ठ व वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध झालेले पुरावे असून 'अंनिस'वाले आपले खोटे (बुद्धिवादी) तत्त्वज्ञान अर्धशिक्षित लोकांत दामटण्यासाठी मतलबीपणाने त्या पुराव्याकडे मुद्दाम दुर्लक्ष करीत असतात, ही वस्तुस्थिती आहे. (असे पुरावे **विज्ञान आणि बुद्धिवाद** या ग्रंथातील 'मरणोत्तर अस्तित्व' या ४थ्या प्रकरणात दिले आहेत, ते पाहावे.) ते पुरावे हे लोक भलेही ठोकरून लावोत, पण म्हणून ते नाहीसे होत नाहीत. प्रस्तुत प्रकरणात हा पाटलांच्या मनाचा खेळ आहे असे म्हणणारे पाटलांच्या खोलीच्या जिन्याचे पार्टिशन कसे मोडले हे सांगतील काय? पाटील राहत असलेल्या घराचे दोन बंद दरवाजे ओलांडून आत आल्याशिवाय हे पार्टिशन कोणालाही मोडता येणार नाही. आणि ते दरवाजे बंदच होते असे पाटील स्वत:च सांगतात. या वस्तुस्थितीवरून बाहेरून कोणतीही व्यक्ती आत आली नव्हती हे सिद्ध होते. मग पार्टिशन कसे वा कोणी मोडले? स्वत: पाटलांनीच ते मोडून पिशाचाची हूल उठवली काय? तसे म्हणावे तर 'अंनिस'चे ते कार्यकर्ते असल्यामुळे ते असे कसे करतील? यांनी असे काही केलेले नाही याचा सज्जड पुरावा म्हणजे त्यांच्या स्वत:च्याच शरीरावर झालेला विपरित परिणाम ! तो परिणाम

आणि जिन्याच्या पार्टिशनची मोडतोड या दोन गोष्टी म्हणजे त्या पिशाचाच्या अस्तित्वाचा -त्याच्या खरेपणाचा -जाहीर पुरावाच आहे ! या दोन गोष्टींची उपपत्ती नैसर्गिक मार्गांनी कोणालाही देणे शक्य नाही. भानामतीमध्ये असले प्रकार नेहमीच घडत असतात. ही गोष्ट प्रस्तुत ग्रंथातील इतर प्रकरणे वाचलेल्या वाचकांना मुद्दाम सांगण्याची जरुरी नाही. (विशेषत: प्रकरणे २, ३, ४, ६ पाहा. पाटलांप्रमाणे शक्ती क्षीण करणारी प्रकरणेही प्रस्तुत लेखकाला माहीत आहेत. पण ती 'स्टोरी' (सविस्तर कथा) बनवण्याइतकी मोठी नसल्यामुळे त्यांचा प्रस्तुत ग्रंथात समावेश केलेला नाही.) मग पाटलांना जाणवणारा (ऐकायला येणारा) पिशाचाचा आवाज त्यांच्या जवळच्या लोकांना कसा जाणवला (ऐकायला आला) नाही? जे पिशाच बंद दरवाजे न उघडता पार करू शकते, ते पिशाच असले प्रकार करू शकते ! असले प्रकार त्यांच्या हातचा मळ आहे ! रेंदाळच्या प्रकरणातील (प्रकरण १४ पाहा.) पवन या मुलाला ते पिशाच दिसत होते, ते त्याला 'अमुक करीन, तमुक करीन' असे सांगत असे (असे तो म्हणत असे) आणि तसे ते करून दाखवतही असे. म्हणजे त्याचे म्हणणे खोटे नव्हते, हे नंतर घडणाऱ्या घटनाच प्रत्यक्ष सिद्ध करीत होत्या. पण घरातील इतर लोकांना मात्र ते दिसत नसे, त्याचे अस्तित्व जाणवत नसे, हे कसे? प्रस्तुत लेखकालाही याचा अनुभव आला असल्याचे येथे सांगणे प्रसंगोचित होईल. उदा. लेखकाच्या पत्नीला ते काही प्रसंगी दिसायचे, पण लेखकाला ते दिसायचे नाही असे अनेकदा घडले आहे. पाटलांप्रमाणे तिच्या शरीरावर त्याचा परिणाम झाल्याचेही दिसून येत असे. त्यामुळे तिच्यावर विश्वास ठेवणे त्याला भाग होते. (अशा प्रकारच्या अनुभवामुळेच कट्टर बुद्धिवादी असलेल्या लेखकाचे मतपरिवर्तन झाले.*)

असे का होते याला काही वैज्ञानिक कारणे आहेत. यासंबंधी काही नियम आहेत. (त्याची सविस्तर चर्चा शेवटच्या 'विज्ञान आणि चमत्कार' या १६ व्या प्रकरणात केली आहे.) तेव्हा पाटलांना जाणवणारे पिशच्चाचे अस्तित्व इतरांना जाणवत नव्हते याचे आश्चर्य वाटायला नको.

पिशाच, भानामती वगैरे गोष्टी खोट्या असतात असे म्हणणाऱ्या अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या एका क्रियाशील कार्यकर्त्यालाच एका पिशाचाने-भानामतीने धरले असल्यामुळे आता 'अंनिस'वाले कोणत्या तोंडाने ते खोटे म्हणणार, असे

---

स्वत:चा अनुभव सांगायचा नाही. (कारण त्यावर कोणी विश्वास ठेवणार नाहीत.) अशी प्रतिज्ञा करून हा ग्रंथ लिहायला घेतलेल्या प्रस्तुत लेखकाला पुन्हा येथे प्रसंगवशात् दुसऱ्यांदा प्रतिज्ञाभंग करावा लागत आहे. हे खेदाने नमूद करावे लागते. (प्रकरण १२ तळटीप पाहा.)

एखाद्या वाचकाला वाटण्याचा संभव आहे. पण या वाचकाला 'अंनिस'चा खरा परिचय नाही असे खेदाने म्हणावे लागते. 'अंनिस'ची स्थापना वैज्ञानिकक सत्य शोधण्यासाठी झाली आहे अशी त्याची भाबडी समजूत झाली असावी. पण 'अंनिस'चा मूळ उद्देश विशिष्ट मताचा प्रचार व प्रसार हा आहे, सत्यशोधन हा नाही आणि विशिष्ट मताच्या प्रचारासाठी व प्रसारासाठी 'राजकारण' करावे लागते, संशोधन नाही; आणि 'राजकारण' करणारी माणसे तो 'धंदा' म्हणून करतात हे वेगळे सांगण्याची जरुरी नाही. आणि 'धंदा' करणारी माणसे तो कधी सुखासुखी सोडत नाहीत!

**टीप :** श्री. पाटील यांनी 'सत्यदीप' नावाचा १९९९ साली एक दिवाळी अंक काढला आहे. आपल्या स्वत:ला आलेल्या प्रत्यक्ष या अनुभवाच्या 'सत्यदीपा'चा प्रकाश आता त्यांच्या डोक्यात पडेल अशी आशा (भाबडी?) करावी काय?

■■

# भाग २

# विलक्षण वास्तवांचे विज्ञान

## (The Science of Strange Facts)

लेखक



प्राचार्य अद्वयानंद गळतगे

डोळ्यांना दिसणारे भौतिक जग हेच फक्त खरे जग समजून त्या जगाच्या नियमांच्या शोधालाच 'विज्ञान' म्हणण्याची हल्ली जी प्रथा आहे, ती कशी चुकीची आहे, डोळ्यांना न दिसणारे अतींद्रिय जगही भौतिक जगाइतकेच कसे खरे आहे व त्या जगाच्या नियमांचे परिणाम भौतिक जगातसुध्दा कसे होतात हे अनेक भौतिक पुराव्यानिशि या ग्रंथात दाखवून दिले आहे. त्यामुळे विज्ञान सत्य शोधते हे मान्य असणाऱ्या विज्ञाननिष्ठाना हे अतींद्रिय भौतिक पुरावे विचारात घ्यावे लागतील. हे अतींद्रिय व भौतिक पुरावेनिष्ठ 'विज्ञान' म्हणजे मानवाचे अंतिम कल्याण करणारे 'अध्यात्म विज्ञान' च कसे आहे हे अनेक भौतशास्त्रीय व अध्यात्मशास्त्रीय प्रमाणांनी या ग्रंथात लेखकाने दाखवून दिले आहे.

विज्ञान आणि चमत्कार या ग्रंथाचे लेखक प्राचार्य श्री अद्वयानंद गळतगे यांच्या यापूर्वी लिहलेल्या 'विज्ञान आणि बुध्दीवाद' व 'विज्ञान आणि अंध्दश्रध्दा निर्मूलन' या ग्रंथाविषयी काही वृत्तपत्रांनी व मांन्यवरांनी व्यक्त केलेली मते.

**दै. पुढारी : दिपक भागवत कोल्हापूर**

'विज्ञान आणि बुध्दीवाद' व 'विज्ञान आणि अंध्दश्रध्दा निर्मूलन' हे ग्रंथ मी वाचले आणि केवल थक्क झालो...... अभ्यासपूर्ण ओघवती भाषा हे या दोन्ही पुस्तकांचे वैशिष्ठ्य आहे. वाचत असताना जणू काही लेखक आपल्याशी बोलतोच आहे, असे वाटत राहते. एकदा वाचून समाधान होत नाही काही प्रकरणे पुन्हा पुन्हा वाचावीशी वाटतात.

**दै. लोकमत : शंकर सारडा, पुणे**

श्रध्देचे अस्तित्व मानवी जीवनात अपरिहार्य आहे. हे प्रमेय विज्ञानाच्या आधारेच सिध्द करण्यासाठी अद्वयानंद यांनी पाश्चात्य शास्त्रज्ञ संशोधकांचा आधार घेऊन केलेला युक्तीवाद खरोखरच स्तिमित करणारा आहे.......या पुस्तकाचा सखोल अभ्यास प्रत्येक विचारवंत तरुणाने करायला हवा.

**दै. सकाळ : दत्ता उमराणीकर, कोल्हापूर**

विज्ञान बुधीप्रधान असूनही बुध्दीवादी नाही याचे सुंदर विवेचन 'विज्ञान आणि बुध्दीवाद' व 'विज्ञान आणि अंध्दश्रध्दा निर्मूलन' या ग्रंथात लेखकाने केले आहे. प्रत्येक विज्ञानवादी व बुध्दीवादी माणसाबरोबरच सर्वसामान्य वाचकानेही या लेखनकृतीचा आस्वाद घेणे एकविसाव्या शतकात गरजेचे आहे.

**पैलतीर दिवाळी वार्षीक अंक : स्वामी विद्याशंकर भारती, शंकराचार्यपीठ, करवीर**

प्राचार्य गळतगे यांचे लेखन त्यांच्या ज्ञानाची आणि अभ्यासाची सखोलता दर्शविते.

**डॉ. ब. स. येरकुंटवार, संपादक 'प्रज्ञालोक' नागपूर :**

प्राचार्य गळतगे यांचे लेखन प्रांजळ आधुनिकांची झोप उडवून टाकणारे आहे. विज्ञानाचा बदललेला दृष्टीकोन व अतींद्रिय मानसशास्त्राचे भरीव स्वरुप त्यांच्या लेखनामध्ये पहावयास मिळते.....त्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे.